# रत्नमहाल

लेखक

श्री. एकनाथ सखाराम रेगे

प्रकाशक :

श्रीलक्ष्मी-नारायण प्रेस,

३६४ ठाकुरद्वार.

मुंबई.

१९३४

किंमत १२ आणे

# दोन शब्द

" कांहीतरी लिहावें " ही तीव्र इच्छा आणि स्वतंत्र रचनेबद्दल आत्म-विश्वासाचा अभाव या कात्रींत सांपडलों असतां एक इंग्रजी कादंबरी–तिचें नांवही आतां आठवत नाहीं–विद्यार्थी दशेंत असतां दहाबारा वर्षांपूर्वी माझ्या वाचनांत आली. लेखनाचा ओनामा करण्यास ह्या कादंबरीच्या रूपांतरांचा पांगुळगाडा माझ्या उपयोगी पडेल या आशेनें मी ती रूपांतरित केली. बरींच वर्षें ती तशीच पडून होती. विहार पत्र जन्माला आल्यावर नव्या कादंबरीची आवश्यकता त्याच्या चालकांना भासूं लागली. माझ्या या कादंबरीचें गुपित माझे मित्र श्री. **मं. प. नाबर** यांनाच फक्त माहित होतें पण त्यांनीं तें **विविधवृत्ताचे** सह-संपादक व माझे स्नेही श्री. **चं. वि. बावडेकर** यांच्याकडे फोडलें आणि त्यामुळें ही कादंबरी '**विहार**मध्यें प्रसिद्ध होऊं लागली व आतां पुस्तकरूपानें प्रसिद्ध होत आहे. केवळ रिकामपणची करमणूक म्हणूनच ही कादंबरी मी रूपांतरित केल्यामुळें करमणुकीपलीकडे तिच्यापासून वाचकांना कांहीं उदात्त नीतितत्वांचा लाभ घडावा असें मला प्रामाणिकपणें वाटत नाहीं आणि कर्मधर्मसंयोगानें तसा कांहीं लाभ घडलाच, तर त्याचा आस्वाद त्यांना घेऊं देण्यांत माझें " कोठावळ्याचें पोट " मी दुखूं देणार नाहीं. इतर कांहीं नसला, तरी चांगल्याचा परिणाम चांगला व वाईटाचा परिणाम वाईट होतो अशा प्रकारचा कर्मीत कर्माक्रमबोध गुप्त पोलिसांच्या चातुर्यावर उभारलेल्या कादंबऱ्यांतून बहुधा मिळतो. हा बोध कदाचित या कादंबरींतही असेल. असल्यास वाचकांनीं तो गोड करून घ्यावा अशी माझी त्यांना नम्र विनंती आहे.

राहतां राहिलें काम आभारप्रदर्शनाचें. श्री. **चं. वि. बावडेकर** व रा. **मं. प. नाबर** या उभयतांचे या कादंबरीच्या प्रकाशन-साहाय्याबद्दल अप्रत्यक्ष आभार मीं वर मानलेच आहेत. त्या उभयतांचें व **विहार**चे पहिले संपादक रा. **वसंतराव नेरूरकर** यांचे आतां प्रत्यक्ष आभार मानून हे " दोन शब्द " पुरे करतों.

—लेखक

# रत्नमहाल

## प्रकरण पहिलें

### बाबुरावाचा शोध !

पावसाचे दिवस. रात्रीची ११ वाजण्याची वेळ झाली होती. सर्वत्र शांततेचें साम्राज्य पसरलें होतें. जमिनीवर सुई टाकली असतांसुद्धा तिचा आवाज ऐकूं येईल, इतकी शांतता होती. तो २४ जुलई १९[illegible]-चा दिवस होता. या वेळीं पोलिस कॉन्स्टेबल बाबुराव हा आपल्या कामावर निघून नेहमींप्रमाणें आपल्या हद्दींत गस्त घालीत फिरत होता. त्याच्या हातांत एक चोरकंदील असून त्याचा उपयोग टेहळणी करण्याकरितां तो मधून मधून करीत असे.

हळू हळू कानोसा घेत व आपल्या हतांतील चोरकंदीलाच्या साहाय्यानें सभोंवतालचें वरवर निरीक्षण करीत तो आपला मार्ग हळू हळू आक्रमीत होता. याप्रमाणें तो चालला असतां पुढें थोडयाच अंतरावर असलेल्या एका बंगल्यांत कोणी तरी गात असावें, असा त्याला भास झाला व त्या अनुरोधानें तो पुढें गेला; तों त्याला एका बंगल्याच्या वरच्या मजल्यावरील सर्व दिवे पेटत असून त्या दिवाणखान्यांत कोणी तरी गात आहे, असें आढळून आलें. गाणें बाबुरावाच्या चांगलेंच परिचयाचें असून तें म्हणणाऱ्याचा आवाज किनरा, गोड, बारीक, व स्त्रीच्या आवाजाप्रमाणें येत असल्यामुळें कोणी तरी स्त्री तें गाणें म्हणत असावी अशी त्याची खात्री पटली.

"किति कीति सांगूं तुलाऽ ग !" बाबुराव आपल्याशींच म्हणाला, " अहाहा ! हा आवाज तरी किती गोड आहे ?" असें म्हणून तें गाणें ऐकण्याकरितां एखाद्या भ्रमिष्टाप्रमाणें तो तेथेंच उभा राहिला व जसजसा तो गाणें ऐकतां ऐकतां त्यांत रममाण होऊं लागला, तसतशी त्याच्या तोंडून त्या गाण्याच्या सुरावर आपोआप शीळ बाहेर पडूं लागली.

अशा रीतीनें बाबुराव त्या बंगल्यासमोर तें गाणें ऐकत उभा राहिला असतां त्याला त्या बंगल्याच्या दरवाजांतून कोणी तरी बाहेर येत आहे असें आढळून आलें. तें पाहतांच त्याला पोंचविण्यास कोणी तरी दिवा घेऊन येईल असें बाबुरावाला वाटलें होतें; परंतु तसें कांहींच न होतां तो मनुष्य मुकाट्यानें बाहेर पडून, आपल्यामागें अगदीं आवाज होऊं न देतां, दरवाजा लावून हळूहळू बागेंत शिरला. वरील दिवाणखान्यांत गाणेंही अद्यापि चालूच होतें. गाणारें माणूस आतां तर जलदच तें गाणें गात होतें व त्याच्याबरोबर पेटीही मोठमोठ्यानें वाजलेली ऐकूं येत होती. बाबुरावानें त्या माणसाकडे पाहिलें, तों तो थोडी टंगळमंगळ करीत बागेंतच उभा होता असें त्याला आढळून आलें. ह्या त्याच्या कृतीबद्दल बाबुरावाला थोडासा संशय आल्याशिवाय राहिला नाहीं; परंतु आपल्या संशयाचें निरसन करण्यासाठीं त्याला तसें विचारण्यास बाबुरावाला धैर्य होईना. बाबुराव पुढें चालूं लागला. जातां जातां त्यानें " रत्नमहाल " असें त्या बंगल्याचें नांव वाचलें. बाबुरावानें एकदा त्या बंगल्याकडे नजर टाकली व तो पुढें जाऊं लागला. इतक्यांत बंगल्यांतून बाहेर पडलेला तो मनुष्य फाटकाच्या बाहेर पडून बाबुरावाकडे आला.

" कसं काय हवालदार ? सर्व ठीक आहे ना ? कुठं कसली गडबड तर नाहीं ? " त्या नवख्या गृहस्थानें अगदीं हलक्या आवाजांत बाबुरावाला प्रश्न केला.

" छेः ! कसलीच गडबड नाहीं. " बाबुरावानें त्याला लष्करी पद्धतीचा सलाम करून उत्तर दिलें. " वर, कुणी बाई गात आहेत

त्यांचं गाणं ऐकण्याकरतां मी जातां जातां सहज इथं उभा राहिलों. त्यांचा आवाज अगदीं मधुर आहे नाहीं, साहेब ?"

इतक्या अवधींत ते दोघेही चालत चालत रत्नमहालापासून थोडेसे दूर आले. "ती गात आहे ती माझी बहीण आहे." उत्तरादाखल तो म्हणाला.

"अस्सं का ? त्यांचा आवाज फारच गोड असून तें गाणंही चांगल्यापैकीं दिसतं आहे."

"अर्थात् ! मला हें गाणं फारच आवडतं व तिलाही त्या गाण्याच्या सुराची विशेष अभिरुचि आहे."

ते दोघे जरी अशा रीतीनें बोलत होते, तरी आपला चेहरा होतां होई तों बाबुरावाच्या दृष्टीला पडूं न देण्याची खबरदारी तो मनुष्य घेत होता. पुढें कांहीं बोलण्याजोगा विषय नाहींसा पाहून त्या मनुष्यानें खिशांतून दोन सिगारेट्स् काढल्या व त्यांतील एक पुढें करीत म्हटलें, "तुम्ही धूम्रपान करीत असालच ?"

"आपला आभारी आहें मी याबद्दल." ती सिगारेट घेत बाबुराव म्हणाला. दोघांनींही आपापल्या सिगारेट्स् पेटविल्या व धूम्रपानाला सुरवात केली.

दोघांनींहीं आपापल्या सिगारेट्स् पेटविल्यावर ते हळूहळू पुढें चालूं लागले. चालतां चालतां म्युनिसिपालिटीचा एखादा दिवा समोर आला कीं त्यांच्या अंगावर प्रकाश पडे. बाबुरावाच्या बरोबर असलेला तो मनुष्य आपला चेहरा लपविण्याचा त्या वेळीं प्रयत्न करी. तरी पण तेवढयांतही संधि साधून बाबुरावानें त्याचा चेहरा न्याहाळून घेतला. त्याला पिळदार मिशा असून टोंकदार व निमुळती लहान दाढी आहे असें बाबुरावाला आढळून आलें.

थोडा वेळ दोघेही कांहीं बोलले नाहींत. शेवटीं ही स्तब्धता बाबुरावाला न आवडून त्यानें प्रथम बोलण्यास सुरवात केली.

" गाणं आटपलंसं वाटतं." तें ऐकूं येत नाहीं असें वाटून बाबुराव म्हणाला.

" असेल; तें कांहीं फारसं मोठें नाहीं." त्याला उत्तर मिळालें.

" गाण्याला बरेच लोक आले असतील, नव्हे ? "

" छे:, मुळींच नाहीं ! तिथं बाहेरून आलेली मंडळी कुणीच नाहीं." बाबुरावाबरोबरच्या माणसानें उत्तर दिलें, " केवळ करमणुकीसाठी म्हणूनच माझी बहीण गात आहे."

" हो, तेंही खरंच." बाबुराव म्हणाला, "खालच्या मजल्यावर दिवे नव्हते तें माझ्या लक्षांतच आलं नाहीं. पाहुणेमंडळी येणारी असती तर सगळीकडेच दिवे लागले असते !"

हें वाक्य ऐकतांच तो दुसरा मनुष्य थोडासा दचकला. परंतु ताबड-तोब चेहऱ्यावर लटकेच हास्य आणून म्हणाला, " माझ्या बहिणीनं मी जाण्यापूर्वींच ते दिवे मालवण्यास मला सांगितलं होतं, व त्याप्रमाणं मीं दरवाजा उघडण्यापूर्वीं ते मालवले."

"मग आतां तुम्ही घरीं जात असाल ? " बाबुरावानें प्रश्न केला.

" होय," तो म्हणाला, "मला भायखळ्याला जायचं आहे. एखादी व्हिक्टोरिया मिळते तर पाहिली पाहिजे."

" इथं तुम्हांला गाडी मिळेलसं मला वाटत नाहीं. कदाचित् मिळा-ल्यास स्टेशनवर मिळेल."

" तें मला माहित आहे." तो मनुष्य म्हणाला," मी इकडे बहिणीला भेटण्यासाठीं नेहमीं येत असल्यामुळं या भागाची मला चांगली माहिती आहे. मला वाटतं," तो पुढें म्हणाला," या रस्त्याला कोण कोण लोक राहतात याची तुम्हांला चांगलीच माहिती असेल. "

"इतकी कांहीं नाहीं." बाबुरावानें उत्तर दिलें, "कालपासून माझी बदली या भागावर झाली आहे. "

" हं ! एकुण तुम्ही इकडे अगदींच नवखे आहां तर ? " तो मनुष्य थोडा विचार करून म्हणाला, " तरी पण थोडयाच दिवसांत येथील बहुतेक रहिवाशांचीं नांवं तुमच्या तोंडपाठ झाल्याखेरीज राहणार नाहींत. "

इतक्यांत त्या मनुष्याची सिगारेट विझाल्यामुळें त्यानें बाबुरावाजवळ आगपेटी मागितली. त्यानें सिगारेटला लावण्यासाठीं काडी पेटविल्या-वर त्या प्रकाशांत बाबुरावाला त्याचा चेहरा पाहण्याची चांगलीच संधि मिळाली. त्या मनुष्याच्या चेहऱ्यावर थोडी त्रासिकपणाची झांक मारत होती. परंतु चेहेरा मात्र चांगलाच देखणा होता. दोघांनींही पुन्हा सिगारेट्स् ओढण्यास सुरवात केली व पुढें चालूं लागणार तोंच बाबुराव एकदम दचकून म्हणाला, " माफ करा साहेब. बोलतां बोलतां मी माझ्या हद्दीबाहेर बराच आलों. यापुढं मला आतां येतां येत नाहीं."

"मलाही आतां एखादी गाडी मिळते कीं नाहीं तें पाहिलं पाहिजे." असें म्हणून त्यानें बाबुरावाच्या हातावर तो नको नको म्हणत अस-तांही एक रुपया ठेवला व तो पुढें म्हणाला,"माझं घडयाळ बरोबर आहे कीं नाहीं कुणाला ठाउक. आतां साडेअकरा वाजून पांच मिनटं झालीं आहेत. अकरा-पंचेचाळीसची पसेंजर मिळेल, नाहीं हवालदार ? "

"बहुतेक मिळेल," बाबुरावनें उत्तर दिलें.

त्या मनुष्याची जाण्याची तयारी पाहून बाबुराव मागें परतणार तोंच त्याला रस्त्यावर कांहीं तरी पडल्याचा आवाज ऐकूं आला. तो आवाज ऐकतांच बाबुरावानें त्याला कांहीं पडलें आहे का असें विचारलें; परंतु त्यानें आपले सव खिसे एकदा चाचपून नकारार्थी मान हालवीत तो म्हणाला, "जर कांहीं तुम्हांला आढळलंच तर मी आणखी दोन तीन दिवस याच वेळेला इथं येणार आहें तेव्हां ती वस्तु मला द्यालच. या भागांत गस्त घालायची तुमची पाळी आणखी किती दिवस राहील बरं ? "

" फार झालं तर तीनचार दिवसांहून अधिक नाहीं."

"ठीक आहे; आतां मला वेळ काढतां येत नाहीं; नाहीं तर गाडी चुकायची." असें म्हणून तो तेथून झपाट्यानें निघाला. चालत असतां त्यानें एकदोन वेळ मागें परतून पाहिलें,परंतु बाबुरावाचें आतां त्याच्याकडे लक्षच नव्हतें. शिवाय त्याच्या हातावर चकचकीत राजमुद्रा पडली असल्यामुळें त्याचा त्या मनुष्याविषयीं चांगला ग्रह झाला होता.

" खरोखरच उदार मनुष्य आहे," बाबुरावानें खिशांतून एक विडी काढून ती पेटवितांना म्हटलें. विडी पेटवून झाल्यावर त्याची नजर सहज खालीं वळली तों काडीच्या प्रकाशामुळें रस्त्यावर पडलेला कसला तरी पदार्थ चकाकत आहे असें त्याला आढळून आलें. कांहीं नाणें असेल या भावनेनें त्यानें वांकून पाहिलें तों ती एक मोठी किल्ली आहे असें त्याला समजून आलें. " अरेरे ! गरीब बिचारा ! " बाबुराव ती किल्ली उचलीत म्हणाला, " आतां त्याचा स्वतःच्याच घरांत शिरकाव होणं कठीण आहे. मी त्याच्या मागं धांवत गेलों तर—"

परंतु तेवढ्या अवधींत तो मनुष्य बराच दूर गेला असेल असा विचार करून बाबुरावानें त्याच्या मागोमाग जाण्याचें रहित केलें. त्याला आपल्या जागीं वेळींच हजर होणें जरूर होतें; नाहीं तर विनाकारण वरिष्ठांच्या रोषाला मात्र पात्र व्हावें लागलें असतें. त्यामुळें दुसऱ्या दिवशीं ती किल्ली देण्याचा निश्चय करून बाबुराव परत फिरला.

परंतु थोडें अंतर मागें टाकलें न टाकलें तोंच त्याला एक कल्पना सुचली.मिळाल्यास आणखी एखादा रुपाया मिळवावा ह्या आशेचा मोह त्याला होऊन रत्नमहालांतील त्या मनुष्याच्या बहिणीकडे ती किल्ली देण्याचा त्यानें विचार केला. बाबुराव आपल्या इष्ट स्थळीं येऊन पोंहचला त्या वेळीं वरच्या मजल्यावर दिवे पेटत होते; परंतु गाणें मात्र बंद झालें होतें.जवळ असलेल्या दिव्यावरून घरांतील माणसें जागीं असावींत असा बाबुरावानें कयास बांधिला. तत्क्षणींच तो फाटका

उघडून बागेंत शिरला व बंगल्याच्या मुख्य दरवाजाजवळ येऊन त्यानें बेल दाबली. बेलचा आवाज ऐकून स्वतः मालकच दरवाजा उघडावयास येतील, अशी बाबुरावाची अटकळ होती. परंतु त्यानें बराच वेळ बेल दाबली असतांही त्याची चौकशी करण्याकरितां आंतून कोणीही आलें नाहीं !

बाबुरावानें आणखी थोडा वेळ वाट पाहून पुनः एकदा ती बेल दाबून पाहिली. परंतु त्याला या वेळींही पूर्वीप्रमाणें अनुभव आला. आंतील ' इलेक्ट्रिक बेल ' वाजलेली त्याला ऐकूं आली तरीसुद्धा दार उघडण्यास कोणीही येत नाहीं, हें पाहून त्याला अत्यन्त आश्चर्य वाटलें. आंतल्या मंडळींना, खुद्द बंगल्याच्या मालकाला आल्या-गेल्या माणसाची दरकार नाहीं हें पाहून तो मनांत त्यांच्यावर बराच चडफडला. तोंडांतल्या तोंडांत असमाधानाचे शब्द पुटपुटत त्यानें पुन्हा एकदा बेल वाजवून पाहिली. परंतु व्यर्थ ! त्याच्या हाकेला आंतून कोणीच 'ओ' दिली नाहीं. वर दिवे पेटत असतां व कानठळ्या बसविणारा तो बेलचा आवाज ऐकूनही दरवाजा उघडण्यास कोणीही येत नाहीं, हें पाहून बाबुरावाला हा प्रकार तरी काय आहे तें कांहींच कळेना. घरच्या यजमानाचें अशा प्रकारचें अगदींच शिथिल आदरातिथ्य पाहून बाबुराबाचें मन थोडेंसें संशयग्रस्त झालें व त्याच्या पोलिसी मनानें उचल खाल्ली. दरवाजा बंद असल्यामुळें आंत शिरकाव होणें शक्य नव्हतें व बंगल्यांत शिरकाव झाल्याशिवाय आंतील प्रकार समजणें अगदींच अशक्य.

स्वतःचा कनिष्ठ दर्जा त्याला वरिष्ठांकडे जाण्यास सुचवी, तर चौकस मन आंत काय आहे याचा निर्णय केल्याशिवाय मागें पाऊल टाकूं नको, असें सांगे. शेवटीं मनाचाच विजय होऊन येनकेन प्रकारेण आंत शिरण्याचा त्याचा निश्चय झालाच. परंतु मनांत येणें व खरोखरीच आंत जाणें यांत महदंतर होतें. किल्लीशिवाय दरवाजा उघडावा कसा हा विचार बाबुरावाला पडला व नशिबावर हवाला ठेवून आपणाजवळ

असलेली किल्ली त्यानें त्या दरवाजाला चालवून पाहिली. तों एखादा अद्भुत चमत्कार घडून यावा, तसा तो दरवाजा ती किल्ली आंत फिरतांच एकदम उघडला !

" आँ ! हा काय चमत्कार ! " बाबुरावाच्या तोंडून आश्चर्योद्गार आपोआपच बाहेर पडूं लागले, " या किल्लीनं या बंगल्याचा दरवाजा कसा उघडला ? ही त्याच्या घराची किल्ली—पण कदाचित् नसेलही. हं, आतां समजलं. कांहीं तरी आघुक-माघुकाचा प्रकार दिसतो आहे. या घराची मालकीण त्याची पत्नी असून तिची नजर चुकवून तो आपल्या प्रेमपात्राला भेटण्याकरतां गेला असावा व येतांना तिच्या नकळत येतां यावं म्हणूनच ही किल्ली त्यानें बरोबर घेतली असावी–"

आपल्या हातांतील चोरकंदिलानें प्रकाश पाडीत पाडीत बाबुराव संगमरवरी दगडाच्या जिन्यापर्यंत येऊन पोंचला व कोणी वर असल्यास ताबडतोब खालीं यावें असें मोठ्यानें ओरडून उत्तरासाठीं थोडा वेळ तो वाट पाहत राहिला. परंतु त्याच्या प्रश्नाला कोणीही उत्तर दिलें नाहीं; इतकेंच नव्हे तर त्या घरांत कसलाही आवाज त्याला ऐकूं आला नाहीं. जिकडे तिकडे पूर्ण शुकशुकाट होता. बाबुरावाला एखाद्या घड्याळाचें टिकटिकणेंसुद्धा ऐकूं येईना. सर्वत्र शांत !

असा प्रकार पाहून बाबुराव अगदींच घोटाळ्यांत पडला. त्याच्या धडपडणाऱ्या हृदयाच्या आवाजाखेरीज त्याला दुसरा कसलाच आवाज त्या घरांत ऐकूं येत नव्हता. आपण एवढ्या मोठ्यानें ओरडलों तरी-सुद्धा आपणास कोणीच कसें उत्तर देत नाहीं, याचा त्याला अचंबा वाटूं लागला व आतां यापुढें काय करावें याचा विचार तो करूं लागला. शेवटीं कायद्यानें तेथें ढवळाढवळ करण्याखेरीज गत्यंतर नाहीं असें त्याला कळून चुकतांच वर जाण्याचें त्यानें मनांत योजिलें.

बाबुराव जिना चढून वर येतांच त्याला दिवाणखान्याच्या दरवाजाच्या फटींतून प्रकाश येत आहे असें आढळून आलें. आपण बागेंतून

पाहिला तो हाच प्रकाश, अशी त्याची खात्री झाली. प्रकाश पाहतांच बाबुरावाला थोडा आशेचा किरण दिसूं लागला. तो दरवाजाजवळ गेला व समोर असलेला झालरीचा पडदा दूर सारून त्यानें दरवाजा ठोठा· वला. परंतु या वेळीं त्याला तोच अनुभव आला. त्यानें अनेक वेळां दरवाजा ठोठावून मोठमोठ्यानें हाकासुद्धा मारल्या; परंतु त्याला किंचितही यश आलें नाहीं. दिवाणखान्यांत एवढा झगझगीत प्रकाश असूनही आपल्या हाकेला प्रत्युत्तर मिळत नाहीं असें पाहून त्यानें इतर कसलाच विचार मनांत न आणतां तो दरवाजा एकदम लोटला. दरवाजा उघडतांच आंतील दिव्यांच्या प्रकाशाची झिरप बाहेर आल्यामुळें बाबुरावचे डोळे अगदीं दिपून गेले. डोळ्यांना तो प्रकाश सहन करण्याची शक्ति येतांच बाबुराव दिवाणखान्यांत येऊन तेथें तरी आपणास कोणी आढळेल या आशेनें तो आपल्या सभोंवतालीं पाहूं लागला. परंतु प्रथम त्याला त्या जागेंत कोणीच मनुष्यप्राणी न दिसतां आपण मात्र अगदींच विलक्षण अशा एका जागीं आहोंत असें त्याला समजून आलें. त्याला तो दिवाणखाना अगदींच विलक्षण दिसावयास लागला. आंत सफेत रंगाशिवाय दुसरा कुठला रंगच त्याला तेथें दिसेना. सर्व दिवाणखाना पांढऱ्या रंगाच्या वस्तूंनीं सजविलेला होता. भिंतींना सफेत तैलरंग दिलेला, खिडक्या व दरवाजे यांनाही तोच रंग, खिडक्या व दरवाजे यांना लावलेले पडदेही सफेत कापडाचे, दिवाणखान्यांतील सर्व लांकडी सामानही सफेत रंग देऊन वारनिश केलेलें, मेजें, खुर्च्या, कोचा, कपाटें सर्वच कांहीं तेथें सफेत रंगाचें होतें. हा प्रकार पाहून बाबुराव तर अगदीं स्तंभितच झाला ! दिवाणखान्यांतील सर्व दिवे पेटत असूनही तेथें कोणीही त्याला दिसलें नाहीं, म्हणून दुसऱ्या एखाद्या खोलींत कोणी आहे कीं काय हें पाहण्यासाठीं तो इकडे तिकडे फिरून पाहूं लागला;तोंच त्याला बाजाच्या पेटीसमोरील खुर्चीवर एक स्त्री बसलेली असून तिनें आपलें डोकें आपल्या समोरील बाजाच्या पेटीवर टेकलेलें आहे असें आढळून आलें.

तिला पाहतांच बाबुराव तिच्याजवळ गेला. परंतु तिनें कांहीं हालचाल केली नाहीं असें त्याला दिसून आलें. त्यानें दोनतीनदा 'बाईसाहेब' अशा हाका मारल्या तरी ती स्तब्धच ! अर्थात्‌च बाबु-रावानें तिला जागें करण्याकरितां तिच्या हाताला स्पर्श करतांच तो एकदम दचकून मागें सरला ! त्याला तिचा हात दगडासारखा घट्ट व बर्फासारखा थंडगार लागला. कदाचित् आपली चुकीची समजूत झाली असेल म्हणून त्यानें तिला पुन्हा स्पर्श करून आपली खात्री करून घेतली व त्याच वेळीं तिच्याकडे थोडें निरखून पाहतांच तिच्या गळ्या-खालीं रक्त सुकलेलें त्याला दिसलें !

" काय, खून !" असे उद्गार आपोआप त्याच्या तोंडून आले.

---

## प्रकरण दुसरें

# आणखी एक गूढ !

एक दीर्घ उसासा सोडून बाबुराव त्या स्त्रीच्या प्रेताकडे पाहत बराच वेळ उभा होता. त्या अचेतन देहाकडे पाहून त्याच्या पोलिसी हृदयालासुद्धा दया आल्याखेरीज राहिली नाहीं. ती निर्जीव आहे ही भावनाही विसरून, तिची पेटीवर अस्ताव्यस्त पडलेली मान नीट सावरून ठेवावी असा विचार ओझरतेपणींच त्याच्या मनांत येऊन गेला. परंतु खुनाच्या शोधाला लागणाऱ्या गुप्तपोलिसांना त्या वेळच्या स्थितीचा (Situation) कदाचित् पुरावा लागेल म्हणून तिच्या शरीराला हालविण्याचें त्याला धैर्य झालें नाहीं. आपण हा सर्व प्रकार वरिष्ठांच्या कानीं घालून त्यांच्या विचाराप्रमाणें काय तें करावें, असा बेत योजून तो तेथें अधिक वेळ न घालवितां तसाच घराबाहेर पडला.

पोलिस-इन्स्पेक्टर सर्जेराव यांना गेटावर आपल्या कामाची वर्दी देण्याची वेळ टळून गेली होती, म्हणून ते आसपास कोठें दिसतात कीं काय हें पाहण्यासाठीं बाबुराव इकडे तिकडे पाहत चालला असतां जवळच्याच एका झाडूच्या रस्त्यावरून एक मनुष्य घाईघाईनें येत होता. दोघेही आपापल्या विचारांत गढून गेले असल्यामुळें एकमेकांना दिसले नाहींत; अर्थातच तो आडव्या रस्त्यावरून येणारा माणूस बाबुरावाच्या अंगावर आदळला ! रत्नमहालांत घडलेलें खुनासारखें अघोर कृत्य अगदीं ताजें

डोळ्यांसमोर असल्यामुळें, त्या मनुष्याला अशा घाईत पाहून बाबुरावाला त्याचा संशय आला व त्यानें 'कुठं चालला आहेस ?' असा त्याला दरडावून प्रश्न केला.

बाबुरावाचें असलें धिटाईचें वर्तन पाहून त्या इसमाला अत्यंत नवल वाटलें. " कुठं चाललों आहें ? " तो उत्तरादाखल रागाच्या स्वरांत म्हणाला, "मी माझी ' ऑटोमोबाइल ' पाहत आहें. "

" काय ? " शब्द न समजून बाबुरावानें प्रश्न केला.

" ऑटोमोबाइल मोटरगाडी ! " तो शेवटच्या दोन शब्दांवर जोर देऊन म्हणाला, " तुम्हाला इंग्लिश समजत नाहींसं दिसतं. कुणीं लेकानं ती पळवली आहे कुणाला ठाउक ! केव्हांचा शोधतों आहें ! तुम्हांला या बाजूनं एखादी ' रेसर कार ' जातांना दिसली का हो ? ॲल्युमिनियमच्या रंगाची आहे ती. "

"अस्सं !" आपल्या हातून निसटण्याकरितां हा माणूस कांहीं बनवून सांगत आहे असें वाटून बाबुराव म्हणाला, " हे पाहा इन्स्पेक्टरसाहेब येत आहेत; तुम्हांला जें काय विचारायचं तें त्यांना विचारा. परंतु जें कांहीं तुम्ही बोलाल, तें तुम्हांला लागून अगर तुमच्याविरूद्ध धरलं जाईल हें ध्यानांत ठेवा. "

" का हो, तुम्ही दारू तर प्यालां नाहीं ? " आश्चर्य थोडें निळवल्यावर त्यानें प्रश्न केला. "माझं नांव कमलाकर महाले. माझी एक मोटर कंपनी आहे. मीं हल्लींच मागवलेली अगदीं नवीन पद्धतीची ' रेसिंग ' गाडी कुणी चोरानं पळवली असून तिच्या तपासांत मीं आहें, समजलं ? तुम्हां पोलिसांत कांहींच अर्थ नाहीं ! तुमच्या डोळ्यांदेखत अशा चोऱ्या होतात तरी कशा ? "

त्या दोघांमध्यें चाललेली ही बाचाबाची सर्जेरावांनीं थोडया अंतरारूनच ऐकिली असल्यामुळें जवळ येतांच त्यांनीं कमलाकराकडे तीक्ष्ण नजरेनें पाहिलें व बाबुरावाला हा काय प्रकार आहे असें अर्थसूचक नज-

रेनें विचारिलें. घडलेली हकीकत त्यांच्या कानावर घालण्याची कमलाकराची तयारी होतीच. परंतु बाबुरावानें त्याला अवसार न देतां रत्नमहालांत पाहिलेल्या खुनाची व रस्त्यावर भेटलेल्या या पहिल्या मनुष्याची सर्व हकीकत त्यांना कळविली. प्रथम सर्जेरावांना बाबुराव हा कांहीं तरी आपली भाकडकथा सांगत असेल असेंच वाटलें. परंतु आंत खुनाची बाब आहे हें ऐकतांच त्यांना त्यांत अत्यंत महत्त्व वाटूं लागलें. कमलाकरालाही बाबुरावाची हकीकत चित्ताकर्षक वाटून तो ती लक्षपूर्वक ऐकत होता.

" फारच चमत्कारिक आहे ! " ती हकीकत संपल्यावर कमलाकर म्हणाला, "काय इन्स्पेक्टरसाहेब, तुमचं काय मत आहे बुवा ? माझा तरी असा अंदाज आहे कीं, ज्यानं तिचा खून केला तोच माझ्या मोटरमधून पळाला असावा. "

" तसं असणं शक्य नाहीं. " बाबुरावानें म्हटलें, "कारण तो वीसपंचवीस मिनटं माझ्याबरोबरच बोलत होता. तुम्ही केव्हांपासून बरं आपली मोटर शोधीत आहां ?"

" सवाअकरा वाजल्यापासून मी ती धुंडाळीत आहें; पण अद्याप पत्ता लागत नाहीं !"

" तर मग तें काम त्याचं खात्रीनं नव्हे. कारण साडेअकरा वाजून जाईपर्यंत तो माझ्याशीं बोलतच होता मुळीं ! "

सर्जेरावांनीं त्या दोघांच्या संभाषणांत अजूनपर्यंत भाग घेतलेला नव्हता. परंतु कांहीं वेळानें विषयाचें थोडेंसें रूपांतर करण्यासाठीं त्यांनीं कमलाकराला त्याचें नांव विचारिलें.

" माझं नांव महाले. " आपल्या नांवचें एक छापील कार्ड खिशांतून काढून त्यांच्या हातीं देत कमलाकर म्हणाला, "माझी एक मोटर कंपनी आहे. विलायतेहून नुक्त्याच आणवलेल्या गाड्यांपैकीं एक नवीन रेसिंग कार घेऊन मी आज रात्रीं माझ्या एका मित्राच्या घरीं गेलों होतों.

त्याच्या घरांत शिरते वेळीं मोटर घराबाहेर रस्त्यावरच ठेवलेली होती. सवाअकरा वाजले म्हणून घरीं जाण्याकरतां बाहेर येऊन पाहतों तों तिथं मोटर नव्हती! तेव्हांपासून मी ती आसपास शोधीत आहें. माझी मोटर गेल्यामुळं मी अडचणींत सांपडलों आहें; पण माझी घाई पाहून त्या बाईचा खून मीच करून पलायन करण्याच्या विचारांत आहें असं यांना वाटत आहे, त्याचंच मला नवल वाटतं. ”

कमलाकराचें हें भाषण ऐकतांच सर्जेरावांनीं गालांतल्या गालांत हंसून त्याच्याकडे एक तीक्ष्ण नजर टाकली. कमलाकर दिसण्यांत देखणा व तरतरीत असून शरीरानें मजबूत होता. त्याच्या चेहऱ्याकडे पाहतांच तो पूर्ण निर्दोष असावा अशी सर्जेरावांची खात्री झाली. तरीही केवळ मनाच्या समजुतीमुळें त्याला हातचें जाऊं देणें त्यांना इष्ट वाटेना.

सर्जेराव म्हणाले, “हं, त्या मोटारीमुळं तुम्हीही एका अर्थी या खटल्यांत गुंतलांच आहां; तेव्हां तुम्हाला आमच्याबरोबर येणं भाग आहे. तुमची थोडीफार मदत होईल मला. ”

“ अवश्य ! बाकी माझी मोटर त्या माणसानंच पळवली यांत शंका नाहीं. ”

“ मुळींच नाहीं ! ” बाबुराव खात्रीच्या स्वरानें म्हणाला, “ कारण, तुमची मोटर ज्या वेळीं नाहींशी झाली त्या वेळीं तो माझ्याशीं बोलत होता. ”

“ पण काय रे, त्या बाईचा खून त्यानंच केला असावा असा तुला संशय येतो का ? ” सर्जेरावांनीं बाबुरावाला विचारलें.

“ तसं खात्रीपूर्वक असं मला कांहींच वाटत नाहीं. त्यानं खून केला असेल असं एकदा मनांत येतं, तर तो खुनी नसेल असंही वाटतं. ”

“ तें कसं ? ”

“ कारण, जर त्यानं खून केला म्हणावं तर तो ज्या वेळीं बंगल्यांतून बाहेर पडला त्या वेळीं वरच्या मजल्यावर गाणं चालूच होतं. अर्थात् त्या वेळीं तिचा खून झाला नव्हता हें खास ! ”

" असं होय ?---चल, कुठला बंगला तें दाखव पाहूं लवकर. "

रत्नमहालाच्या फाटकाशीं पोंचल्यावर सर्जेराव म्हणाले, " थांबा हं ! आंत शिरण्यापूर्वी मला एकदा बंगल्याचं नांव वाचूं द्या. बाबुराव तुझा कंदील जरा दे पाहूं. "

सर्जेरावांनीं बाबुरावाच्या हातून कंदील घेऊन पाटीवरील अक्षरें वाचण्यापूर्वीच कमलाकरानें वरील नांवाचीं अक्षरें वाचलीं. ' रत्नमहाल ! ' "काय ? रत्नमहाल ! " कमलाकर थोडा वेळ थांबून म्हणाला, " हा तर गजाननरावांचा बंगला ! रमाबाईचा तर खून झाला नसेल ना ? छे ! नाहीं,- शक्य नाहीं !"

" कां बरं ? " आश्चर्यचकित होऊन सर्जेरावांनीं विचारलें.

" कारण ती सर्व मंडळी चौपाटीवर राहायला गेली आहे म्हणून. फक्त नलिनी मात्र त्यांच्याबरोबर गेलेली नाहीं. "

" ह्या नलिनी कोण ? " पुन्हा सर्जेरावांकडून प्रश्न आला.

" नलिनी ही रमाबाईची धाकटी बहीण. थोड्या वेळापूर्वी मी ज्यांच्या घरीं गेलों होतों तिकडेच ती राहायला गेली आहे. "

कमलाकरानें दिलेली माहिती सर्जेरावांनीं आपल्या मनांत पूर्णपणें बिंबवून ठेविली.

" काय हो महाले, " आंत येतां क्षणींच सर्जेरावांनीं कमलाकराला प्रश्न केला, " ह्या बंगल्यांतून बाहेर पडलेला माणूस कोण असावा हें तुम्हीं बाबुरावानं त्याच्या दिलेल्या वर्णनावरून सांगूं शकाल का ? "

" अंहं, नाहीं; " कमलाकरानें उत्तर दिलें, " गजाननरावांची व त्यांच्या कुटुंबांतील इतर मंडळीची मला फारशी माहिती नाहीं व जी कांहीं थोडीबहुत आहे ती शरयूची जीवश्चकंठश्च मैत्रिण नलिनी हिच्यामुळं झाली. ह्या बंगल्यांतही मीं हा वेळपर्यंत पायसुद्धा ठेवलेला नाहीं. "

" शरयू कोण ? " सर्जेरावांनीं हटकलें.

" शरयू ही माझी भावि पत्नी. " जरा गोंधळून कमलाकरानें उत्तर दिलें, "तिचं आडनांव भवाने; ती सध्या आपल्या आईबरोबर दादर इथं राहते. "

बोलत बोलत ते तिघे जिना चढून सफेत दिवाणखान्यांत आले. दिवाणखान्यांत शिरतांच सर्जेराव व कमलाकर हे त्या प्रेताजवळ गेले व बाबुराव दरवाजाजवळच उभा राहिला. तें प्रेत पाहतांच दोघांनाही त्या स्त्रीची कींव आली.

" ह्या रमाबाई आहेत का ? " त्या प्रेताकडे अंगुलिनिर्देश करून थोडया वेळानें सर्जेरावांनीं विचारिलें.

" छे ! " तिच्या निर्मळ व शांत मुद्रेकडे पाहत कमलाकर म्हणाला, " रमाबाई हिच्यापेक्षां अंगानं व आकारानं दुप्पट आहेत; शिवाय ही अगदींच तरुण दिसते आहे. "

"लग्नही झालेलं दिसतं हिचं ! " सर्जेराव तिच्या गळ्यांतील मंगळ-सूत्राकडे पाहत म्हणाले.

नंतर त्यांनीं दिवाणखान्याचें एकदा निरीक्षण करून बाबुरावाला त्या घरांत कोणी आहे किंवा नाहीं तें पाहण्याची आज्ञा केली.

" घरांत कुणीही नसणार; कारण ही सर्व मंडळी समुद्रकांठीं राहा-यला गेली आहे. " कमलाकर बाबुरावातर्फे उत्तरादाखल म्हणाला.

कांहीं हरकत नाहीं. घर राखायला कुणी तरी असेलच कीं नाहीं, बाबुराव ! " त्याजकडे वळून सर्जेराव म्हणाले, " घराचा कोनान् कोंपरा शोधून कुणी मिळतो कीं नाहीं तें पाहा. कमलाकर, तुम्ही या खुर्चीवर स्वस्थ बसा. मला या जागेची अत्यंत बारकाईनं तपासणी करायची असल्यामुळं मला थोडादेखील त्रास होतां उपयोगी नाहीं. " असें म्हणून सर्जेरावांनीं त्या जागेची तपासणी करण्यास सुरवात केली. खिडक्या, त्यांवरील पडदे, जमीन, कोचा, वर असलेल्या गिरद्या, मयत स्त्रीच्या आसपासची जागा वगैरे सर्व त्यांनीं तपासलें.

सर्व दिवाणखाना तपासून झाल्यावर ते पुन्हा प्रेताजवळ आले व ती जागा सूक्ष्म दृष्टीनें पाहूं लागले. खुनावर उजेड पडेल असा खुनी इसमाचा मागें राहिलेला एखादा पुरावा सांपडेल अशी त्यांना वळकट आशा होती. परंतु तसें त्यांना कांहींएक मिळालें नाहीं. मयत स्त्रीसमोरील वाजाच्या पेटीवर संगीत सौभद्र नाटकाचें पुस्तक उघडें पडलें असून पानावर " किति किति सांगूं तुला " हें पद असलेलें त्यांना आढळून आलें. " हेंच तें पद ! " तें पद पाहून सर्जेराव जरा मोठ्यानेंच म्हणाले, " बाबुराव सांगत होता तेंच हें पद. अरेरे ! गात असतांच कुणी तरी हिचा खून केला असावा. "

" असें जर असेल तर बाबुरावाला भेटलेला मनुष्य निरपराधी असावा. " त्यांच्या पुटपुटण्यास उत्तर म्हणून कमलाकर म्हणाला, " कारण तो बाहेर आला तेव्हां हेंच गाणं चालू होतं. "

" कदाचित तसंही असूं शकेल. "

" मग माझी मोटरही त्यानं नेली नसणार. कारण खऱ्या खुनी इसमाशिवाय इतराचं तें कृत्य नाहीं."

" मिस्टर महाले, तुम्ही फारच भराऱ्या मारतां बुवा. " सर्जेराव म्हणाले, " पुराव्याशिवाय एखाद्या गोष्टीविषयीं ठाम मत बनवणं जरा धोक्याचंच नाहीं का ? बरं, तुम्ही ज्यांना भेटायला गेलां होतां तें ठिकाण इथून कितीसं दूर आहे ?"

" इतकं कांहीं दूर नाहीं. नं. २० डिलाइल रोड इथं ती मंडळी राहतात."

" 'नं. २० डिलाइल रोड ?' तें घर इथून कांहीं फारसं लांब नसावं. माटुंगा स्टेशनपासून पांचदहा मिनटांच्या अंतरावर असेल, नाहीं ? "

" अंहं, दादरच्या बाजूला आहे तें. " कमलाकरानें उत्तर केलें.

" अस्सं !" सर्जेराव ती जागा मनःचक्षूंपुढें आणूं लागले. परंतु कांहीं केल्या ती त्यांच्या ध्यानांत येईना. शेवटीं कंटाळून त्यांनीं तो प्रयत्न सोडून दिला.

" काय हो इन्स्पेक्टरसाहेब, मला आपलं नांव कळवाल का?" थोडया वेळानें कमलाकरानें विचारलें, " आपलं ठाउक असलेलं बरं म्हणून विचारतों. "

" हो हो !—न कळवायला काय झालं ? " उत्तरादाखल सर्जेराव म्हणाले, " माझं नांव सर्जेराव घाटगे; इन्स्पेक्टर घाटगे या नांवानं मला ओळखतात. दादर विभाग माझ्या ताब्यांत आहे. " थोडा वेळ थांबून ते पुढें म्हणाले, " माझ्या अमदानीत या जागीं होणारा हा पहिलाच खून ! "

यावर कमलाकर काय बोलतो तें ऐकण्यासाठीं सर्जेराव त्याच्याकडे पाहूं लागले. कमलाकर शीळ वाजवीत त्या प्रेताकडेच पाहत होता. त्याच्या मुद्रेवरून त्याच्या मनांत विचारांचें काहूर माजलें असावें असें वाटण्याजोगें होतें. " बाबुरावांशीं बोलत राहणाऱ्या मनुष्याचं हें कृत्य नसावं असं माझं मन मला सांगतं बुवा. " कमलाकर कांहीं वेळानें पुटपुटला.

" त्याचं नव्हे तर कुणाचं ? " सर्जेरावांनीं प्रश्न केला.

" मला वाटतं, त्या माणसानं बाबुरावाला आपल्या भाषणानं झुलवीत दूर नेलं व तेवढया वेळांत ह्याच घरांत असलेल्या दुसऱ्या मनुष्यानं तिचा खून केला असावा ! "

" तें या वेळीं कांहींच सांगतां येणार नाहीं. " सर्जेराव म्हणाले, " इतर चर्चा करण्यापूर्वी डॉक्टरचं मत आपण आधीं घेऊं या. तुम्हीं डॉक्टरना घेऊन याल का ? "

"मला या बाजूची फारशी माहिती नाहीं; शिवाय मी ही संधि साधून पळून न जातां फिरून इथं येईन अशी तुमची खात्री आहे का ?"

"तशी माझी पूर्ण खात्री आहे." सर्जेराव म्हणाले, "आपली मोटर मिळावी यासाठीं तरी तुम्ही पुन्हा आल्यावांचून राहणार नाहीं. "

"ठीक ! " कमलाकर हंसत म्हणाला, "डॉक्टरचं घर कुठं आहे ?"

सर्जेरावांनीं आपल्या खिशांतून एक ' व्हिजिटिंग कार्ड ' काढून त्याच्या मागील बाजूवर कांहीं लिहिलें व तें कार्ड कमलाकराच्या हातीं देत ते म्हणाले, " समोरच्या रस्त्यावरून चारपांच घरं टाकून उजव्या हाताच्या घरांत डॉक्टर करमरकर राहतात त्यांना हें देऊन ताबडतोब इथं बोलावलं आहे म्हणून सांगा. "

सर्जेरावांच्या विनंतीला मान डोलवून कमलाकर आपल्या जागेवरून उठून डॉक्टरना आणण्याकरितां निघाला.

कमलाकर निघून गेल्यावर सर्जेरावांनीं पुनः एकदा आपली तपासणी सुरू केली. तपासणी करून झाल्यानंतर ते एका खिडकीपाशीं आले व रस्त्याकडे पाहत उभे राहिले. परंतु ते तेथें उभे राहतात न राहतात तोंच सर्व बंगला धुंडाळून बाबुरावानें त्या दिवाणखान्यांत प्रवेश केला.

" कोणीच दिसत नाहीं, साहेब ! " आंत पाऊल टाकीत असतां तो उद्गारला, " घरामध्यें कुणीच नाहीं ! सर्व खिडक्या व दरवाजे पूर्ण बंदोबस्तानं लावून घेतल्याप्रमाणं दिसत आहेत. "

" आश्चर्य आहे ! " सर्जेराव स्वतःशींच पुटपुटले. "काय रे बाबुराव, " थोडया वेळानें त्यांनीं प्रश्न केला, " तो मनुष्य तुझ्याबरोबर बोलत होता तेव्हां गाणं चालू होतं अशी तुझी खात्री आहे का ? तो प्रसंग तुला चांगला आठवतो ना ? "

" हो तर, साहेब ! त्याबद्दल माझी पूर्ण खात्री आहे व त्यामुळंच तो मनुष्य निरपराधी असावा असा माझा अंदाज आहे. "

" पण काय रे ? त्याची मुद्रा बावरल्यासारखी दिसत होती का ?"

" तें कांहीं मला खात्रीलायक सांगतां येणार नाहीं. " बाबुरावानें उत्तर केलें, " पण आपला चेहरा माझ्या नजरेला न पाडण्याची खबरदारी तो घेत असावा असा माझा तर्क आहे. कारण त्यानं आपली हॅट अगदीं चेहऱ्यावर आणलेली होती व माझ्यापासून तोंड लपवण्याचा त्यानं पुष्कळ प्रयत्न केला. तसंच ह्या बंगल्यांत आपली बहीण राहत

असून आपण तिला वरच्यावर भेटण्यासाठीं येत असतों असंही तो सांगत होता.”

“हंऽ ! पण ह्या बंद असलेल्या घरांत तो कसा वर आला असावा ?”

“त्याच्यापाशीं असलेल्या ह्या चावीच्या साह्यानं” चावी पुढें करीत बाबुराव म्हणाला.

सर्जेरावांनीं बाबुरावाजवळची ती चावी घेऊन तिचें चांगलें निरीक्षण केलें. तिचा आकार, लांबी वगैरे सर्व कांहीं त्यांनीं नीट न्याहाळून ठेविलें. “ बाबुराव, ” किल्ली पाहत असतां ते म्हणाले, “ ही अगदीं नवी दिसते आहे, नव्हे ? हिचा उपयोगही फारसा झालेला दिसत नाहीं.”

“ कदाचित् फार उपयोग झाल्यामुळं ती पॉलिश केलेली असावी.”

“ शक्य नाहीं !” सर्जेराव खात्रीच्या स्वरानें म्हणाले, “ तसें असतें तर ह्या कडा गुळगुळीत दिसल्या असत्या. बरं, पण त्या मनुष्यानं आपलं नांव तरी तुला कळवलं का ? ”

बाबुरावानें नकारार्थी मान हालविली.

“ तुम्हांला ह्या खुनाच्या बाबतींत काय वाटतं, साहेब ?”

“ मीं थोडीशी सांखळी जुळवली आहे. कारण या प्रकरणाविषयीं इतक्यांत ठाम मत बनवणं मूर्खपणाचं होईल. मला वाटतं, या खुनांत दोन माणसांचं अंग असावं. एकानं तुला झुलवत झुलवत दूर नेलं व तेवढ्या अवधींत दुसऱ्यानं हिचा खून करून इथून पोबारा केला असावा. त्या इसमाबरोबर तूं बोलत असतांना तुला एखादी किंकाळी नाहीं का ऐकूं आली ?”

“ मुळींच नाहीं. आम्ही थोडे दूर गेल्यावर गाणं बंद झालं व त्यानंतर आम्हीं इतके दूर गेलों कीं, किंकाळी आम्हांला तेवढ्या दूर ऐकूं येणं शक्य नव्हतं. ”

“ मग तर मी म्हणतों तसंच असणार. ” सर्जेराव विचार करून म्हणाले, “ तुला दूर नेण्याकरतांच तो इसम बाहेर आला असावा. ”

" कदाचित् तसंही असूं शकेल." बाबुराव म्हणाला, " तो मनुष्य जेव्हां बाहेर आला तेव्हां मी बागेच्या फाटकापाशीं उभा होतों."

" बरोबर. त्यांनीं तुला वरच्या खिडकींतून पाहिलं असावं व तूं जवळ असल्याकारणानं त्यांना आपलं काम सुलभ रीतीनं करतां येण्याजोगं नव्हतं, म्हणून त्यांपैकीं एकानं खालीं येऊन तुला दूर नेलं व दुसऱ्यानं हें खुनाचं अघोर कर्म पार पाडलं ! तो मनुष्य तुला सोडून गेला तेव्हां किती वाजले होते ? "

" त्या वेळीं साडेअकरा वाजले होते. तो माझ्यावरोबर जवळ जवळ अर्धा तासपर्यंत बोलत होता. "

" ह्या स्त्रीचा खून करून आपला मार्ग सुधारण्यास त्या दुसऱ्या मनुष्याला एवढा वेळ पुरे होता. पण हे पाहा डॉक्टर आलेच !" सर्जेराव रस्त्याकडे पाहत असतांना त्यांची नजर समोरून येत असलेल्या डॉक्टरकडे गेली. त्याबरोबर त्यांनीं आपल्या हाताखालच्या आणखी दोन माणसांना बोलावून आणण्याकरितां बाबुरावाला पाठविलें.

बाबुराव निघून जातांच सर्जेरावांनीं पुन्हा एकदा आपल्या तपासणीला सुरवात केली. त्यांनीं त्या मयत स्त्रीचा पोशाख पाहून ठेविला. ती काळें लुगडें नेसलेली असून तिनें अंगांत आधुनिक पद्धतीचा पोलका घातलेला होता. हातांतील सोन्याच्या दोन बांगड्या व कानांतील कुडीं यांशिवाय इतर दागिना तिच्या अंगावर दिसण्यांत येत नव्हता. तिच्या अंगावरील सर्व पोषाख साधा होता. बाजाची पेटी वाजवीत असतां अचानक रीतीनें तिचा खून झाला असावा असें दिसून येत होतें. तिचें मस्तक बाजाच्या पेटीवर टेकलेलें असून दुरून पाहिलें असतां ती निजलेली असावी असाच भास होत असे ! तिची मुद्रा शांत दिसत होती.

पेटीच्या पलीकडे असलेल्या खुर्चीवर तिचा शेला पडलेला होता. तो मात्र फार किंमतीचा दिसत होता. ती स्त्री त्या बंगल्यांतील माण-

सांना भेटावयास आली असावी अशी सर्जेरावांची समजूत झालेली होती. परंतु ज्या घरांत नुसती घराची मालकीणच नव्हे तर कुणी राखणदारही नव्हता अशा ठिकाणीं ती कां आली असावी याचा उलगडा त्यांना होईना. पहिल्या इसमानें हिला आपल्याजवळ असलेल्या चावीनें दरवाजा उघडून आंत आणली असेल काय, असाही प्रश्न त्यांच्या मनांत उद्भवला. परंतु त्याच वेळीं त्याच्याजवळ त्या घराची चावी यावी कशी, या प्रतिकूल विचारानें त्यांच्या प्रश्नाला हाणून पाडलें. अशा रीतीनें ते स्वतःच प्रश्नोत्तरें तयार करीत बसले असतां कमलाकर व डॉक्टर करमरकर यांनीं त्या दिवाणखान्यांत प्रवेश केला. आंत येतांच त्यांनीं प्रेताची तपासणी करण्यास सुरवात केली. त्यांची तपासणी चालली असतां कमलाकरानें सर्जेरावांना एकीकडे नेऊन कांहीं नवीन शोध लागला किंवा नाहीं असा प्रश्न केला.

"मला वाटतं ती या घरांत कुणाला तरी भेटायला आली असावी." सर्जेराव खुर्चीवर पडलेल्या तिच्या शेल्याकडे बोट दाखवीत म्हणाले.

"अस्सं ऽ!" आश्चर्य वाटून कमलाकर म्हणाला, "घरांत मालक नसतांना त्याच्यामागं ही कां बरं आली असावी?"

"पण या घराचे मालक सध्या समुद्रकांठीं राहायला गेले आहेत, ही तुमची खात्री आहे ना?"

"हो तर! शरयूला ही गोष्ट तिच्या ज्या मैत्रिणीनं सांगितली ती या बंगल्याच्या मालकाची मेहुणी आहे. रमाबाईंची ती सख्खी बहीण. ती मंडळी तिकडे आणखी एक महिना राहणार आहेत असं कालच त्यांचं तिला पत्र आलं होतं."

"चौपाटीपासून हें घर कितीसं दूर आहे?" सर्जेरावांनीं प्रश्न केला.

"चौपाटीवरच आहे तें घर. त्या घराचा पुढील भाग समुद्राच्या दिशेला आहे." कमलाकरानें उत्तर दिलें.

"ज्यांच्यापाशीं ही बाबुरावांना सांपडलेली किल्ली होती ते कदाचित् गजाननराव तर नसतील? कारण, त्यांच्याशिवाय इतर पुरुषाकडे ती किल्ली असणं जरा अशक्यच दिसतं."

"मला नाहीं असं वाटत."

"बरं; त्यांच्यामागं इथं कोणी राहत होता का ?"

"तें कांहीं मला ठाऊक नाहीं." कमलाकरानें उत्तर दिलें, "मला कांहीं यासंबंधीं विशेष माहिती नाहीं. तुम्हाला जरूर असेल ती माहिती तुम्ही नलिनीलाच विचारा. तिनं दिलेल्या माहितीचा तुम्हांला तुमच्या कार्यांत थोडाबहुत उपयोग येईल."

त्याच वेळीं डॉक्टर करमरकर यांचें तपासणीचें काम पुरें झालें व ते आतां काय सांगतात याकडे दोघांचेंही लक्ष वेधलें.

"तिचा प्राण गेल्याला पांच तास होऊन गेले आहेत." डॉक्टरसाहेब म्हणाले.

"पांच तास !" सर्जेरावांनीं विचारलें, "पण अकरा वाजतां तर ती होती अन् आतां तर पुरता दीडदेखील वाजला नाहीं !"

"तें कांहीं मला माहित नाहीं," डॉक्टरसाहेब निश्चयानें म्हणाले, "एवढंच मीं सांगू शकतों कीं, हीचा प्राण जाऊन पांच पास झाले आहेत."

प्रकरण तिसरें

# भवाने यांचें कुटुंब

"भागीरथी, मुलांचीं तोंडं जरा आतां बंद कर पाहूं. एकसारखीं भांडत आहेत मघांपासून, अन् गोंगाट तर इतका चालला आहे कीं, मला पुस्तक वाचायचं सुचूं देत नाहींत मेलीं!"

"पण बाई, मीं करूं म्हणून तरी काय?" आपल्या कर्कश आवाजांत भागीरथी ओरडली, "तिकडे धुणीं तशीं पडलीं आहेत, भांडीं तर घांसायचींच आहेत. उष्टं-खरकटं तर अजून काढलेलंच नाहीं; मग मी तें काम करूं कीं इकडे लक्ष देऊं?"

"काय ग तुमचा त्रास हा! मला नुसतीं छळून खाताहेत सगळीं. ही सर्व अव्यवस्था पाहून नलिनी काय बरं म्हणेल? तुमच्यानं जर हीं कामं होत नाहींत तर मग नोकरीला तरी कां राहतां ग?—आणि शरयू कुठं गेली आहे?"

"कमलाकरशेटना भेटायला कारखान्यांत गेली आहे."

"मला वाटलंच तें. मला काय होतं आहे, काय नाहीं; इकडे कुणाचंच मेलं लक्ष नाहीं. जो तो आपल्या सुखांत दंग! मी मरेना का इकडे मग. अग्गयायी! काय ओरड ही! काय किंकाळ्या ह्या! जशीं मेलीं मसणवटींतील भुतंच! हीं कारटीं माझं रक्त आटवण्याकरतांच मागं ठेवलीं आहेत! थांब, जाऊं नको!"

परंतु भागीरथीला आपल्या धनिनींचा 'पिरपिऱ्या' स्वभाव माहीत असल्यामुळें ती तेथें एक क्षणभरही थांबली नाहीं. सरोजिनीबाईंनीं खूप हाका मारल्या व शेवटीं तिला मनांतल्या मनांत शिव्या देत त्यांनीं आपलें पुस्तक वाचण्यास सुरवात केली.

सरोजिनी लहान असतांना तिच्या वडिलांजवळ बराच पैसा होता. सरोजिनी ही त्यांची एकुलती एक कन्या असल्यामुळें त्यांनीं तिला मॅट्रिकपर्यंत शिक्षण दिलें. तोंपर्यंत तिचें लग्न करण्याचा विचारासुद्धा त्यांच्या मनांत आला नाहीं. सरोजिनी तरुणपणीं फार सुंदर दिसत असल्यामुळें पुष्कळ तरुणांचे डोळे तिच्याकडे वळत असत. बापाची एकुलती एक मुलगी असल्यामुळें सरोजिनीचा स्वभाव थोडासा हट्टी व एककल्ली बनला होता. सरोजिनी मॅट्रिक पास झाल्यावर व तिचें विसावें वर्ष संपल्यानंतर तिचा बाप तिच्यासाठीं 'स्थळें' शोधूं लागला. सरोजिनी ही जात्याच सुंदर असल्यामुळें व तिचें शिक्षणही थोडेंबहुत झालें असल्याकारणानें 'स्थळें' आपोआप चालून येतील असा पहिल्यानें त्यांचा समज झाला होता. परंतु अनुभवाअंतीं त्यांचे डोळे पुरते उघडले. मुलीच्या बापाला वरसंशोधनाला किती सायास पडतात हें त्यांना कळून चुकलें. त्यांना आपल्या कन्येसंबंधानें वृथा अभिमान असल्यामुळें डोळ्यांदेखतच्या 'स्थळां'कडे त्यांनीं जाणून-बुजून दुर्लक्ष केलेलें होतें. परंतु मागाहून आपली चूक कळून येतांच त्यांना पश्चात्ताप झाल्याखेरीज राहिला नाहीं. असो. अशा रीतीनें ते 'स्थळें' शोधीत असतां त्यांच्या घराशेजारीं, कॉलेजमध्यें जाणारा आत्माराम भवाने या नांवाचा एक विद्यार्थी येऊन राहिला. त्याला अविवाहित असलेला पाहतांच तें 'स्थळ' साधण्याची सरोजिनीच्या वडिलांनीं खटपट चालविली. आत्माराम हा स्वच्छंदी व चैनबाज होता. त्यानें सरोजिनी ही बापाची एकुलती एक मुलगी असून पुढेंमागें बापाचा सर्व पैसा तिलाच मिळणार असें पाहून तिचें पाणिग्रहण करण्याचें कबूल केलें व थोड्याच दिवसांत दोघांचा विवाह झाला. लग्न झाल्यानंतर

दोन महिन्यांच्या आंतच सरोजिनीचे वडील विषमज्वराला बळी पडून इहलोक सोडून चालते झाले. अर्थातच त्यांची सर्व दौलत सरोजिनीला मिळाली. आपण मनांत योजिलेलें भविष्य इतक्या लौकर सफल झालेलें पाहून आत्मारामाला आनंदाच्या गुदगुल्याच होऊं लागल्या !

पैसा मिळतांच अत्मारामपंत आपले गुण उधळूं लागले. दारू, बाहेरख्याली, जुगार इत्यादि सर्व व्यसनांनीं ते परिपूर्ण होते. सरोजिनीच्या पित्यानें आपली सर्व संपत्ति तिच्या नांवें केली असल्यामुळें आपल्याला लागणारे पैसे तिच्यापासून मागून घेण्याखेरीज त्याला गत्यंतर नव्हतें. दिवसेंदिवस त्याचीं व्यसनें बळावत चाललीं. लग्न झाल्यानंतर दोन वर्षांनीं सरोजिनीला एक कन्यारत्न झालें, तिचें नांव शरयू. शरयूच्या जन्मानंतर एकदोन महिन्यांच्या आंतच पैसा न मिळाल्यामुळें अगर दुसऱ्या कांहीं कारणांमुळें आत्मारामपंतानें दुसरें लग्न केलें. सरोजिनीचें व त्याचें दर्शनही होईनासें झालें.

बापानें मागें ठेविलेल्या संपत्तीमुळें सरोजिनीच्या उपजीविकेचा प्रश्नच नव्हता. थोड्याच दिवसांनीं तिनें १०२० डिलाइलरोड येथें एक स्वतंत्र बंगला घेऊन तेथें ती शरयूसह एकटीच राहूं लागली.

आत्मारामाला दुसऱ्या बायकोपासून सात मुलें झालीं, व शेवटीं नवऱ्याच्या जुलुमाला कुंटाळून ती बिचारी स्वर्गाला निघून गेली ! मरणापूर्वीं तिनें आपलीं मुलें सरोजिनीच्या स्वाधीन केलीं होतीं. सरोजिनी स्वभावानें दयाळु असल्यामुळें व तिच्यावरही तसलाच प्रसंग आलेला असल्यामुळें तिनेंही त्या मुलांना ठेऊन घेतलें. अशा रीतीनें आत्मारापंत हवा तसा स्वच्छंदानें वागण्यास मोकळा झाल व इकडे सरोजिनी मुलांसह कसेंबसें आपलें जीवित कंठूं लागली. आत्मारामपंत तिच्या वाऱ्यालासुद्धा कधीं उभा राहत नसे. वर दिलेला प्रसंग ह्या गोष्टीनंतर जवळ जवळ अठरा वर्षांनंतर आहे. अस्तु.

शरयू आतां चांगली वीस वर्षांची झाली होती. दोन वर्षांपूर्वीं सरोजिनीबाईंच्या मावशीचा भाचा कमलाकर महाले यानें मुंबईला एक

'मोटर' कंपनी काढली होती. कमलाकर हा सरोजिनीबाईंचा नातलग असल्यामुळें वारंवार त्यांच्या घरीं येतजात असे. थोडयाच दिवसांत त्याचा त्या घरांतील सर्व मंडळीशीं चांगलाच परिचय झाला. शरयूनें त्याचें मन आकर्षण करून घेऊन आपलें हृदयही त्याला अर्पण केलें. त्यांचें एकमेकांवर बसलेलें प्रेम पाहून सरोजिनीबाईंनाही त्यांचा जोडा पसंत पडला, व त्यांनीं एका शुभ मुहूर्तावर वाङ्निश्चय करून टाकला.

वर दिल्याप्रमाणें सरोजिनीबाई आपल्या खोलींत पुस्तक वाचीत बसल्या होत्या. ती खोली चांगली व्यवस्थित अशी नसून जमिनीवर जागोजाग मुलांचीं खेळणीं पडलेलीं होतीं, जमिनीवरील गालिचा जिकडेतिकडे दुडलेला, भिंतीवरील तसबिरी वांकडयातिकडया झालेल्या, मेजावर, खुर्च्यांवर पुस्तकें अस्ताव्यस्त पडलेलीं, अशा तऱ्हेची शोभा त्या खोलींत होती ! खोलींतून दिसणारें सृष्टिसौंदर्य मात्र बहारीचें होतें. परंतु खोलींत पसरलेल्या अव्यवस्थेमुळें मात्र त्या जागेची सर्व शोभा नष्ट झालेली होती.

सरोजिनीबाई वाचीत असतां थोडया वेळानें नलिनीनें त्या खोलींत प्रवेश केला. तिला पाहतांच पुन्हा एकदा त्यांनीं आपला शब्दांचा भडिमार करण्यास सुरवात केली.

"काय ग नलिनी, तुला शरयूबरोबर इतक्या गलिच्छ जागेंत, जिकडेतिकडे अव्यवस्था आहे अशा घरांत राहयला तरी कसं आवडतं ग ?"

"सकाळपासून संध्याकाळपर्यंत सारखी खपत असतें, पण व्यवस्था म्हणून कशी ती मुळींच लागत नाहीं. अगदीं त्रासून गेलें आहें मी."

"कसंही असलं तरी मला ही जागा आपली सुखदायक वाटते." नलिनी तेथील एका खुर्चीवर बसून म्हणाली, "पण काय हो मामी, आज तुम्हांला कसं काय वाटतंय् ?"

" मी जिवंत आहेंसं मला वाटतं ! अग, रात्रभर मला झोंप नसल्या-मुळं मी सारखी तळमळत होतें. त्यांत आणखी भयंकर स्वप्नांची भर. "

सरोजिनीबाईंचा स्वभाव अगदींच विचित्र होता ! सर्व दिवस आळ-सांत घालवूनसुद्धा त्या आपण किती काम केलें तरी व्यर्थ, असें भास-वीत असत. त्या फारच आळशी बनल्या होत्या. त्यांना एका जागे-वरून उठून दुसऱ्या जागीं जाणें, म्हणजेसुद्धा फार त्रास वाटत असे ! नलिनीला हा तिचा स्वभाव मुळींच आवडत नसे. परंतु ती तेथें पाहुणी या नात्यानें राहिल्यामुळें व शरयू तिची अगदीं जिवलग मैत्रिण अस-ल्यामुळें ती मुकाट्यानें तेथील त्रास सहन करीत असे. सरोजिनीबाईंचा स्वभाव जरी असा विचित्र होता, तरी त्या दयाळु, परोपकारी व इतर बाबतींत सुस्वभावी असल्यामुळें त्यांचें बोलणें कोणीं मनावर घेत नसे.

" मी आतां शरयूबरोबर बाहेर गेलें होतें, " थोड्या वेळानें नलिनीनें बोलण्यास सुरवात केली, " ती कमलाकरांना भेटण्याकरतां त्यांच्या कारखान्यांत गेली आहे. "

" तिला फिरायला जायला बरं सुचतं ! मी सकाळपासून संध्या-काळपर्यंत एवढा त्रास भोगतें, याचं तिला कांहीं आहे का ? " सरो-जिनीबाई एक दीर्घ सुस्कारा सोडून म्हणाल्या, " ह्या सबंध वर्षांत माझ्या अंगचीं नुस्तीं हाडं राहिलीं आहेत ! "

हें तिचें भाषण ऐकतांच नलिनीला हंसूं लोटलें. कारण सरोजिनी-बाई अंगानें इतक्या लठ्ठ होत्या कीं, त्यांना आपलें अंग हालविण्यास फार त्रास वाटत असे. नलिनीला जरी हंसें आलें, तरी तें आवरून ती म्हणाली, " खरंच मामी, तुम्ही आपल्या प्रकृतीचीसुद्धा काळजी घेतली पाहिजे. असे एकसारखे श्रम करून चालायचं नाहीं. "

" तूं इथं चुकतेस, नलिनी. मला माझ्या मुलीकरतां व त्या कारट्यींकरतां तरी स्वार्थत्याग केलाच पाहिजे. मी इतकी मरमर मरतें, पण त्यांना त्याचं कांहींच वाटत नाहीं ! "

सरोजिनीबाईंना आपले गुण दुसऱ्याजवळ वर्णन करून सांगण्याची फार सवय होती व त्या सवयीचा पाढा त्यांनीं नलिनीजवळ गिरविण्यास सुरवात केली.

" नलिनी, " ती म्हणाली, " मी लहान असून माझ्या बापाजवळ जेव्हां राहत असें तेव्हां मी किती तरी सुखी होतें. माझी आई माझ्या वयाच्या दुसऱ्याच वर्षीं मला सोडून गेली, तरीही त्या वेळीं मी पूर्ण सुखी होतें. असं दुःख पुढं भोगावं लागेल अशी कल्पनाही त्या वेळीं माझ्या मनाला कधीं शिवली नाहीं. पण ज्या दिवशीं माझी माळ त्या मेल्याच्या गळ्यांत पडली, त्याच दिवसापासून माझ्या नशिबानं उलट खाऊन माझ्या दुःखाला प्रारंभ झाला. "

विषय फिरवण्यासाटीं नलिनी म्हणाली, " मामी, मला आजच रमाताईचं पत्र आलं आहे. तिनं मला दोन दिवसांत चौपाटीवर राहायला बोलावलं असल्यामुळं मला आतां तिकडे गेलं पाहिजे. तुमच्या पाहुणचाराचा लाभ मीं खूप दिवस घेतला नाहीं का ? "

"–कां ?–इतके जास्त दिवस राहिलीस का तूं इकडे ? मला आतांशी आपल्याभोवतीं चार माणसं असावीं असंच वाटायला लागलं आहे." एक सुस्कारा सोडून सरोजिनीबाई म्हणाल्या, " आतां माझं काय राहिलं आहे ! शरयू आतां लवकरच कमलाकराची होईल व तोही तिला अनुरूप आहे;–पण नली, हें ग काय ! तूं अशी मलूल कां दिसतेस ? "

सरोजिनीबाईंचा हा अकस्मात् आलेला प्रश्न ऐकतांच नलिनी जरा गोंधळली. नलिनी सुंदर व नाजुक दिसत असे. तिचा वर्ण गोरा असून, तिचे डोळे पाणीदार व तिचा चेहरा नेहमी सुहास्य असे. तिचा स्वभाव नेहमी आनंदी, उदार, प्रेमळ व थट्टेखोर होता. सरोजिनीबाईंचा तो प्रश्न ऐकून तिनें उत्तर दिलें,

" मला कांहीं होत नाहीं, मामी; रात्रीं झोंप मात्र चांगली लागली नाहीं. "

" याचें कारण स्वप्नं बरं ! " सरोजिनीबाई ठांसून म्हणाल्या, " रात्रीं मला तुझ्याविषयीं बरींच वाईट स्वप्नं पडलीं. मीं तुला जेवतांना पाहिलं. कुणालाही जेवतांना पाहिलं कीं त्याला तें स्वप्न अपायकारक होतं. तुझ्यावर कांहीं तरी संकट येत आहे हें खास.

" नको; आणखी त्याचा उल्लेख नको, मामी. " नलिनी दचकून म्हणाली, " पण-पण माझा स्वप्नांवर विश्वासच नाहीं मुळीं. "

" तुझा स्वप्नांवर विश्वास नाहीं, नली, पण माझा आहे." सरोजिनीबाई म्हणाल्या, " प्रत्यक्ष घडून आलेल्या गोष्टी मीं स्वतः पाहिल्या आहेत. त्या जर तुला सांगत बसेन तर तूं त्या ऐकून थक्कच होशील ! काय ग, तूं काल रात्रीं बाहेर कुठं गेली होतीस ?"

" कुठं नाहीं ग मामी, बागेंतच फिरत होतें थोडा वेळ. "

" चांदण्यांत मधुकराचं चिंतन करण्याकरतां वाटतं ? " असें सरोजिनीबाई तिची थोडी थट्टा करण्याच्या हेतूनें म्हणाल्या.

नलिनी हा प्रश्न ऐकतांच लाजली. तिचा कपोलप्रदेश आरक्त झाला.

"एवढं लाजायला काय झालं त्यांत ! " थोडा वेळ आठवल्यासारखें करून सरोजिनीबाई पुढें म्हणाल्या, " तो जरी नट असला तरी सुस्वभावी व सुशिक्षित आहे. "

" पण मामी, नटाचा धंदा कमी प्रतीचा आहे कीं काय ? "

" बरोबर ! " सरोजिनीबाई तिला खिजविण्याच्या हेतूनें म्हणाल्या, " मीं जरी तो धंदा वाईट म्हटला तरी तुझ्या मधुकरावरील प्रेमानं त्या धंद्याला उच्च प्रतीला नेऊन ठेवलं आहे ना ?"

" पण ते सभ्य आहेत. इतर नाटक्यांप्रमाणं दारूबाज व इतर व्यसनांत गुरफटलेले नाहींत ते."

" पण तुझ्या बहिणीला असं नाहीं ना वाटत ?"

" नसेल ! " नलिनी रागानें म्हणाली, " रमाताईच्या पसंतीकडे मला काय करायचं आहे ? "

" तूं म्हणते आहेस तें बरोबर आहे, नली. पण तिच्या नांवावर बरीचशी इस्टेट आहे हें विसरूं नकोस ! "

" बाबांनीं जितकी मिळकत तिच्या नांवावर केली आहे तितकीच मलाही दिलेली आहे. आमचे आईबाप आमच्या लहानपणींच आम्हां दोघांना या जगांत एकटी ठेवून निघून गेले. तेव्हांपासून आमच्या दोघांच्या इस्टेटीच्या येणाऱ्या व्याजावर आम्हीं आमची उपजीविका करीत आहों. " नालिनीला पुढें आपली हकीकत सरोजिनीबाईंना सांगण्यास संकोच वाटूं लागला. सरोजिनीबाईंच्या शब्दांनीं तिला आपल्या इच्छेविरुद्ध आपली हकीकत सांगण्यास प्रवृत्त केलें होतें, परंतु आपण हें काय करीत आहों असें तिचें तिलाच वाटून तिनें ती पुढें सांगितली नाहीं. सुदैवानें त्याच वेळीं सरोजिनीबाईंच्या मुलांची आरडा-ओरड ऐकूं येऊं लागली. ती कानीं पडतांच सरोजिनीबाईंनीं म्हटलें,

" काय द्वाड कारटीं आहेत हीं ! मारामाऱ्यांशिवाय यांना दुसरं कांहीं सुचतच नाहीं ! नले, जरा जाऊन त्यांना गप्प कर पाहूं."

तेथें बसण्याचा कंटाळा आल्यामुळें नलिनीलाही बाहेर जाण्यास कांहीं तरी कारण हवेंच होतें. सरोजिनीबाईंची आज्ञा होतांच ती त्या खोलींतून एकदम बाहेर पडली.

नलिनी खालीं गेली तेव्हा मुलांमध्यें भांडण चाललें होतें. एकमेकांना चिमटे काढणें व लाथांनीं बडविणें व मोठमोठ्यानें ओरडणें असा त्यांचा आकांत चालला होता. नलिनीनें एकदम मध्यें शिरून त्यांना दूर करीत म्हटलें,

" रघू, सुमन, तुम्ही आपल्या लहान भावंडांना असं भांडूं देतां ? तुम्ही दोघं आतां इतकीं मोठीं झालां तरी आपल्या लहान भांवडांचीं भांडणं नाहीं का मिटवतां येत तुम्हाला ? तुम्ही त्यांच्यांत वडील आहांत."

" आम्हीं काय करावं त्याला ? " सुमन म्हणाली, " आम्ही कांहीं त्यांना भांडायला सांगितलं नव्हतं. यांच्या गडबडीमुळं माझा अभ्यास मात्र होत नाहीं."

" व माझाही आल्जिब्रा होत नाहीं."

" मग तुम्ही इथं अभ्यास कां करतां ? शरयूच्या खोलींत कां बसत नाहीं ?" नलिनीनें त्यांना विचारलें. नलिनी आणखी पुढें बोलणार होती, परंतु तिला आपणास कोणी हाका मारीत आहे असा भास झाल्यामुळें तिनें दचकून मागें पाहिलें, तों शरयू तिच्याकडे घाईघाईनें येत होती, असें तिला दिसून आलें.

" नली ! नली !" शरयू ओरडत आली, " एक भयंकर बातमी तुला सांगायची आहे. "

" काय,–काय ग झालं ? " घाबरून नलिनीनें विचारलें.

" इकडून आणवलेली विलायतेची नवी मोटर काल रात्रीं कुणीं चोरानं पळवली. पण त्याहून भयंकर बातमी म्हणजे, तुमच्या रत्न-महालांत खून झाला आहे ! आतांच ही बातमी मला त्यांनीं सांगितली."

" काय ? खून !" " नलिनी तिचा हात घट्ट दाबीत म्हणाली, " कुणाचा ग ?" हा प्रश्न विचारतांना तिचे डोळे पाण्यांनीं भरून आले व तिची छाती धडधडूं लागली.

" कुणा स्त्रीचा खून झाला आहे. "

" स्त्री !" सुटकेचा एक निःश्वास टाकून नलिनीनें विचारलें, "कोण ग आहे ती ?".

" तें तर कुणालाच माहीत नाहीं. तिचं प्रेत सफेत दिवाणखान्यांत सांपडलं. तिच्या गळ्याला मागं शस्त्र खुपसून तिचा खून केलेला आहे. हे सांगत होते कीं, ती अगदीं तरुण असून दिसण्यांत सुंदर आहे व ज्यानं तिचा खून केला त्यानंच आपली मोटर पळवली असावी असं 'इकड'चं मत आहे. आतां तुला भेटण्यास इकडेच येणार आहेत."

" मला भेटायला ! मला भेटायचं कारण ? यांतलं मला कांहीं एक माहित नाहीं ! "

नलीनी घाबरल्याप्रमाणें दिसूं लागली.

" ती स्त्री घरांत आली कशी ? " तिनें शरयूला विचारलें, " तो आहे तरी कोण ?"

"अग, तेंच तर गूढ आहे." शरयूनें उत्तर दिलें,"ते जेव्हां इथं येतील तेव्हां तुला खुनाची सर्व हकीकत कळेल. पण आईला मात्र यांतील कांहीं एक सांगूं नको हो ! नाहीं तर ती आणखी अकांडतांडव करायची ! गजाननराव भेटेपर्यंत गप्प राहणं बरं, असं यांचं म्हणणं आहे व पोलिसांनींही गजाननरावांना ताबडतोब येण्यासाठीं तार केली आहे."

" पोलिस ! शरयू, पोलिसपर्यंत हें प्रकरण जाईल का ग ? "

" अर्थात्‌च ! कारण, एका पोलिसालाच तें प्रेत काल रात्रीं आढळून आलं. "

" पण तो पोलिस घरांत शिरला कसा ?" नलिनीनें विचारलें, " घराला तर कुलुप आहे व कुणी राखणदारसुद्धा तिकडे नाहीं. "

"सर्व हकीकत मला माहित नाहीं. कारण त्यांनीं मला सर्व कांहीं सांगितलं नाहीं. काय ग नली, " शरयू तिच्याकडे पाहत म्हणाली, " तूं काल रात्रीं तिकडे गेली होतीस ना ? "

" नाहीं ग. " चांचरत चांचरत नलिनीनें थोडया वेळानें उत्तर दिलें, " मी मधुकरांना भेटण्यासाठीं तिकडे जाणार आहें, असं तुला सांगितलं होतं खरं, पण मी कांहीं मग तिकडे गेलें नाहीं. रमाताई आमच्या लग्नाला अडथळा आणीत आहे हें तुला ठाउक आहे ना ? म्हणून तर मला त्यांची चोरून भेट घ्यावी लागते. अर्थातच त्या बंद केलेल्या घरांत आमची भेट होणं शक्य नाहीं. "

" पण काल तुझी आणि त्यांची भेट झाली का ग ? " शरयूनें सहजगत्या विचारलें.

" नाहीं. ते कदाचित् भेटतील असा विचार करून मी बागेच्या पलीकडे एका झाडाखालीं अर्धा तास उभी होतें. पण ते कांहीं त्या बाजूला आलेच नाहींत. "

" तसं त्यांनीं तुला वचन दिलं होतं का ? "

"छे ग ! सहज नशिबाची परीक्षा पाहण्याकरतां म्हणून मी गेलें होते. दुसऱ्या माणसानं नाटकांतलं स्वतःचं काम केल्यास निसटतां येईल अशी त्यांची समजूत होती. पण तें त्यांना करतां आलं नसावं असं वाटतं. "

" माझीसुद्धा हीच समजूत आहे. " शरयू म्हणाली, " पण हा खून भयंकर आणि चमत्कारिक आहे, नाहीं ? ती स्त्री कोण आहे व त्या घरांत आली कशी याचा तर्कच होत नाहीं ! "

" तेंच तर आश्चर्यकारक आहे. " नलिनी म्हणाली. तिचा चेहरा भीतीमुळें फिकट व चमत्कारिक झाला होता. " शरयू, मी काल रात्रीं बाहेर गेलें होतें तें तूं कमलाकरांकडे बोललीस का ? " थोड्या वेळानें तिनें प्रश्न केला.

" नाहीं; ऐकलेल्या गोष्टीमुळं मी तर इतकी आश्चर्यचकित झालें, कीं ती गोष्ट मी साफ विसरून गेलें. "

" मग त्याबद्दल तूं कुणाजवळ कांहींच बोलूं नको. नाहीं तर रमाताई मला तें समजल्यावर फारच त्रास देईल. "

## प्रकरण चवथें

# मोटर सांपडली !

रत्नमहालांतील खुनासंबंधीं साधारण हकीकत नलिनीला कमला-कराकडून समजली, व भीतिग्रस्त होऊन ती तशीच शरयू आणि कमलाकर यांची नजर चुकवून त्या खुनाच्या बाबतींत आणखी काय काय बाहेर पडतें तें समजून घेण्याकरितां रत्नमहालाकडे जाण्यास निघाली. रत्नमहालांतील खुनाची हकीकत हळूहळू दादर व माटुंगा ह्या विभागांत पसरत चालली होती व कांहीं चौकस लोक ' हें काय प्रकरण आहे ?' तें समजून घेण्याकरितां रत्नमहालाच्या आसपास जमूं लागले. लोकांत जरी खुनाची बातमी पसरली होती, तरी रत्नमहालांत--बंगल्यांत अगर बागेंत कोणीही पोलिसखात्यांतील माणूस दिसेना. नाहीं तर असें कांहीं तरी असलें म्हणजे त्या जागीं पोलिसांची रेलचेल असाव-याची, आणि हें समजूनच, पोलिस दिसला, कीं तेथें रिकामटेकडया माणसांचीं गर्दी उडून नसत्या चौकशीला सुरवात होणार हें माहित असल्यामुळें सर्जेरावांनीं पोलिसांचा पाहारा बंगल्याबाहेर न ठेवतां तो आंतच ठेवला होता व गजाननराव--त्या बंगल्याचे मालक येईपर्यंत त्या खुनाची विशेष वाच्यता होऊं नये अशी त्यांची इच्छा होती. त्या दुर्दैवी मयत स्त्रीचें प्रेत त्यांनीं बंगल्यांतील एका खोलींत ठेवून खोली-बाहेर एक पोलिस पाहारा करण्यास ठेवला होता. बंगल्यांतील इतर प्रत्येक वस्तु बाबुराव पहिल्यानें आंत शिरतांना होती, त्याप्रमाणेंच

होती. त्यांत यत्किंचितही फरक केला नव्हता; आणि सर्जेरावांनीं आपली बैठक सफेत दिवाणखान्यांतच ठेवून तेथूनच ते जरूरीचे हुकुम सोडीत होते.

" बाबुराव " ते म्हणाले, " जर एखादी तरुण स्त्री मला भेटायला आली तर तिला ताबडतोब आंत पाठवून द्या. इतर कोणालाही आंत सोडूं नका. "

" पण कमलाकर आले तर ? " बाबुरावानें विचारलें.

" त्यांना अर्थातच परवानगी आहे. मी त्यांचीच वाट पाहत आहें; पण त्यांच्याशिवाय इतर कोणीही येतां कामा नये. "

" आपण गजाननरावांना बोलावण्यास शिपाई पाठवला, साहेब ?"

" त्या तरुण स्त्रीकडून मला पत्ता मिळतांच मी ताबडतोब माणूस पाठवीन. अरे ! पण ती आली वाटतं. " ऐकूं येणाऱ्या बेलकडे लक्ष देत सर्जेराव म्हणाले, " होय; तीच ती. जा तिला आंत सोड. "

थोडया वेळानें नलिनी आंत आली. या वेळीं तिची मुद्रा फिकट व घाबरल्यासारखी दिसत होती. सर्जेरावांनीं तिच्या मुद्रेवरील हा विकार पाहिला; परंतु स्वतःच्या घरांत खून झाला असें ऐकतांच एखादी तरुण स्त्री घाबरून जाणें साहजिक आहे असा विचार करून त्यांनीं तिकडे विशेष लक्ष दिलें नाहीं. नलिनी जरी तरुण व अननुभवी होती, तरी तिची संयमनशक्ति दांडगी होती. आंत येतांक्षणींच तिनें आपले ओंठ मिटून आपल्या चेहऱ्यावर कसलेंच चिन्ह न दिसण्याचा प्रयत्न केला. सर्जेरावांनीं हें सर्व पाहून ठेवलें, तरीही त्यांना आपल्या प्रश्नापुढें ही टिकेल किंवा नाहीं याचा निर्णय करतां येईना.

" तुम्हीं माझ्यापासून कांहींही लपवून न ठेवतां मी विचारणार त्या प्रश्नांचीं उत्तरं सरळ द्याल ना ? " ती आंत येतांच सर्जेरावांनीं तिला जरा कठोर स्वरानें प्रश्न केला.

हा प्रश्न ऐकतांच नलिनीला राग आल्यावांचून राहिला नाहीं. तिनें सर्जेरावांकडे रागाची नजर फेकीत म्हटलें, "माझ्यासारख्याला तुम्हीं

असा प्रश्न विचारणं म्हणजं थोडंसं शिष्टाचाराला सोडून नाहीं का होणार ? तुम्हांला माझा संशय येतो का ? ”

“ छी ! छी ! तुमची गैरसमजूत झाली. मला तुमचा अगर कुणाचाच संशय नाहीं. प्रश्न विचारण्यांत माझा कोणताच अंतस्थ हेतु नाहीं. पण हें प्रकरण फारच चमत्कारिक आहे. ”

“ कमलाकरांनीं सांगितलेल्या हकीकतीवरून तें बऱ्याच गुंतागुंतीचं असावं अशी माझी समजूत आहे. ” नलिनीनें उत्तर दिलें.

“ हें घर बंद असून मालकानं आपल्यामागें कोणी राखणारा ठेवला नाहीं हें कसं ? ”

“कारण राखणदार ठेवण्याची मुळींच जरूर नव्हती.” नलिनी म्हणाली, “माझ्या बहिणीला दादरच्या ह्या विभागांत चोऱ्या,दरवडे यांपासून भय नाहीं असं वाटल्यामुळं तिनं पोलिसांनाही या बंगल्यावर नजर ठेवायला सांगितलं नाहीं.”

“ ती मंडळी इथं राहायला केव्हां येणार ? ”

“ एका महिन्यानं. ”

“ तुम्ही त्यांच्याबरोबर गेलां नाहीं वाटतं ? ”

नलिनीनें नकारार्थी आपली मान हालविली. ती म्हणाली, “माझ्या बहिणीचं व माझं पटत नसल्यामुळं मी हें घर बंद असेपर्यंत माझ्या एका मैत्रिणीच्या घरीं राहिलें आहें. ”

“ह्या घराचा मालक अगर इतर कोणीही मंडळी इथं नसतांना आणि घर बंद असतांना किंवा आंत शिरकाव झाला कसा हेंच गूढ आहे. ती इथं शनिवारीं रात्रीं आली. कोणत्या वेळीं आली,आंत येते वेळीं तिच्याबरोबर दुसरं कोणीं होतं किंवा नाहीं यासंबंधाची बातमी आम्हांला अद्यापि मिळालेली नाहीं. कारण आंत येतांना तिला कोणीं पाहिलं नाहीं. ती आली तरी कशी ? ”

“तें मला कसं बरं सांगतां येणार ? ही सर्व हकीकत ऐकून तुमच्याचप्रमाणं मीही गोंधळून गेलें आहें. पण तिचं प्रेत मला पाहायला

मिळेल का ? ती माझ्या ओळखीची आहे कीं नाहीं, हें तरी मला मग सांगतां येईल. ”

“ तें आपण मागाहून पाहूं. ” सर्जेराव म्हणाले, “ मला तुम्हाला कांहीं प्रश्न विचारायचे आहेत; त्यांचीं उत्तरं कृपा करून माहित आहेत तशीं द्या. जर ही स्त्री तुमच्या मेहुण्याच्या परिचयाची असती तर तिला त्यांच्याप्रमाणें ह्या घरांत येणं शक्य आहे का ?”

“ केव्हांही नाहीं. कारण या घराच्या मुख्य दरवाजाची किल्ली फक्त माझ्या मेहुण्याजवळच असते. ”

“ तशीच चावी दुसऱ्या कुणाजवळ नाहीं याविषयीं तुमची खात्री आहे का ?”

या प्रश्नाचें उत्तर देते वेळीं, आपलें मनःसंयमन करतां येण्यास अवसर मिळावा, व आपला चेहरा पोलिस इन्स्पेक्टरला दिसूं नये या हेतूनें नलिनी खिडकीबाहेर पाहत म्हणाली, “ तसली किल्ली दुसऱ्या कुणाजवळ असेल असं निदान मला तरी वाटत नाहीं. ”

ह्या उत्तरानें सर्जेरावांचें समाधान झाल्यासारखें दिसलें व त्यांनीं खिशांतून एक ‘नोटबुक’ काढून म्हटलें, “ हे गजाननराव कोण ?”

“ते माझे मेहुणे असून सावे आणि कंपनीचे दुसरे भागीदार आहेत.” नालिनीनें उत्तर दिलें, “ त्या कंपनीचा लांकडाचा व्यापार आहे. ”

“ असं ! मग त्यांचं नांव त्यांत कुठं नाहीं तें ? ”

“ ती कंपनी बरीच जुनी असून तिचे एकंदर दोन भागीदार आहेत. माझा सख्खा भाऊ सावे व दुसरे गजाननराव. जेव्हां माझे वडील वारले तेव्हां त्या कंपनीचं नांव सावे आणि कंपनी असंच होतं. कंपनी जुनी असल्यामुळं गजाननराव जरी तिचे भागीदार झाले तरी माझ्या भावानं नांवांत फरक केला नाहीं. ”

“ गजाननराव केव्हां भागीदार झाले ? ”

“ तीन वर्षांपूर्वीं; म्हणजे जेव्हां त्यांचं माझ्या बहिणीबरोबर लग्न झालं तेव्हां. ”

" भागीदारीचे पैसे गजानरावांनींच दिले का–" सर्जेराव आणखी कांहीं विचारणार होते; परंतु नलिनीची साश्चर्य मुद्रा पाहतांच ते म्हणाले, " माफ करा हं नलिनीबाई; पण मला सर्व कांहीं समजलंच पाहिजे."

" मला वाटतं ह्या धंद्यांत गजाननरावांनीं पैसे घातले नसावेत. माझ्या बहिणीजवळ बरीच पुंजी असल्यामुळं तिनं गजाननरावांच्या नांवानं भागीदारीसाठीं माझ्या बंधूला बरेच पैसे दिले." नलिनी म्हणाली, "याहून अधिक माहिती तुम्हांला पाहिजे असल्यास ती तुम्ही गजाननराव यांना विचारा."

" तसाच माझा बेत आहे. तुम्ही मला त्यांचा पत्ता द्याल का ? "

" दर्यामहाल, चौपाटी रोड. " सर्जेरावांनीं तो पत्ता टिपून घेतला.

" मी त्यांना बोलवण्याकरतां टेलिफोन करणार आहें." ते म्हणाले, " कारण उद्यां ह्यासंबंधानें चौकशी होणार असल्यामुळं त्यांना जरूर हजर असलं पाहिजे. बरं, पण तुम्हांला एक साधारण सडपातळ व लहानशी टोंकदार दाढी असलेला तरुण गृहस्थ माहित आहे का ? "

" अंऽहं, नाहीं ! " आठवण करीत नलिनी म्हणाली, "पण कां ?"

"तसाच एक गृहस्थ काल रात्रीं या घरांतून बाहेर पडला व त्यानंच पोलिसाला बोलत बोलत दूर नेलं व तेवढया वेळांत दुसऱ्या इसमानं त्या बाईचा प्राण घेतला."

" मग ह्या कामांत एकंदर दोन माणसं होतीं तर ? "

" आमची तरी अशी समजूत आहे." सर्जेरावांनीं उत्तर दिलें.

" गजाननराव गेल्यापासून तुम्ही इकडे कधीं आलां होतां का ? " त्यांनीं विचारलें.

" नाहीं. "

" पण तुम्हीं सध्या राहतां तें ठिकाण या घराहून अगदीं जवळ आहे, नव्हे ?"

" तरी पण मला इथं यायचं कांहींच कारण नाहीं. "

" तुम्हीं त्याच घरांत राहतां ?"

" होय. माझ्या बहिणीबरोबर मी इथंच राहतें. "

" मग तुमच्या रोज उपयोगांत येणाऱ्या वस्तु इथंच असतील तर !"

नलिनीनें सर्जेरावांचा प्रश्न विचारण्याचा रोख ओळखून त्यांच्याकडे तीक्ष्ण नजरेनें पाहत म्हटलें, " जरी माझ्या सर्व जिनसा इथंच असतात तरीही मी जणूं काय लांबच्याच प्रवासाला जात आहें असं समजून जरूरीपुरत्या सर्व वस्तु माझ्याबरोबर नेलेल्या आहेत. इन्स्पेक्टरसाहेब, जवळ जवळ दोन आठवडे मी भवान्यांच्या घरीं राहिलें आहें व तेवढ्या वेळांत या बाजूलाही फिरकलें नाहीं. "

" तुम्ही ह्या रस्त्यावरूनसुद्धा कधीं गेलां नाहीं ?"

" मी या बाजूलाच कधीं आलें नाहीं. "

" मग तुम्हांला कांहींच माहित नसणार. " आपण केलेल्या प्रश्नांपासून कांहींच निष्पन्न झालें नाहीं असें पाहून निराशेच्या स्वरानें सर्जेराव म्हणाले.

" खरोखरच कांहीं माहित नाहीं मला. "

सर्जेराव आपला हात हनुवटीकडे नेऊन व आपली दृष्टि जमिनीकडे वळवून विचार करूं लागले. नलिनीला विचारण्यासारखें आणखी कांहींच नव्हतें. रत्नमहालाचे मालक गजाननराव हे होते व त्याच घरांत ज्या अर्थीं त्या अनोळखी स्त्रीचा खून झाला होता त्या अर्थीं त्या घरांत तिचा शिरकाव कसा झाला हें कदाचित् त्यांनाच माहित असेल.

" सावे आणि कंपनीचे भागीदार होण्यापूर्वीं गजाननराव काय करीत होते ?" थोडया वेळानें त्यांनीं नलिनीला विचारलें.

"कांहीं नाहीं. " नलिनीनें उत्तर दिलें, " त्यांनीं आपला सर्व वेळ हिंदुस्थानांतील निरनिराळे गांव पाहण्यांत घालवला व मग त्यांना अशा रीतीनं आयुष्य घालविण्याचा कंटाळा आला असावा असं मला वाटतं. तथापि लग्न झाल्यानंतर माझ्या बहिणीनं त्यांना कंपनीचा भागीदार होण्यास सांगितलं. "

" हुः !" सर्जेराव ह्या उत्तरानें प्रस्तुत विषयावर कांहींच प्रकाश पडत नाहीं असें पाहून म्हणाले. नंतर त्यांनीं सर्व दिवाणखानाभर एकदा नजर फेकीत विचारलें, " ह्या दिवाणखान्याची रचना चमत्कारिक दिसते ! नलिनीबाई, ही तुमच्या बहिणीचीच कल्पना का ? "

" नाहीं; गजाननरावांचीच ही कल्पना. हें घरही लग्नापूर्वी त्यांनींच बांधलं होतं. रमाबाईला हा दिवाणखाना मुळींच आवडत नाहीं. परंतु गजाननरावांना मात्र याची फारच आवड आहे. हें घर व आंतील सर्व सामान गजाननरावांनीं आपल्या लग्नापूर्वीच घेतलेलं आहे. "

" लग्न झाल्यानंतर राहण्यासाठीं वाटतं ? "

" नाहीं; माझ्या बहिणीबरोबर लग्न होण्यापूर्वीच गजाननराव या घरांत राहत असत. "

सर्जेरावांना हें फारच चमत्कारिक वाटलें ! तथापि याहून अधिक प्रश्न त्यांनीं तिला विचारले नाहींत. " नलिनीबाई, " कांहीं वेळानें ते म्हणाले, "तुम्ही माझ्या सर्व प्रश्नांचीं उत्तरं मोकळेपणानं दिल्याबद्दल मी तुमचा आभारी आहें. माझ्याकडून जर तुम्हांला एखादा कमीअधिक प्रश्न विचारला गेला असेल तर ह्या खुनाच्या चमत्कारिकपणाकडे लक्ष देऊन त्याबद्दल मला क्षमा करा; आपण आतां तें प्रेत पाहूं. "

प्रेत पाहण्याची कल्पना मनांत आल्यामुळें नलिनी थोडी घाबरल्या-प्रमाणें दिसूं लागली. परंतु तसें करण्यास तिनें आपली नाखुषी दर्श-विली नाहीं. ती उठून मुकाट्यानें सर्जेरावांच्या मागोमाग गेली; परंतु ज्या खोलींत तें प्रेत ठेविलें होतें त्या खोलीच्या दरवाजापाशीं येतांच मात्र दचकून ती रागानें म्हणाली, " तुम्ही तें प्रेत माझ्या खोलींत ठेवलं आहे ! "

" अज्ञानामुळं असं घडलं खरं ! " सर्जेराव म्हणाले, "पण दुसऱ्या कुणाच्याही खोलींत ठेवलं असतं तरी त्यानंही असंच म्हटलं असतं. "

" याउप्पर मला या खोलींत केव्हांही निजतां नये," असें पुटपुटत सर्जेरावांनीं उघडलेल्या दरवाजांतून नलिनी आंत शिरली.

नलिनीला आंत सोडून आपण तिच्याबरोबर आंत न जातां सर्जेराव तिनें दिलेल्या माहितीवर विचार करीत बाहेरच उभे राहिले. गजाननरावांनीं घर बांधल्यानंतर कांहीं दिवसांनीं लग्न केलें व ते आपल्या पत्नीसह येथें येऊन राहिले. परंतु लग्नापूर्वी स्वतःसाठींच त्यांनीं एवढें मोठें घर बांधलें असेल काय? कदाचित् त्यांनीं आपणासाठीं पूर्वी दुसरी एखादी कुमारी ठरविलेली असून तिच्या आवडीप्रमाणें हें घर तयार केलें असेल. परंतु कांहीं तरी कारणामुळें तें लग्न मोडून त्यांचें मग नलिनीच्या बहिणीबरोबर लग्न लागलें असावें. रमाबाईंना तो सफेत दिवाणखाना मुळींच आवडत नाहीं, असें नलिनीच्या सांगण्यावरून दिसतें. अर्थातच हें लग्न होण्यापूर्वी गजाननरावांचें प्रेम दुसऱ्या कोणावर तरी बसलें असून तिच्या आवडीप्रमाणें त्यांनीं हें घर बांधलें असेल. परंतु तिच्याबरोबर संबंध फिसकटल्यामुळें नंतर त्यांनीं हें लग्न करून रमाबाईंना ह्या घरांत आणलें असावें. तें कांहीं असो; परंतु ह्या बंगल्याची चावी गजाननरावांकडेच असतां ती स्त्री आंत तरी आली कशी? कदाचित् त्यांच्याच मदतीनें तर ती आंत शिरली नसेल?— परंतु सर्जेरावांची विचारमालिका येथेंच थांबली. त्यांना, आपण भलत्याच मार्गानें जात आहों असें कळून चुकलें व कच्च्या पायावर आपण आपलें विचारगृह उभारीत आहों, अशी त्यांची खात्री झाली. प्रत्यक्ष गजाननरावांना पाहिल्याशिवाय व ते कसल्या प्रकारचे गृहस्थ आहेत हें समजल्याशिवाय भलताच विचार करणें योग्य होणार नाहीं व तसें केलें असतां खरा मार्ग आपणास कधींही लाभणार नाहीं असें त्यांना वाटलें; परंतु स्वतःच्या समाधानाकरितां त्यांनीं आणखी कांहीं प्रश्न नलिनीला विचारण्याचें ठरविलें.

थोड्या वेळानें नलिनी खोलीबाहेर आली. तिच्या चेहऱ्यावर अद्यापिही तसाच फिकटपणा दिसत होता. बाहेर येतांक्षणींच आपण त्या स्त्रीला ओळखत नाहीं असें तिनें सर्जेरावांना कळविलें.

" तुमची अगदीं खात्री आहे ? " सर्जेरावांनीं प्रश्न केला.

" अगदीं पूर्ण खात्री आहे. यापूर्वी मीं तिला कधींच पाहिलेली नाहीं. " नलिनीनें व्यथित अंतःकरणानें उत्तर दिलें, " खरोखरच ती सुंदर असून तिच्या चेहऱ्यावरून ती पंचवीस वर्षांची असावी असं दिसतं. ती इथं कां बरं आली असावी ? " तिनें विचारलें.

" तोच तर प्रश्न आहे ! " सर्जेराव म्हणाले, " तिचा खून तरी कुणीं केला ? "

" अशा अबलेवर आपला हात चालवायला त्याला कांहींच दयामाया कशी आली नाहीं याचंच आश्चर्य वाटतं. याच्या मूळाशीं काय असेल तें असो !"

" तरी हें फार वेळ लपून राहणार नाहीं. ज्या अर्थी ह्या घराची चावी एकटया गजाननरावांपाशींच आहे, त्या अर्थी ते हिला ओळखीत असलेच पाहिजेत. "

" होय, फक्त त्यांच्याजवळच—" परंतु आपलें वाक्य पुरें होऊं न देतां मध्येंच नलिनीनें सर्जेरावांना प्रश्न केला, " म्हणजे या खुनाची थोडीबहुत माहिती त्यांना असावी असं तुमचं म्हणणं आहे कीं काय?"

" पण ह्या बंगल्याची किल्ली जर त्यांच्या एकटयाचजवळ—"

" पण आतांच तुम्ही, तुमच्या हाताखालच्या एका पोलिसाला भेटलेल्या, एका टोंकदार पण लहानशी दाढी राखणाऱ्या गृहस्थाजवळ तसली चावी होती असं सांगितलं. "

" तें खरं. पण—गजाननरावांना दाढी आहे का ? "

" मुळींच नाहीं. "

" कदाचित् त्यांनीं तसा वेष घेतला असावा. "

" असं बोलणं म्हणजे या कृत्यांत त्यांचं अंग आहे असा आरोप तुम्ही त्यांच्यावर ठेवतां." नलिनी म्हणाली, "या खुनाविषयीं गजाननरावांना कांहींएक माहिती नाहीं, अशी माझी पूर्ण खात्री आहे व गेल्या रात्रीं ते चौपाटीवर आपल्या बंगल्यांत आजारी होते. याचा तुम्हांला पुरावा पाहिजे असल्यास कालच संध्याकाळीं मला माझ्या

बहिणीकडून आलेलं पत्र मी तुम्हांला दाखवतें. आजपासून तिच्याकडे मी राहायला जाणार होतें; पण गजाननराव आजारी असल्यामुळं मी तिकडे सध्या आणखी दोन दिवस येऊं नये अशा अर्थाचं पत्र तिनं मला पाठवलं आहे. ”

हें ऐकून सर्जेरावांची निराशा झाली. गजाननराव जर आपल्या घरांत आजारी असल्यामुळें निजून होते तर बाबुरावाला भेटणारा गृहस्थ गजाननराव खास नव्हे, अशी त्यांची खात्री पटत चालली.

“ तुम्ही मला तें पत्र दाखवाल का ? ” त्यांनीं विचारलें.

“ मी घरीं गेल्यावर तें इकडे पाठवून देईन. ” नलिनी म्हणाली, “ शिवाय मी तुम्हांला अगदीं खात्रीपूर्वक सागतें, कीं गजाननरावांना जेव्हां तुम्हीं पाहाल तेव्हां असा गुन्हा त्यांच्या हातून घडणं शक्य नाहीं अशी तुमची खात्री झालीच पाहिजे. त्यांच्यासारखा दयाळु व चांगला माणूस मिळायचा नाहीं. ” थोडा वेळ थांबून ती पुढें म्हणाली, “ बरं, पण तिचा खून कशा रीतीनं केला ? ”

“गात असतांना तिच्या गळयाच्या मागं खंजीर खुपसून ! ! ”

“ गात असतांना ! म्हणजे ! ती इथं गात होती कीं काय ? ह्या अनोळखी घरांत कां गात होती ? ”

“ कां गात होती तें सांगतां येणार नाहीं. पण ती गात असलेलं पद सौभद्र नाटकांतलं ‘ किति किति सांगू तुला ’ हें होतं. ”

“ हें तर रमाताईचं अत्यंत आवडतं गाणं ! ” आश्चर्य वाटून नलिनी म्हणाली.

“ हो खरंच ! तुमची बहीणसुद्धा चौपाटीवरच आहे ना ? ”

“ अर्थात्‌च ! गजाननराव तिकडे असतांना ती दुसरीकडे कशी बरं असेल ? तुम्ही तिच्यावर खुनाचा आरोप नाहीं ना ठेवीत ? ”

“ मी सध्या कुणावरच आरोप ठेवीत नाहीं. ” सर्जेराव म्हणाले, “कोणत्याही बाजूनं ह्या खुनाच्या शोधाला आधार मिळतो कीं काय तें पाहत आहें. ”

" मग खरा मार्ग सोडून भलत्याच मार्गाचा अवलंब कां करतां ? "

" खरा मार्ग तो आणखी कोणता ? "

" ज्या शस्त्रानं तिचा खून झाला त्या शस्त्रापासून तुम्ही सुरवात कां करीत नाहीं ? "

" आम्ही तो सुद्धा प्रयत्न करायचं ठेवलं नाहीं. पण तें शस्त्रच कुठं मिळत नाहीं ! खुनी इसम आपल्यामागं तें शस्त्र ठेवून आपली मान फांसावर चढवण्याइतका मूर्ख नसतो ! तें शस्त्र आपल्याबरोबर तो घेऊन गेला. जखमेच्या आकारावरून, एका अरुंद पातीच्या खंजिरानं खून केलेला आहे असं डॉक्टरचं म्हणणं आहे. "

" खंजीरासारख्या शस्त्रानें खून करण्यांत येतो तर ! "

" खून करणाऱ्याला कसलंही शस्त्र चालतं व खंजीरासारखं शस्त्र एखादी स्त्रीसुद्धा वापरूं शकेल. पण वादविवाद करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. खुनी पुरुष आहे किंवा स्त्री आहे हें आपणाला अजून समजलेलं नाहीं. "

सर्जेरावांचा अशा तऱ्हेनें बोलण्याचा आशय नलिनीला समजेना. ती विकारशून्य दृष्टीनें त्यांच्याकडे पाहूं लागली.

" तुम्हांला कसं सांगावं तेंच मला कळत नाहीं. " सर्जेराव थोडा विचार करून म्हणाले, "आपणाला, त्या स्त्रीला ह्या बंगल्याची चावी कशी मिळाली हें जरी माहीत नाहीं तरी ती दोन मनुष्यांना भेटण्याकरतां या घरांत आली होती अशी माझी समजूत आहे. "

" दोघांना ! " आश्चर्यचकित होऊन नलिनीनें विचारलें.

" होय. त्यांपैकीं एकानं बोलत बोलत बाबुरावाला दूर नेलं, " सर्जेराव सांगूं लागले, " व तेवढ्या वेळांत दुसऱ्यानं तिचा खून केला. आपल्या समजुतीसाठीं आपण असं समजूंया कीं, ती स्त्री त्या दोन माणसांना भेटली; थोड्या वेळानं त्यांना बंगल्यासमोरील रस्त्यावर बाबुराव दिसला. अर्थात् त्याला दूर नेण्याकरतां त्यांतील एकजण बाहेर पडून

दुसरा तिथंच राहिला. पहिला इसम निघून जाण्याच्या सुमाराला ती स्त्री ' किति किति सांगु तुला ' हें गाणं गाऊं लागली व थोडयाच वेळांत ती त्यांत रंगूनही गेली. खुनी इसमानं तिच्या मागं उभा राहून वेळ येतांच आपल्या हातांतील खंजीर तिच्या गळ्याच्या मागील बाजूला खुपसला व तिचा प्राण गेला असं पाहून तोही तिथून निघून गेला. "

" पण मघाशीं तुम्ही पहिला माणूस पोलिसाला दूर घेऊन जाण्यापूर्वींच गाणं चालू होतं असें सांगितलं, नव्हे ? "

" अर्थात्. पण त्या स्त्रीनं तो पहिला इसम निघून जातांच गाणं म्हणायला सुरवात केली असावी. "

" त्याच्याही पूर्वी." नलिनी म्हणाली, "कारण पहिला इसम बाहेर पडण्यापूर्वींच पोलिसांना तें गाणं ऐकूं येत होतं व तें ऐकण्यासाठींच तर तो थांबला. तुम्ही मला मघाशींच सांगितलंत त्यावरूनच मी हें सांगतें आहें. यावरून तुमच्या आतांच्या व मघांच्या सांगण्याचा मेळ जमत नाहीं. "

हें ऐकून सर्जेरावांच्या भिवया आपोआप वर चढल्या. " ही गोष्ट बरोबर जुळवणं अगदीं कठीण आहे. " ते म्हणाले, " कादंबऱ्यांतील डिटेक्टिव आजकाल मिळणं मुष्कील झालं आहे. कादंबऱ्यांतून वर्णन केलेलीं गुप्त पोलिसांच्या चातुर्याचीं कथानकं जगाच्या रणमैदानांत पाहायला मिळणं शक्य नाहीं. मी काय, यःकश्चित् मनुष्य ! खरा मार्ग सांपडेपर्यंत मी नानातऱ्हेच्या कल्पना लढवणारच. गजाननरावांची भेट होईपर्यंत या बाबतींत अधिक कळणं शक्य नाहीं. ज्या अर्थीं ही स्त्री त्यांच्या घरांत आली त्या अर्थीं तिची माहिती—"

" त्यांना यांतलं कांहीं एक माहित नाहीं, " नलिनी मध्येंच उतावीळपणें म्हणाली, " त्यांना माहित असणं शक्य नाहीं. कारण ते चौपाटीवर आपल्या बंगल्यांत आजारी आहेत. "

"गजाननरावांचं या बाबतींत काय म्हणणं आहे तें ऐकून घेतल्याखेरीज माझी खात्री पटणं शक्य नाहीं. " ते म्हणाले.

विशेष कांहीं विचारण्यासारखें राहिलें नाहीं असें पाहून सर्जेरावांनीं नलिनीला जाण्याची मोकळीक दिली व तिला पोचविण्याकरतां ते खालींत दरवाजापर्यंत आले. त्यांनीं दरवाजा उघडतांच त्याच वेळीं बाहेरून आलेला कमलाकर आंत घुसून ओरडला, "माझी मोटर सांपडली !"

"कुठं ?" सर्जेराव व नलिनी या दोघांनीं एकदम प्रश्न केला.

"ठाणें स्टेशनच्या यार्डमध्यें !"

हें ऐकतांच नलिनी सर्जेरावांकडे वळून म्हणाली, "इन्स्पेक्टरसाहेब, आपण हें नीट ध्यानांत ठेवा. ठाणं व चौपाटी यांमधील अंतर लक्षांत आणून, काल रात्रीं बाबुरावांना भेटलेला मनुष्य गजाननराव खास नव्हे, याची खात्री करून घ्या. कारण चौपाटीवर जाण्याकरतां ते ठाण्याला मोटर नेण्याइतका मूर्खपणा करणार नाहींत."

"पण मीं त्यांच्यावर अजून आरोप ठेवलेला नाहीं !" सर्जेराव उद्गारले.



प्रकरण पांचवें

## लोकमत !

रत्नमहालांतील खुनाची हकीकत आतां प्रुट्कर्णीं झाली असून त्या हकीकतीनें लोकांत मोठी खळबळ उडवून दिलेली होती. दादर व मांटुगा या विभागांतील लोक, त्यांच्या बाजूला असला खुनाचा प्रकार केव्हांच घडला नसल्यामुळें गांगरून गेले होते. त्यांची बाजू पूर्वीं अगदीं शांत, कसलीही गडबड नाहीं व कोणाचाही त्रास नाहीं अशी होती; परंतु तीच आतां वरच्यावर गुप्त पोलिस, पोलिसखात्यांतील अंमलदार, वर्तमानपत्रांचे बातमीदार, व इतर रिकामटेकडे व आळशी लोक यांनीं गजबजून गेली होती. पूर्वीची शांतता त्या जागीं सध्यां तरी दिसत नव्हती. गजाननराव व रमाबाई हीं दोघें आपल्या मुलीला, तिची दाई सोना, हिच्याकडे सोंपवून लवकर होणाऱ्या चौकशीकरितां तिकडे आलीं होतीं. खुनाची चौकशी रत्नमहालापासून जवळच असलेल्या एका सार्वजनिक जागेंत होणार होती. जगन्नाथपंतांनीं येतांक्षणींच त्या स्त्रीचें प्रेत तेथून हालविण्याची आपली इच्छा प्रदर्शित केली.

" तिचें प्रेत त्याच वेळीं येथून नेलें पाहिजे होतें. " ते सर्जेरावास म्हणाले, " ती स्त्री कोण आहे तें कांहीं मला माहित नाहीं व मीं तिला कधींही पाहिलेलें नाहीं. "

" ह्या घराची चावी तुमच्या एकट्याजवळच आहे का ? " सर्जेरावांचे तीक्ष्ण डोळे गजाननरावांवर खिळले होते.

"मुख्य चावी एक माझ्याजवळच आहे !" गजाननरावांनीं उत्तर दिलें, "पुढील दरवाजाचं कुलुप एका विवक्षित रचनेचं असून त्याला माझ्या किल्लीशिवाय दुसरी कुठचीच किल्ली लागायची नाहीं. ही पाहा ती." असें म्हणून गजाननरावांनीं आपल्या खिशांतून एक लांब बारीक चावी बाहेर काढली. ती पाहतांच सर्जेरावांनींही आपल्या खिशांतून बाबुरावास मिळालेली दुसरी किल्ली बाहेर काढली. त्या दोन्ही चाव्या सर्व तऱ्हेनें अगदीं सारख्या होत्या. "ही पाहा तुमच्या चावीची दुसरी नक्कल." सर्जेराव म्हणाले, "बाबुरावानं जेव्हां ही चावी माझ्या-जवळ दिली तेव्हां ही अगदीं नवी होती."

"ही चावी तुम्हांला कुठं मिळाली ?"

"ज्यानं बाबुरावाला बोलत बोलत दूर नेलं त्याच्या खिशांतून ही पडली."

"मग मोठाच चमत्कार म्हणायचा !" गजाननराव आश्चर्यचकित होऊन म्हणाले, "हा काय घोटाळा आहे तें मला समजत नाहीं. ज्या लोहारानं माझी चावी बनवली त्यानं दुसरी तयार केली असेल असं मला नाहीं वाटत. कारण मीं त्याला तसं न करण्याबद्दल पुन्हा पुन्हा बजावलं होतं."

"त्याचा पत्ता तुमच्याजवळ आहे का ?"

"होय. पण तो मुंबईला माझ्या ऑफिसांत आहे. मी तो तुम्हांला देईन. तो लोहार अगदीं विश्वासू आहे याची मला खात्री आहे."

"अस्सं !" सर्जेराव आपले खांदे उडवीत म्हणाले, "पण असले विश्वासू लोक कधीं कधीं पैशाच्या लोभाला बळी पडणं अशक्य नाहीं."

"पण ह्या अनोळखी स्त्रीचा प्राण घ्यायला खुनी इसमानं तिला माझ्याच घरांत कां बरं आणलं ?"

"तें कसं बरं सांगतां येणार ? आपणाला तेंच तर शोधून काढा-यचं आहे. ती स्त्री तुमच्या मुलींच ओळखीची नाहीं ? तिला तुम्ही कधींच पाहिलेलं नाहीं का ?" सर्जेरावांनीं संशयित वृत्तीनें विचारलें.

गजाननराव हे चलाख, उल्हसित वृत्तीचे, परंतु साधारण मुखदुर्बल असे होते. नलिनीनें सांगितल्याप्रमाणें ते आजारी असल्यामुळें त्यांची

जरी इच्छा नव्हती तरी पोलिस अंमलदाराकडून बोलावणें आल्यामुळें त्यांना रत्नमहालांत येणें भाग पडलें व त्यामुळेंच त्यांचा चेहरा सध्या जरा उतरलेला दिसत होता. सर्जेरावांनीं वरील प्रश्न विचारतांच ते घोटाळल्याप्रमाणें झाले. परंतु तावडतोब सांवरून त्यांनीं थोड्याशा क्रोधयुक्त स्वरानें म्हटलें, " ह्या खुनांत माझा हात असावा असं तुम्ही मला अप्रत्यक्षपणं सुचवतां का ? "

" तसं नव्हे. पण ज्या अर्थी ती इकडेच आली त्या अर्थी तिची-तुमची ओळख असावी अशी आपली माझी समजूत झाली. " सर्जेराव वरमल्यासारखें दाखवून म्हणाले.

" तुमचं म्हणणं बरोबर आहे. कुणालाही तसं वाटणं साहजिक आहे; पण वास्तविक पाहतां तशी गोष्ट नाहीं. या स्त्रीला मी आजच प्रथम पाहत असून ती माझ्याच घरांत कशी आली याचाच मला अचंबा वाटत आहे. माझी तिची ओळख असून तिच्या खुनांत माझं अंग आहे असा कुणाचाही समज होणं शक्य आहे. पण हें विधान फेटाळून लावण्याकरतां, ज्या वेळीं हा खून घडला त्या वेळीं मी चौपाटीवरच्या बंगल्यांत होतों हें मला सिद्ध करून दाखवतां येईल. तसंच, जरी मी आजारी नसून या स्त्रीचा व माझा परिचय असता तरी मीं तिला तिचा प्राणघात करण्यासाठीं खुद्द माझ्याच घरीं कधींही आणलं नसतं. "

" नाहीं नाहीं ! तुमचं म्हणणं अगदीं बरोबर आहे. " सर्जेराव ओशाळून म्हणाले, " तसं म्हणण्याचा माझा हेतु नव्हता. पण तसा संशय आलाच, तर त्याच्या मुळाशीं ही चावी आहे. तुमच्या हातून ही कधीं हरवली होती का ? "

" कधींच नाहीं. मी ही माझ्या जानव्यांतच नेहमीं अडकवून ठेवतों व फक्त उपयोगाच्याच वेळीं बाहेर काढतों. आमचं घर क्वचितच बंद राहत असल्यामुळं तिचा उपयोगही फारसा होत नाहीं. तसंच, इतरांच्या हातीं ती मी मुळींच जाऊं देत नाहीं. माझ्या पत्नीला मात्र ती पाहिजे तेव्हां मिळूं शकते. पण तिच्याबद्दल तुम्ही संशय घेणार नाहीं ना ?

हो! सर्वच पोलिसखातं संशयी असतं म्हणून म्हणतों. तिनंच या चावीप्रमाणं दुसरी चावी बनवून घेतली असा तुम्ही तिच्यावर आरोप करणार नाहीं अशी मला खात्री आहे. " गजाननरावांनीं म्हटलें.

" रमाबाई तरी त्या दुर्दैवी स्त्रीला ओळखतात का ? " सर्जेरावांनीं त्यांच्या भाषणाकडे दुर्लक्ष करून विचारलें.

" नाहीं; मी खात्रीनं सांगतों कीं, तिनं हिला कधीं पाहिलंसुद्धा नसेल. "

" फारच चमत्कारिक तर ! तिचा ह्याच जागीं खून कां व्हावा हें कांहीं मला कळत नाहीं. "

" तुम्हांला तिचं नांव माहित नाहीं का ? " गजाननरावांनीं विचारलें.

" नाहीं. ती कोणालाही नकळत तुमच्या घरांत आली असून काळाच्या भक्ष्यस्थानीं पडली आहे, यापेक्षां अधिक माहिती आम्हांला कांहींच नाहीं. आतां हिची चौकशी होईल त्या वेळीं काय बाहेर येईल तें पाहूं या. "

" माझीही तीच इच्छा आहे. " गजाननराव म्हणाले, " आतां आपली रजा घ्यायला हरकत नाहीं ना ? "

" आणखी एकच मिनिट थांबा. " ते जावयास निघाले असें पाहून सर्जेराव म्हणाले, " एक लहानशी व अणकुचीदार दाढी राखणारा असा एखादा इसम तुमच्या परिचयाचा आहे का ? "

" छे ! मला कांहीं असा मनुष्य कुठं पाहिल्याचं आठवत नाहीं. " गजाननराव आठवण करून म्हणाले, " व कदाचित तसला मनुष्य मला कुठं दिसला असला तरी सध्या कांहीं आठवत नाहीं. "

" ठीक आहे. " सर्जेरावाच्या मुखांतून एक निराशेचा उद्गार बाहेर पडला, " आपणास ह्या खटल्याची चौकशी होईपर्यंत वाट पाहिली पाहिजे. "

परंतु त्या खुनासंबंधानें कॉरोनरपुढें झालेल्या चौकशींतही सर्जेरावांची पूर्ण निराशा झाली, असें म्हणण्यास हरकत नाहीं. कारण, त्या चौकशीनें खून कोणी केला अगर त्या कृत्यांत कोणाकोणाचें अंग असावें

हें कांहींच बाहेर आलें नाहीं ! मयत स्त्रीच्या गळ्यामागील बाजूला हत्यार खुपसण्यांत आलें असून तें खुपसतांक्षणींच ती मृत्यु पावली असावी, असें डॉक्टर करमरकर यांनीं सिद्ध करून दाखविलें. तसेंच, आपण रत्नमहालांत येण्यापूर्वीं पांच तास अगोदर तिचा प्राण निघून गेला असावा हेंही त्यांनीं पुराव्यानिशीं सिद्ध करून दाखविलें. असें जर होतें तर जिचा खून झाला ती स्त्री गात नव्हती व जो मनुष्य बाबुरावासमोर फाटकाच्या बाहेर आला होता तो त्याला दूर नेण्याकरितां आला नसावा. कारण त्यापूर्वींच खून झाला असल्याकारणानें तसें करण्याचें त्याला प्रयोजनच नव्हतें, व त्या वेळीं तिचा खून होऊन तीन तास झाले होते. उलट अर्थीं तसें नसावें असें गृहीत धरल्यास डॉक्टरांनीं आपला शोध वैद्यकशास्त्राच्या आधारानें सप्रमाण सिद्ध करून दाखविला होता. अर्थातच त्यामुळें त्या खटल्याविषयीं विचार करण्यास बसणाऱ्या ज्यूरर्सचीं मनें गोंधळून जाऊन 'खंजिरानें सहेतुक खून केला' एवढाच त्यांनीं निकाल दिला. अशा रीतीनें सर्जेरावांनीं आपल्या मतें मोठ्या विचारानें जुळविलेली सांखळी तुटून पडली !

" आतां त्या स्त्रीच्या दहनविधीची तयारी केली पाहिजे, " सर्व मंडळी निघून गेल्यानंतर सर्जेराव गजाननरावांस म्हणाले, " व येणारा खर्च या भागांत राहणाऱ्या लोकांवर सारखा बसविला पाहिजे. "

" नाहीं. माझी असं करण्याची इच्छा नाहीं. " गजाननराव म्हणाले, "ज्या अर्थीं ती माझ्या घरांत मृत्यु पावली आहे त्या अर्थीं तिच्या दहनविधीची व्यवस्था मलाच केली पाहिजे व मी सर्व खर्च करणार आहें. याविषयीं मीं माझ्या पत्नीचं मत घेतलं असून तीही माझ्या म्हणण्याला अनुकूल आहे. "

"पण तुम्हांला तिची कांहींच माहिती नाहीं असं म्हणत होतां ना ?"

" तें खरं आहे. पण तसं करणं माझा धर्म आहे. ज्यूरीचा फार्स आटोपला. आतां त्या खुनासंबंधानं आम्ही आपल्या बाजूनं स्वतंत्र तपास चालू करावा, अशी माझी इच्छा आहे. "

" सुरवात कशी करावी हेंच मला सुचत नाहीं, " सर्जेराव निराशेनें म्हणाले, " तें असो. तिला आतां तुम्ही स्वतःच्याच खर्चानं जाळणार असाल तर माझी मुळींच हरकत नाहीं. "

" ती माझ्या घरांत मरण पावली असल्यामुळं मी तसं करणं हें माझं कर्तव्यच समजतों. पण एखाद्या दैनिक पत्रांत जाहिरात देऊन ती कोण आहे हें समजून कां घेत नाहीं ? "

" तेंही करायचं आम्हीं ठेवलं नाहीं. तिच्या चेहरेपट्टीचं वर्णन देऊन सोबत चित्रही दिलं व जिकडे तिकडे जाहिरातीही चिकटवलेल्या आहेत. तसंच, बाहेर गांवच्या पोलिसांनाही कळवून याबद्दल जारीनं शोध करायला इशारत दिलेली आहे. आतां शेवटीं काय निष्पन्न होतं तेंच पाहायचं आहे. "

"झालंच पाहिजे. कारण मुंबईसारख्या अगणित वस्तीच्या शहरांत कोणी ना कोणी तिला ओळखीत असलाच पाहिजे. "

" पण अशाच बकाल वस्तीच्या ठिकाणीं गुप्त राहण्याचा बराच संभव असतो. " सर्जेरावांनीं उत्तर दिलें, " जे मुंबईसारख्या शहरांत राहतात त्यांना शहरांत किती आले व किती गेले याचा मुळींच पत्ता नसतो ! आपलीच गोष्ट उदाहरणार्थ घेऊं. या स्त्रीचं प्रेत आपल्या-समोर आहे, पण ही कोण आहे, कुठून आली, तुमच्याच घरांत हिचा खून कां झाला, वगैरे आपणास कांहींच माहिती नाहीं व कदा-चित् होणारही नाहीं. "

" चाललंच आहे. " जणू काय त्या गोष्टीचा आतां कंटाळा आला आहे असें दाखवून गजाननराव म्हणाले, " आतां तुम्हीं ह्या खुनाची चौकशी चालू ठेवणार आहां ना ? तर तुमच्या शोधाअंतीं काय आढ-ळून आलं हें मला वरच्यावर कळवीत चला. ती स्त्री ह्या घरांत कशा रीतीनं आली हें जाणण्याची माझी इच्छा आहे. ही चावी तयार करून देणाऱ्या लोहाराला तुम्हीं भेटलां होतां का ? "

" होय. पण तो अशी दुसरी चावी न केल्याचं शपथपूर्वक सांगतो इतकंच नव्हे, तर असली चावी त्याच्याजवळ नमुन्यालासुद्धा नाहीं !

हें ऐकून गजाननरावांचें मन थोडें संशयित झालें. ते म्हणाले, " व्यापारासाठीं त्यानं माझ्यासारख्या किल्लीचा एखादा नमुना तरी आपल्यापाशीं ठेवला असावा अशी माझी समजूत होती. आतां जर एखादे वेळेस ही किल्ली हरवली तर—"

" तर काय ! त्याला याच प्रकारची दुसरी चावी बनवतां येणं शक्य नाहीं. कारण त्याच्याजवळ तुमच्या चावीचा नमुनाच मुळीं नाहीं, असं तो म्हणतो. तथापि मीं त्याच्यावर चांगलीच नजर ठेवलेली आहे. कारण आपल्या फायद्यासाठीं तो कदाचित् खोटंही बोलत असेल. प्रत्येकाकडे संशयी दृष्टीनं आम्हाला पाहावं लागतं.

" हं, माझ्या मेहुणीनं सांगितलेल्या हकीकतीवरून तुम्हाला माझा संशय येत होता तो यामुळंच वाटतं ?"

"तसंच कांहीं नाहीं. पण हा खटलाच तितका चमत्कारिक नाहीं का ?" सर्जेरावांनीं उत्तर दिलें, " आतां माझी पूर्ण खात्री झाली आहे कीं, या बाबतींत तुमचा कांहींएक संबंध नाहीं. "

" ह्या तुमच्या मताबद्दल मी तुमचा फार आभारी आहें. " गजाननराव म्हणाले.

" खरोखर तुम्हीं सुदैवी आहांत " सर्जेराव उल्हसित वृत्तीनें म्हणाले, " जर तुम्ही त्या रात्रीं शहरांत असतां व जर तुम्हाला आपली बाजू समर्थन करतां आली नसती तर यापुढं या बाबतींत तुम्हाला फारच त्रास झाला असता. "

" म्हणजे ! तुमच्या म्हणण्याचा अर्थ—"

"नाहीं. माझं आतां तसं म्हणणं मुळींच नाहीं. पण ही बाबच अत्यंत चमत्कारिक आहे कीं नाहीं तें पाहा. तुम्ही माझ्या अगर इतर कोणाच्या जागीं आहां असं समजून विचार करा. एक परकी व अनोळखी स्त्री तुमच्या घरांत येते व तिचा तिथं खून होतो ! त्या घराची चावी तुमच्याखेरीज इतर कोणाजवळ नाहीं. अर्थात् तुम्ही आपली बाजू पुराव्यानिशीं समर्थन करूं शकलां हें तुमचं सुदैव नाहीं का ? व तसं जर नसतं तर चौकशीच्या वेळीं हजर असणाऱ्यांपैकीं बहुतेक लोकांना तुमचा

संशय येऊन तुम्हीं सांगत आहां त्याहून कांहीं तरी अधिक माहिती तुम्हांला आहे असंच वाटलं असतं. ”

“ जें मला माहित होतं तें मीं तुम्हाला सर्व सांगितलं. ”

“ आतां तशी माझी खात्री झाली आहे व तुम्ही आपला निर्दोषपणा सिद्ध करूनही दाखवला असल्यामुळं तुम्ही अगदीं निष्कलंक आहां, यांत संशय नाहीं. असो. आतां माझ्याविषयीं विचाराल, तर मीं ज्याच्या खिशांतून ती किल्ली सांडली त्याचा तपास करायचं बाजूला ठेवून त्या बाईचं पूर्ववृत्त शोधून काढण्याचा प्रयत्न करणार आहें. तें शोधून काढल्यानंतरच तिच्या खुनाचं कारण समजून येईल. मी जे जे कांहीं यत्न करीन व जें कांहीं मला आढळून येईल तें सर्व तुम्हाला सांगेन व तुम्हालाही जर याबद्दल कांहीं कळलं तर मला तुम्ही कळवलं पाहिजे.”

गजननरावांनीं आपल्या नेहमींच्या संवयीप्रमाणें खांदे हालवीत म्हटलें, “ अंऽहं ! तें नाहीं जुळायचं आपल्याला. एकदाचं हें दहनकार्य आटोपलं कीं मी ह्या भानगडींत मुळींच पडणार नाहीं. ”

“ जशी तुमची इच्छा. ” सर्जेराव उद्गारले !

दोघेही एकमेकांना नमस्कार करून आपापल्या वाटेनें निघून गेले. सर्जेरावांच्या डोक्यांत विचारांचें काहूर माजून राहिलें होतें. आतांपर्यंत वाचलेल्या एकंदर हकीकतीवरून सर्जेरावांचें डोकें ह्या खटल्यांत कितीसें चाललें असावें हें वाचकांना समजून आलें असेलच. जे विचार प्रथम त्यांच्या डोक्यांत आले होते,ते शेवटपर्यंत तसेच कायम होते. खुनाच्या चौकशीला सुरवात होण्यापूर्वीं आपल्या विचारांत भरींवपणा आहे, अशीच त्यांची समजूत होती; परंतु ज्यूरीनें दिलेला निकाल व चौकशीच्या वेळीं बाहेर आलेल्या एकंदर साक्षी ऐकतांच आपण जुळविलेल्या मुद्यांचे दुवे अगदींच कच्चे आहेत, असें त्यांचें त्यांनाच कळून चुकलें ! मेंदूला शीण देऊन मोठया कष्टानें उभारलेला त्यांचा विचाररूपी किल्ला अशा रीतीनें एकदम ढांसळून पडला ! सर्जेरावांना प्रथमपासूनच गजाननराव अपराधी असावेत असें वाटत होतें—नव्हे, तशी त्यांची जवळ

जवळ खात्रीच होती असें म्हणावयास हरकत नाहीं. परंतु चौकशीच्या दिवशीं जें कांहीं बाहेर आलें त्यामुळें त्यांना आपलें मत बदलावेंच लागलें. रमाबाईनीं, ज्या वेळीं खून झाला त्या वेळीं गजाननराव बिछान्यावर निजून होते हें सप्रमाण प्रसिद्ध करून दाखविल्यामुळें तो प्रश्नच आतां उरला नव्हता. "परंतु रमाबाईनीं हें सर्व खोटेंच कारस्थान कशावरून रचलें नसेल?" सर्जेराव चालतां चालतां स्वगत विचार करूं लागले, "पण छे! खोटें असणें अगदींच अशक्य. कारण पत्राची तारीख, वेळ वगैरे खुनापूर्वीचीं असून गजाननराव असलें घाणेरडें कृत्य करतील असें मन सांगत नाहीं. खुनी मनुष्य त्याच्या नजरेवरूनच ओळखावा, व गजाननरावांचा चेहरा तर आरशासारखा निर्मळ दिसतो आहे. अर्थात् ते खात्रीनें अपराधी नसावेत. मग खरा अपराधी कोण, हाच मुख्य प्रश्न असून तोच मला सोडवितां येणें कठीण दिसतें." अशा रीतीनें खुनी इसम कोण असावा हें हुडकून काढण्यासाठीं सर्जेरावांनीं सर्व बाजूंनीं विचार करून पाहिला, परंतु अमकाच एक तो आहे, असें त्यांचें ठाम मत होईना. असो.

त्या मयत स्त्रीची स्मशानयात्रा योग्य रीतीनें पार पडली. यात्रेबरोबर गजाननराव, कमलाकर व त्या भागांतील त्या मयत स्त्रीविषयीं सहानुभूति वाटत होती असे कांहीं लोक हजर होते. गजाननरावांनीं त्या स्त्रीची दहनक्रिया एखाद्या आपल्याच कुटुंबांतील माणसाप्रमाणें केली. प्रेताला अग्नि देते वेळीं गजाननरावांचा चेहरा म्लान व फिकट दिसत होता व नुक्ताच त्यांना आलेला आजार याला कारण असावा असाच पुष्कळांचा समज झाला होता. कारण, गजाननरावांना त्यांच्या इच्छेविरुद्ध आपला बिछाना सोडून रत्नमहालांत चौकशीसाठीं हजर राहावें लागलें होतें, हें सर्वांना ठाऊक होतें. दहनविधि आटोपल्यानंतर पुष्कळ लोकांनीं गजाननरावांची त्या निराधार स्त्रीला अशा रीतीनें अग्नि दिल्याबद्दल पाठ थोपटली. ह्याप्रमाणें दादर व मांटुगा या विभागांतील लोकांत खळबळ उडवून देणाऱ्या त्या प्रेताचें भस्म झालें!

झालेल्या खुनाची व चौकशीची हकीकत निरनिराळ्या वृत्तपत्रांतून प्रसिद्ध होऊं लागली. वर्तमानपत्रांच्या संपादकांना आपल्या पत्रांचे रकानें भरून काढण्यास असें कांहीं तरी हवेंच असतें, व तसें कांहीं तरी घडून आल्यास ते त्यांत आपल्या पदरची बरीच भर टाकून ती हकी-कत हृदयस्पर्शी करून प्रसिद्ध केल्याशिवाय कधींच राहत नाहींत. जणूं काय हा त्यांचा हक्कच आहे, व अशा प्रकारची कांहीं हकीकत घडून आल्यास प्रत्येक वर्तमानपत्रकार ती हकीकत आपल्या पत्रांत सर्वांच्या अगोदर व सविस्तर रीतीनें कशी देण्यास सांपडेल याच उद्यो-गास लागलेला असतो. अशा वर्तमानपत्रांपैकीं त्या वेळीं 'विश्ववृत्त' हें वर्तमानपत्र होतें. खुनाची व त्याविषयीं झालेल्या चौकशीची हकीकत आपल्या पत्रांत प्रथम प्रसिद्ध करून त्याचा खप करावा ह्या उद्योगास त्या पत्राचा संपादक लागला व लौकरच त्यानें सर्व हकीकत, त्यांत आपल्या लेखनकलेची थोडी भर घालून आपल्या पत्रांत प्रसिद्ध केली. ती वाचल्यास वाचकांची कदाचित बरीचशी करमणूक होण्यासारखी आहे, म्हणून ती जशीच्या तशी पुढें देत आहें.

" दादर व माटुंगा या दरम्यान असलेल्या रत्नमहाल या नांवाच्या बंगल्यांत झालेल्या खुनाच्या योगानें तेथें राहत असलेल्या लोकांत मोठीच खळबळ उडून गेलेली आहे. दादर व माटुंगा ह्यांच्या दरम्यान मोठमोठे श्रीमंत भाटये, वकील,डॉक्टर,व्यापारी वगैरे श्रीमंत लोक राह-तात. त्या ठिकाणीं अशा प्रकारचें निंद्य कर्म--खुनासारखें नीच प्रकारचें कृत्य घडून येणें ही अत्यंत लाजिरवाणी व शरमेची गोष्ट आहे; व हा खून कोणीं व कां केला याचा सुगावा येथील पोलिसखात्याला लागूं नये ही अत्यंत आश्चर्यजनक गोष्ट आहे. इतकेंच नव्हे, तर ज्या बाईचा खून रत्नमहालांत झाला ती कोण, कुठची व तिचें नांव गांव वगैरे कोणत्याच गोष्टीचा सुगावा त्या खात्यास अद्यापि लागलेला नाहीं. असा प्रकार मुंबईतील पोलिसखात्यांत पाहिला म्हणजे तेथील नागरिकांचें त्या खात्यासंबंधानें कसें काय मत होईल याचा विचार त्या खात्याच्या वरिष्ठांनींच करावा, हें उत्तम. मुंबईसारख्या शहरांत जाहिराती, वर्तमान-

पत्रें, इत्यादिकांसारखीं बरींच सोयीचीं साधनें असूनही येथील पोलिस-खात्याला या बाबतींत कांहीं माहिती मिळूं नये, हें अत्यंत आश्चर्य होय. नियतकालिकांची मदत घेतली तर हा गुप्त प्रकार उजेडांत आणतां येणार नाहीं काय ? पोलिस इन्स्पेक्टर सर्जेराव यांचें मत असें आहे कीं, प्रथमतः स्त्री कोण आहे हें अत्यंत बारकाईनें शोधून काढलें पाहिजे व तिच्या मागील चरित्राचा एकदा तपास लागला म्हणजे हा खून कां व कोणी केला हें समजून येण्यासारखें आहे. हा शोध लावण्याचें काम इन्स्पेक्टर सर्जेराव यांनीं स्वतः आपल्या हातीं घेतलें असून अजूनपर्यंत त्यांची या खुनाच्या शोधाच्या बाबतींत फारशी प्रगति झालेली दिसत नाहीं. तरीही त्या खटल्यासंबंधानें त्यांना पूर्ण शोध लागून ते यशस्वी होवोत असें आम्ही इच्छितों.

"चौकशीच्या दिवशीं पुढें आलेल्या कांहीं पुराव्यावरून असें सिद्ध होतें कीं, ती स्त्री आठ आणि नऊ या दरम्यान त्या बंगल्यांत शिरली व आंत शिरल्यानंतर थोड्याच वेळानें तिचा खून झाला. ती बाजाचे पेटीपुढील खुर्चीवर बसलेली असून तिच्यासमोर हार्मोनियमगाइड-मधील "किती किती सांगूं तुला" हें गाणें उघडलें होतें, हें जरी निःसंशय खरें आहे, तरी ती स्त्री तें गाणें केव्हांही म्हणत नव्हती, हें निर्विवाद आहे. ज्या माणसाची ती स्त्री वाट पाहत होती—कदाचित् ज्यानें तिचा खून केला त्याचीच ती वाट पाहत असावी—तो येईपर्यंत तिनें कदाचित् गाणें म्हटलें असेल, परंतु बाबुरावानें अकरा वाजतां ऐकलेलें गाणें तिचें नसून, ती मेल्यावर तीन तासांनीं दुसऱ्या कोणी स्त्रीनें म्हटलेलें तें गाणें होय व डॉक्टर करमरकरही स्पष्टपणें सांगत आहेत कीं, नऊ वाजण्यापूर्वींच तिचा खून झालेला आहे.

"त्या रस्त्यावर जरी त्या रात्रीं बऱ्याच लोकांची ये-जा होती, तरीही त्या स्त्रीला त्या बंगल्यांत शिरतांना कोणींही पाहिलेलें नाहीं. अशा गजबजलेल्या वेळीं बंगल्यांत शिरतांना ती स्त्री कोणाच्याच दृष्टीला पडूं नये ही फारच आश्चर्याची गोष्ट आहे. इतकेंच नव्हे, तर गजाननराव व त्यांचें कुटुंब—रत्नमहालाचे मालक—हीं वाळकेश्वरीं राहावयास गेलीं

आहेत हें सुद्धा बहुतेकांना माहित नव्हतें ! सर्व प्रकारची चौकशी अगदीं बारकाईनें करण्यांत आलेली आहे, परंतु त्या स्त्रीला तेथें येतांना कोणींही पाहिलेलें नाहीं. यामुळें ती बंगल्यांत एकटीच शिरली, कीं तिच्याबरोबर दुसरें कोणी होतें, हें सांगणें अशक्य आहे.

"खुनी माणसाविषयीं सांगावयाचें म्हणजे—खुनी इसम पुरुष असून त्या रात्रीं बाबुरावाबरोबर जो इसम बोलत होता तोच तो असावा असें आमचें मत आहे.—आपल्यापाशीं असलेल्या बंगल्याच्या मुख्य दरवाजाच्या किल्लीच्या योगानें त्या स्त्रीबरोबर त्यानें आंत प्रवेश करून आंत जातांक्षणींच त्यानें तिचा खून केला व आपण यःपलायते करण्याची संधि तो पाहूं लागला असावा, असेंही असूं शकेल. तो त्या स्त्रीबरोबर बंगल्यांत शिरला असावा हें स्पष्टच होत आहे.कदाचित् आम्ही वर दिल्याप्रमाणें ती स्त्री त्याच्यापूर्वींच बंगल्यांत जाऊन त्याची वाट पाहत असावी. कांहींही असो, परंतु डॉक्टरांच्या अनुमानाप्रमाणें ते दोघेही आठ आणि नऊ यांच्या दरम्यान आंत शिरले असले पाहिजेत. गरीब बिचारी दुर्दैवी स्त्री ! आपण मृत्युमुखीं पडण्यास जात आहोंत, हें तिला काय ठाऊक ! त्यानें तिला सफेत दिवाणखान्यांत नेऊन आपलें काम साधण्यास संधि सांपडावी ह्या दुष्ट हेतूनें पेटी वाजविण्यास सांगितलें व त्याप्रमाणें ती बसतांच आपली वेळ आल्यानंतर मागून शस्त्र खुपसून तिचा प्राण घेतला असावा. तिचा खून करतांक्षणींच तो आपल्या पलायनाची संधि पाहूं लागला. डांचत असलेल्या आपल्या कर्मामुळें व पकडल्या जाण्याच्या भीतीमुळें तो अकरा वाजेपर्यंत त्या बंगल्यांतच राहिला असावा. अशा रीतीनें तो पलायनाची संधि पाहत असतां त्याला रस्त्यावर पोलिसशिपाई दिसला व त्याला चकविण्याकरितां, त्याला कोणी तरी स्त्री त्या बंगल्यांत गात असावी असें भासविण्यासाठीं तो स्वतः पेटीवर बसून बारीक आवाजांत गाऊं लागला असावा. नंतर पोलिसांची साधारणपणें करमणूक झाली आहे अशी त्याची खात्री पटल्यावर तो बंगल्याबाहेर पडला व त्यानें चौकशींत बाहेर पडल्याप्रमाणें आपली सुटका करून घेतली. असो. बाबुरावानें

गाणाराचा आवाज साधारणपणें किनरा व मधून मधून ओढून ताणून आणल्यासारखा येत होता, असें सांगितलें होतें. अर्थातच त्या मनुष्यानें खोटा आवाज काढून गाणें म्हटलें असावें व त्या स्त्रीला त्या बंगल्यांत आणून तिचा खून करणारा इसमही तोच असला पाहिजे. कारण, रत्न-महालाची किल्ली त्याच्याजवळ असल्यामुळें दुसऱ्या कोणास त्या घरांत येणें शक्य नव्हतें. " विश्ववृत्तांतील वरील हकीकतीमुळें मुंबईंत एकच खळबळ उडाली.

मुंबईतील हरएक वर्तमानपत्रास व त्यांच्या संपादकास 'कॉंपिटिटर' म्हणून असतोच व त्या दोघांमध्यें एक प्रकारची चढाओढ चाललेली असते व असा एखादा खुनासारखा प्रकार असला म्हणजे ते दोघेही त्याच्या खरेपणाविषयीं संशयित वृत्ति दर्शवून एकमेकांच्या उखाळ्यापाखाळ्या काढून त्यांत आपल्या पदरची थोडीशी भर घालतात व एकंदर हकी-कत तिखटमीठ लावून होतां होईतों मनोरंजक करतात.'विश्ववृत्ता'स त्या वेळीं 'प्रातःकाल' या नांवाचें दुसरें प्रतिस्पर्धी वर्तमानपत्र होतें व त्या दोन पत्रकारांच्या बाबतींत कांहींसा असाच प्रकार चालू होता. विश्व-वृत्तानें एखादी बातमी प्रसिद्ध केली कीं, यानें त्यांतील ठिगळें काढून त्यावरच आपल्या पत्राचे रकानेच्या रकाने भरून काढावे. विश्ववृत्त पत्रांत रत्नमहालांतील खुनाची बातमी प्रसिद्ध होतांच दुसऱ्या दिवशीं या वर्तमानपत्रांत पुढीलप्रमाणें हकीकत आली:—

" रत्नमहालांतील खुनाच्या हकीकतीसंबंधीं आमच्या व्यवसायबंधूनीं-विश्ववृत्त पत्राच्या संपादकांनीं जरा अतिशयोक्तीची हकीकत दिली आहे. पोलिस शिपाई बाबुराव याचें म्हणणें असें होतें कीं, तो मनुष्य जेव्हां बंगल्यांतून बाहेर आला व आपल्याबरोबर भाषण करूं लागला त्या वेळीं बंगल्यांत पूर्वीप्रमाणेंच गाणें चालू होतें. त्या अर्थीं बाबुराव याजबरोबर बोलत राहणारा मनुष्य खोटा आवाज काढून गाणें म्हणत नसावा असें पूर्णपणें सिद्ध होतेंच. विश्ववृत्तपत्रानें दिलेली हकीकत जरी चित्तरंजक आहे, तरी त्या हकीकतींत कांहीं तथ्य असावें असें आम्हांस मुळींच वाटत नाहीं. आमच्या मतें पुढें दिलेल्या हकीकतीचा आणि खऱ्या वस्तुस्थितीचा बराचसा मेळ जमेल यांत शंका नाहीं.

" आमच्या मतें प्रथमतः त्या मनुष्यानें त्या स्त्रियांना आंत घेतलें. हें आम्हीं 'स्त्रिया' असें म्हणण्याचें कारण, आमच्या मतें खुनाच्या वेळीं बंगल्यांत दोन स्त्रिया होत्या. एक मयत स्त्री व दुसरी त्या कर्मास मदत करणारी स्त्री. त्या दोन स्त्रिया बाबुरावां-बरोबर बोलत राहणाऱ्या मनुष्याबरोबरच आंत शिरल्या अगर त्याच्या मागून आल्या, यासंबंधानें निश्चित असें कांहींच सांगतां येत नाहीं. त्या आंत आल्यानंतर त्यानें त्या स्त्रियांना सफेत दिवाणखान्यांत नेलें व त्यांपैकीं एकीला पेटीवर बसावयास सांगून ती गातां गातां रंगांत आली असतां तिचा मागून शस्त्र खुपसून खून केला. खून त्या दुसऱ्या स्त्रीनें केला कीं पुरुषानें केला यासंबंधानें ठाम मत देतां येणार नाहीं; तरीही खुनाच्या बाबतींत तीं दोघेंही सारखींच अपराधी ठरतात हें निसंशय. खून केल्यानंतर तीं दोघेंही आपल्या पलायनाची संधि पाहूं लागलीं. खुनानंतर तीन तास त्यांनीं त्या जागीं राहावें ही खरोखरच आश्चर्याची गोष्ट आहे. परन्तु भीतिग्रस्त झाल्यामुळें अगर आपला कोणालाही संशय येऊं नये हा हेतु मनांत धरूनच तीं एवढा वेळपर्यंत रत्नमहालांत राहिलीं असावी असें म्हणण्यास हरकत नाहीं. रत्नमहालाच्या आजूबाजूला असलेल्या रस्त्यावरील रहदारी कमी होण्याची तीं दोघेंहीं वाट पाहत असावींत. सुमारें अकरा वाजतां त्यांनीं तेथून यःपलायते करण्याचा विचार केला असावा; परन्तु त्याच वेळीं बंगल्या-समोर पोलिस कॉन्स्टेबल बाबुराव हा येऊन उभा राहिला. बाबुरावानें त्यांना कदाचित् पाहिलें असावें व त्याला संशय आला असल्यास तो घालवावा या हेतूनें ती दुसरी स्त्री पेटीवर बसून गाऊं लागली व त्या मनुष्यानें खालीं येऊन बाबुरावाला झुलवीत झुलवीत दूर नेलें व तेवढ्या वेळांत ती स्त्री बंगल्याबाहेर पडली. रस्त्यावर आल्यावर तिला कमला-करांची मोटर उभी असलेली दिसली असावी. ती स्त्री खुनी व दरोडे-खोर असल्यामुळें तिला मोटर चालविण्याची माहिती असलीच पाहिजे. ती ताबडतोब त्या मोटरमध्यें बसून ठाणें स्टेशनवर गेली असावी. ठाण्यासारख्या गजबजलेल्या स्टेशनावर तिच्याकडे कोणाचेंच लक्ष गेलें

नाहीं यांत कांहीं नवल नाहीं. मोटर सोडल्यानंतर ती मेलमध्यें बसून कोठें तरी पळून गेली असावी. अशा रीतीनें ती खुनी स्त्री बेपत्ता झाली व कांहीं तासांनंतर त्या हरवलेल्या मोटरीचा पत्ता लागला.

" आमच्या मतें खुनाची हकीकत ही अशी आहे व आमचे मित्र विश्ववृत्तकार यांनीं आपल्या पत्रांत दिलेल्या हकीकतीपेक्षां आम्ही दिलेली हकीकत बहुतांशीं खरी आहे हें आमचे वाचकसुद्धा कबूल करतीलच. गजाननराव ज्या अर्थी त्या स्त्रीला ओळखत नाहींत त्या अर्थी तिचा खून त्यांच्याच रत्नमहालांत कसा झाला ही अत्यंत आश्चर्यकारक गोष्ट आहे. गजाननरावांचे सर्व नोकरचाकर त्यांच्याबरोबरच चौपाटीवरील त्यांच्या बंगल्यांत गेले होते. अर्थात् या बाबतींत त्यांच्यांवर कोणत्याही प्रकारचा दोष लादतां येत नाहीं. गजाननराव हे सुद्धा खून झाला त्या वेळीं आजारी असल्यामुळें बिछान्याला खिळून होते. अर्थात् त्यांनाही कांहींच माहिती नसणारच. मात्र, रत्नमहालाच्या मुख्य दरवाजाची चावी आपणाखेरीज दुसऱ्या कोणाजवळ केव्हांच गेलेली नाहीं, असें ते निक्षून सांगत आहेत व ज्यानें ती चावी तयार केली तो लोहारही त्या चावीसारखी दुसरी चावी आपण कधींच तयार केली नाहीं अशी साक्ष देतो. तेव्हां तसलीच दुसरी चावी त्या माणसाजवळ आली कशी हेंच या खटल्यांतलें मोठें गूढ आहे. तसेंच, ज्या जागीं त्या स्त्रीचा खून झाला ती जागाही विचित्रच आहे. त्या सफेत दिवाणखान्यांतील सर्व पांढऱ्या शुभ्र वस्तूंना विरोधी असे फक्त त्या मयत स्त्रीच्या अंगावरील कपडेच होते. अशा तऱ्हेचा विचित्र दिवाणखाना बनविण्यास गजाननरावांना काय कारण झालें असेल तें समजल्यास बरें होईल. कदाचित् ही त्यांची एक लहरही असूं शकेल. शेवटीं थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे ती स्त्री कोण, रत्नमहालांत ती कशी आली, तिचा खून कोणी व कां केला, तसेंच रत्नमहालाच्या मुख्य दरवाजाच्या चावीसारखीच दुसरी चावी त्या माणसाजवळ कशी आली, हें सर्वच कांहीं अद्यापपर्यंत गूढ आहे."

दुसऱ्या दिवशीं विश्ववृत्तांत पुढील मजकूर प्रसिद्ध झाला:—

" आमचे प्रिय मित्र प्रातःकालकर्ते असें म्हणतात कीं, अकरा वाजतां दुसऱ्या स्त्रीनें व त्या मनुष्यानें पळून जाण्याचा बेत केला, परंतु तितक्यांत पोलिस आल्यामुळें, ती स्त्री पेटी वाजविण्यास बसून तो पोलिसाला झुलविण्याकरितां बाहेर पडला. परंतु आम्हांला त्यांस इतकेंच विचारावयाचें आहे कीं, त्यांनीं पळावयाचा बेत कोणत्या रीतीने व कोणत्या वेळीं ठरविलेला होता ?"

ह्या प्रश्नास 'प्रातःकाल' पत्राकडून कांहींच उत्तर आलें नाहीं व त्या दिवसापासून कोणत्याही वर्तमानपत्रांत रत्नमहालांतील खुनासंबंधानें कांहींच बातमी छापून आली नाहीं. जणू काय कांहींच घडून आलें नाहीं, अशा रीतीनें दोन आठवडे सर्वत्र शांत होतें. परंतु इतक्यांत एकाएकीं एक चमत्कारिक गोष्ट घडून आली !



प्रकरण ६ वें

## छे ! फारच चमत्कारिक !

" तुला जें कांहीं पुढं करायचं असेल त्याचा एव्हांपासून काय तो विचार कर. रमाबाई आपली लहान बहीण नलिनी हिला उद्देशून म्हणाल्या, "कारण इकडून व मी ह्या जागेंत थोडा फरक करायचं मनांत आणलं आहे."

" तो कसा काय ? " शिवत असतांनाच वर पाहत नलिनीनें विचारलें.

ज्या खोलींत रमाबाई व नलिनी ह्या दोघी शिवणकाम करीत बसल्या होत्या ती चांगल्या प्रकारें शृंगारली होती. सफेत दिवाणखान्याच्या एका बाजूची ती खोली असून तिच्या दरवाजावरून व सर्व खिडक्यांवर मौल्यवान झालरींचे पडदे सोडलेले होते व भिंतींना, तसेंच खिडक्यांना व दरवाज्यांना चांगला तेलिया रंग oil paint दिलेला होता. खोलीच्या मध्यभागीं एक छोटेसें व सूचक नक्षीकाम केलेलें एक वर्तुळाकार मेज असून त्यासभोंवतीं वेंटवुडच्या चार खुर्च्या ठेवलेल्या होत्या. कांहीं कपाटांत निरनिराळ्या विषयांवर मराठी व इंग्रजी या दोन्ही भाषांतील पुस्तकें नीट रचून ठेवलेलीं असून एका कपाटांत कपडे वगैरे सामान दिसत होतें. खोली अशा रीतीनें व्यवस्थित व स्वच्छ ठेवलेली होती, तसेंच आंतील सामानही इतकें चकचकीत व स्वच्छ दिसत होतें कीं, एखाद्या नवख्या इसमाला त्या खोलींतील एकंदर रचना नुक्तीच झाली असावी असें वाटल्यावांचून राहिलें नसतें.

वर वर्णन केलेल्या खोलींतील एका कोचावर रमाबाई विणकाम करीत वसल्या असून त्याच्याजवळील दुसऱ्या कोचावर नलिनी कांहीं शिवत बसली होती. रमाबाई व नलिनी या दोघी बहिणी जरी एकाच मातेच्या उदरांतून आलेल्या होत्या, तरी त्यांच्या चेहऱ्यांत, त्यांच्या बोलण्यांत, स्वभावांत व त्यांच्या वर्तणुकींत बराच फरक दिसून येत असे. रमाबाई दिसण्यांत उंच असून त्यांच्या अंगची ठेवण जेथल्या तेथें व प्रमाणांत होती. त्यांचा चेहरा सुंदर दिसत असे, त्यावर मनाचा बेफिकीरपणा व दृढनिश्चयाची झांक सहज आढळून येई. तसेंच तिचे डोळेही पाणीदार असून ते एखाद्यावर आपली सहज छाप पाडीत असत. रमाबाईंना फार अघळपघळ बोलणें मुळींच आवडत नसे. इतकेंच नव्हे, तर त्या फार करून कुणाशींच विशेष बोलत नसत. या वेळीं ती प्रकरणाच्या आरंभींच दिल्याप्रमाणें विणकाम करीत असतां जरी नलिनीशीं बोलत होती, तरी तिचें लक्ष आपल्या कामाकडे पूर्णपणें होतें व त्यामुळें तिचे टांके मारण्याचें काम सारखेंच चालू राहून त्यांत थोडासुद्धा खंड पडत नव्हता. तिचा स्वभाव जितका करारी आणि निश्चयी होता, त्याच्या उलट स्वभाव गजाननरावांचा होता. ते मुखदुर्बल होते असें मागें एका प्रकरणांत आलेंच आहे. दोघांच्या अगदीं परस्पर-विरोधी स्वभावामुळें गजाननराव रमाबाईंच्या अगदीं मुठींत असत.

प्रकरणाच्या आरंभीं दिल्याप्रमाणें त्या दोघी आपापल्यापरी उद्योगांत गर्क होऊन गेल्या होत्या. रमाबाई बसल्या होत्या त्या बाजूच्या खिडकीमधून सायंकाळच्या सूर्याचे कोमल किरण तिच्या अंगावर पडले होते. थोड्याच दिवसांपूर्वीं त्या बंगल्यांत घडलेल्या हृदयद्रावक प्रसंगाची आठवण त्यांना नसावी असें त्यांच्या चेहऱ्यावरून दिसून येत होतें. मयत स्त्रीचें दहन केव्हांच होऊन वृत्तपत्रांतही त्याविषयीं आतां कांहींच येईनासें झालें होतें; इतक्या लवकर सर्वजण ती गोष्ट विसरत चालले होते. इतरांप्रमाणें रमाबाईंच्याही आठवणींतून तो प्रसंग नाहींसा होत होता. मात्र गेल्या दोन दिवसांपासून नलिनीनें तिला आपली

" त्यांत न समजण्याएवढं काय आहे ? तुला माहितच आहे कीं, भागीदारी घेण्यास जे पैसे धंद्यांत घालावे लागतात ते त्यांनीं न घालतां मींच घातले आहेत. कारण त्यांच्याजवळ होते नव्हते तेवढे सर्व पैसे त्यांनीं माझ्यासाठीं हा बंगला रचण्यांतच खर्च केले आहेत. "

" पण तुमच्या लग्नापूर्वींच तर त्यांनीं हा बंगला बांधलेला आहे. "

" तें सर्व खरं आहे. हे जेव्हां कधीं कधीं बाबांकडे येत असत तेव्हांच त्यांनीं मला ' मी एक तुझ्यासाठीं बंगला बांधीत आहें व लवकरच मी तुला मागणी घालणार आहें ' असं सांगितलेलं होतं. त्यानंतर थोड्याच दिवसांनीं आमचं लग्नाचं ठरलं. त्यांतूनही मला business करायची फार आवड आहे. परंतु एकटी बायकोमाणूस कोणता 'बिझिनेस' करणार हा विचार मनांत आल्यामुळं त्यांच्या मागणीला बाबांकरवीं मीं रुकार देवविला व लग्न झाल्यानंतर तिकडच्याच नांवानं दादाच्या कंपनीची भागीदारी घेवून भागीदाराची पत्नी म्हणून त्यांचं काम पाहतें. "

" पण तुला हें सर्व, लग्न न करतांसुद्धा करतां आलं असतं. "

" नाहीं, " रमाबाई नकारार्थी आपली मान हालवून म्हणाली, " बाबांनीं तुला वार्षिक सहा हजारांचं उत्पन्न ठेवलं आहे. पण मला तुझ्यापेक्षां अधीक रक्कम ठेवलेली होती. ते पैसे माझ्याजवळ येणार म्हणून मीं दादाला तुझ्या कंपनीची भागीदार होऊं काय म्हणून विचारलं; पण माझं म्हणणं त्यानं साफ नाकारलं. त्यानंतर माझं लग्न झालं व शेवटीं त्यांच्या नांवानं मी दादाच्या धंद्यांत पैसे घालून मी ह्यांना त्या कंपनीचे भागीदार बनविले. इकडे ह्या business बद्दल कांहींच कळत नसल्यामुळं 'फसवायला ठीक' म्हणून दादांनीं त्यांना भागीदार केलं व याच कारणामुळं मीं त्यांच्याबरोबर लग्न करायचं कबूल केलं हें तुला कळलंच. कारण तिकडच्या नांवावर मला ह्या धंद्यांत वाटेल तशा घडामोडी करतां येतात. "

" तें असो, पण आतां तूं काय ठरवते आहेस ? "

" मला तुम्ही बरोबर नेणार नाहीं वाटतं ?"

" तुझी जर इच्छा असेल तर नेऊं. पण आतां तूं मोठी होत चाललीस. शिवाय बाबांनींही तुला भरपूर उत्पन्न ठेवलं आहे. तेव्हां तूं जर आतां संसार थाटशील तर बरं, असं मला वाटतं. "

" अस्सं ? " नलिनी खोंचून रमाबाईकडे पाहत म्हणाली, " एकूण तुला माझा कंटाळा येऊं लागला तर ! "

" छे ! असं कांहीं मीं म्हटलं नव्हतं. " रमाबाई म्हणाली, " तूं आहेस म्हणून आमचा वेळ तरी जातो व त्यांनाही तुझा स्वभाव फार आवडतो. तुझाही कांहीं आम्हांला कसलाच त्रास होत नाहीं. तुला आमच्याबरोबर न्यावं अशी माझीसुद्धा इच्छा आहे; पण मला आपलं वाटतं तें सांगितलं. "

" तुझ्याबरोबर ! आणि इतक्या दूर–? "

" नाहीं तर लग्न कर" रमाबाई शांतपणें म्हणाली, " लग्न करशील तर बरं. "

" पण मी दोन्हींही केलीं नाहींत तर ? बाबांनीं मला भरपूर पैसे ठेवले आहेत, तेव्हां मी आपली शरयूच्या घरीं जाऊन राहीन. "

" तुला त्या मेंढवाड्यांत सरोजिनीबाईबरोबर जाऊन राहायचं असेल तर खुशाल राहा. माझं कांहीं म्हणणं नाहीं. " रमाबाई जरा रागानें म्हणाली.

" पण ती कांहीं मला त्रास देत नाहीं. " नलिनी जोरानें म्हणाली.

" पण ती तुला त्रास देते असं मी तरी कुठं म्हणतं आहें ? मला मात्र कांहीं तिच्या घरीं राहणं आवडणार नाहीं. शरयू तर नुसती उल्लूच आहे. ती हल्लीं त्या कमलाकराच्या नादीं लागली आहे म्हणे ! "

" कमलाकर कांहीं वाईट नाहींत. सुस्वभावी आहेत ते. "

" होय, पण भामटे;–आणि शरयू ? "

" तिच्यासारखी मुलगी कुठं आढळायची नाहीं. "

" उनाड ना? पण मला अशा तऱ्हेचे लोक मुळींच आवडत नाहींत." रमाबाई भिंवया आकुंचित करून म्हणाली.

" तुला तुझ्याशिवाय दुसरं कुणी आवडतं का?" नलिनीनें रागानें विचारलें, "स्वतःखेरीज तुला दुसऱ्याची पर्वाच वाटत नाहीं."

" कां बरं नाहीं? मला मिनीची तसंच इकडचीही थोडीशी काळजी आहेच. तूं आतां वयांत आलीस, आतां तुझी काळजी कां करावी? आणि इतर लोकांची पर्वा बाळगण्याचं मला कारण नाहीं. पर्वा करून घ्यायला तसे गुण अंगीं असावे लागतात."

" दुसऱ्याचे गुणावगुण निरखून पाहण्याचा जसा कांहीं कुणीं तुला अधिकारच दिला आहे. तुझा स्वभाव अगदीं बाबांसारखाच आहे."

" बरोबर आहे. आणि म्हणूनच तर त्यांनीं तुझ्यापेक्षां जास्त पैसे माझ्या नांवं करून ठेवले. तुझा आणि इकडचा, दोघांचेही स्वभाव कसे थेट माझ्या आईप्रमाणं आहेत अगदीं मिळमिळीत. तुमच्यांत कांहींच पाणी नाहीं. मुळींच नाहीं."

ह्या भाषणानें नलिनीला अगदीं चीड आली. तिला, त्याच क्षणीं खोलीच्या बाहेर निघून जावें असें वाटलें व ती उठून जाणारही होती; परंतु थोडयाशा विचारांतीं तेथेंच बसणें योग्य असें तिला वाटलें. ती उठून गेली असती तरी रमाबाईनें रागाचें कांहींच चिन्ह दाखविलें नसतें व पुन्हा मात्र त्यांनीं तिला किती तरी जेरीस आणलें असतें. त्याखेरीज नलिनीला रमाबाईपाशीं आपल्या पुढील सुखदुःखाची व भावि आशेची एक गोष्ट काढावयाची होती, म्हणूनच तिला बसणें भाग होतें व यासाठींच तिला चालू वादविवादाचें रूपांतर करणें इष्ट वाटलें.

" तुला त्या दोघांशिवाय इतर कोणीच आवडत नाहीं, याचा अर्थ मधुकररावांबरोबर माझा विवाह होणं तुला योग्य वाटत नाहीं, असा मीं समजूं कीं काय?" तिनें विचारलें.

" होय, असंच. कारण मला तुमचा जोडाच आवडत नाहीं. पण तुझा जर अगदीं हट्टच असेल तर त्याला माझा नाइलाज आहे. मी

चौपाटीवर असतांनाच त्या गोष्टीचा पूर्ण विचार केलेला असून इथं आल्यानंतर तो तुला सांगण्याचा माझा मानस होता. पण या खुनानं सर्व घोटाळा केल्यामुळं ती गोष्ट तशीच राहिली. तूं आतां कांहीं तरी एक ठरवून टाक. आमच्याबरोबर बाहेरगांवीं चल, नाहीं तर मधुकराबरोबर लग्न करून सर्व जन्म दुःखांत काढ."

"त्याचं पुढं पाहूं; पण तुम्ही इथून जाणार केव्हां ?"

"तीन चार महिन्यांत जाऊं, कारण जाण्यापूर्वी हा बंगला विकून टाकायचा आहे. तसंच इतर गोष्टींचाही पूर्ण बंदोबस्त केला पाहिजे. पण तूं मधुकरालाच माळ घालायचा अगदीं निश्चय केला आहेस का ?"

"हें आणखी निराळं सांगायला पाहिजे का ?" रमाबाईनीं सखेदाश्चर्य व्यक्त केलें. ती म्हणाली,

"नटाबरोबर लग्न लावल्यानं पुढं काय परिणाम होईल याचा तूं विचार कर. तुला सुखांत ठेवण्याइतका तो श्रीमंत आहे का ?"

"नसला तरी कांहीं हरकत नाहीं. आम्हां दोघांना सुखानं आणि चैनीनं राहतां येईल इतके पैसे मजपाशीं आहेत."

"अस्सं ! तर मग त्याला शेवटीं तुजवरच अवलंबून राहावं लागणार आहे. पण काय ग, तो हल्लीं बरेच दिवस या बाजूला कुठं फिरकला नाहीं ?"

"कारण मीं त्यांना येऊं नको म्हणून सांगितलं." नलिनी एकदम उसळून म्हणाली, "कारण तूं त्यांच्याबरोबर इतक्या चमत्कारिक तऱ्हेनं वागतेस, कीं तसं सांगणं मला भागच पडलं."

"तूं शरयूकडे राहत होतीस तेव्हां तुमच्या भेटीगांठीं झाल्या असतील, नाहीं ?"

"हो, पुष्कळ वेळां त्यांची–आमची भेट झाली होती."

"अस्सं का ?" रमाबाईनें तुसड्या स्वरांत विचारलें, "मग तुमच्या लग्नाचं केव्हां ठरलं ?

"जेव्हां आमची इच्छा होईल तेव्हां. मधुकरराव नट आहेत—"

“ आहेतच ते तसे. ” रमाबाई म्हणाल्या.

“ आणि ते किती उत्तम प्रतीचे नट आहेत हें प्रत्येकाला माहित आहेच व लौकरच ते नटवर्य म्हणून प्रसिद्धीला येतील अशी माझी खात्री आहे. ”

“ पण सध्या तरी कांहीं तशीं चिन्हं दिसत नाहींत व ज्या कंपनींत तो आहे त्या कंपनीच्या नव्या खेळांत त्याला दुय्यम प्रतीचं काम आहे. ”

“ छट्! मुळींच नाहीं. उलट मुख्य ‘ कॉमिक पार्ट ’ त्यांना संभाळावा लागतो. ” नलिनी रागानें म्हणाली, “ तूं मला उगाच चिडवून कां बरं त्रास देतेस ?”

“ तूंच चिडत आहेस. मी कांहीं तुला चिडवीत नाहीं. जें जें कांहीं मला खरं दिसतं तेंच सर्व मी तुझ्या नजरेला आणून देत आहें. पण त्याची तुला चीड येते, तेव्हां माझा काय बरं अपराध ? ”

“ मी कांहीं तुझ्याबरोबर बाहेरगांवीं येणार नाहीं. कारण तिथं आमचा सर्व काळ भांडणांतच जाईल. शांतता म्हणून राहणार नाहीं.”

“ भलतंच कांहीं तरी ! नले, मी कधीं तरी भांडतें का ? तरी पण तुझी इच्छाच असली तर तसं का होईना. मग काय, तूं येणार नाहीं हें अगदीं ठरलंच तर ?”

“ होय. मी शरयूबरोबर राहीन आपली. ”

“ तुला कुठूनही सुख होवो म्हणजे झालं. पण ध्यानांत ठेव कीं, जर तूं त्या नटवर्यांबरोबर लग्न केलंस तर मी कांहीं तुझ्या लग्नाला येणार नाहीं हो. ”

“ मी तुला मुळीं अशानं बोलावीन तर कीं नाहीं ?” असें म्हणून नलिनी रागानें उठली व खोलीबाहेर निघून गेली. आपल्या तोंडून यापेक्षां अधिक कांहीं तरी बाहेर पडेल अशी तिला भीति वाटूं लागली. रमाबाई जें कांहीं शेवटीं बोलली त्या वाक्यानें तिच्या अंगाची नुसती लाही झाली. ती खोलीबाहेर पडून एकदम आपल्याच खोलींत जाणार होती. परंतु सफेत दिवाणखान्यांत कोणी बोलत आहे असा तिला

भास झाल्यावरून तिनें आंत सहज डोकावून पाहिलें तों तिला मधुकर व गजाननराव बोलत बसलेले आहेत असें आढळून येतांच अत्यंत आश्चर्य वाटलें. नलिनीला पाहतांच उठून पुढें येऊन मधुकर म्हणाला,

" या बाईसाहेब ! तूं कुठं दिसतेस का पाहातच होतों. "

" मग मला बोलावणं कां पाठवलं नाहीं ?" नलिनीनें विचारलें.

" मींच त्यांना तसं न करण्याबद्दल सांगितलं." गजाननराव मध्येंच उतावीळपणें म्हणाले, " तुझ्याबरोबर रमा होती ना ? मग तुला बोलावतांच तीही तुझ्याबरोबर आली असती व तिचं तें पुढं होणारं 'लेक्चर' माझ्यानं कांहीं ऐकवलं नसतं आणि ह्या खुनापासून तर माझं मन अगदीं चमत्कारिक बनलं आहे. " ते आपल्या कपाळावरील घर्मबिंदु पुसत पुढें म्हणाले.

" आपल्याला त्याविषयीं पुढं कांहीं कळलं आहे का ?" मधुकराकडे चौकस दृष्टीनें पाहत तिनें विचारलें.

" होय." त्यानें ताबडतोब उत्तर दिलें, " मी ह्याचपूर्वी तुला भेटण्यासाठीं आलों असतों; पण तूं नको म्हणून सांगितल्यामुळं अर्थातच माझा नाइलाज होता. "

" तुम्ही इथं बरेच दिवस आलां नाहीं. " गजाननराव मधुकराकडे पाहून म्हणाले.

" होय, तुम्ही चौपाटीवर गेल्यापासून मी इथं आलों नाहीं. पण नलीला मात्र मी भवान्याच्या घरीं भेटत असें. पण नलिनी, तूं जात आहेस का ग ? "

आतांपर्यंत नलिनीची दृष्टि एकसारखी मधुकराच्या चेहऱ्यावर खिळून राहिली होती. तो बोलत होता त्या वेळीं तिचें मुखकमल आरक्त झालेलें होतें. त्यावर पूर्ण फुललेल्या गुलाबाप्रमाणें गुलाबी छटा चढलेली होती. मधुकरानें तिला हा प्रश्न विचारला तेव्हां ती तेथून जाण्याच्याच विचारांत होती. ती म्हणाली,

" माझं थोडं काम असल्यामुळं मला गेलंच पाहिजे. मी आपणास पुन्हा भेटेन. "

" केव्हां ? " तिला दरवाजांत थांबवून मधुकरानें विचारलें.

" मी आपल्याला केव्हां तें कळवीन," असें म्हणून नलिनी तेथून निघून गेली व तिच्या घाईचा हेतु न समजल्यामुळें मधुकर आश्चर्ययुक्त मुद्रा धारण करून गजाननरावांजवळ पुन्हा येऊन बसला.

" नलिनी असं काय बरं म्हणाली ? तिचं झालं आहे तरी काय ?" त्यानें विचारलें. हा प्रश्न विचारते वेळीं मधुकराचा चेहरा थोडा भीतिग्रस्त झालेला दिसत होता.

गजाननरावांची मुद्रासुद्धा कावरीबावरी झालेली दिसत होती. परंतु त्यांच्या बंगल्यांत घडलेल्या खुनाच्या कल्पनेनें तसें होणें साहजिक होतें.

" मला वाटतं, रमा तुमच्याविरुद्ध कांहीं तरी तिच्याजवळ बोलली असावी." ते म्हणाले, " मधुकर, तुम्ही नलिनीशीं लौकर लग्न करून तिला आमच्या कुटुंबाच्या त्रासापासून लवकर मुक्त कराल तर बरं होईल असं मला वाटतं. गरीब विचारी नलिनी ! तिचं सध्या दैव फिरलं असावं."

" मीं तुमच्या म्हणण्याप्रमाणं ताबडतोब केलं असतं; पण सध्या मला तसं करतां येणं शक्य नाहीं." मधुकर अगदीं गळून गेल्याप्रमाणें होऊन म्हणाला, " कारण ह्या नव्या खेळावर व्हावं तसं उत्पन्न होत नाहीं व कंपनीही यथातथाच चालली असल्यामुळं लौकरच ती मला मोडावी लागेल असं वाटतं."

" पण नलिनीजवळ पैसा आहे कीं—"

" पण माझ्या पत्नीच्या धनावर उपजीविका करणं मला मुळींच आवडत नाहीं. ज्या वेळीं मला माझ्या स्वतःच्या पैशानं तिला सुखांत ठेवतां येईल त्याच वेळीं मी तिच्याशीं लग्न करणार आहें."

गजाननरावांनाही थोडीशी शरम वाटली; ते थोडें स्मित करीत म्हणाले,

" पण तुम्ही सांगतां त्यावरून तुमची स्थिति लवकरच सुधारेल असं दिसत नाहीं."

" तसंही कांहीं म्हणतां येणार नाहीं; अशा गोष्टी पूर्वी अजमावतां येत नाहींत. कदाचित मी लवकर श्रीमंतही होईन. "

" खरं कीं काय ! congratulations ! " गजाननराव आनंदित होऊन म्हणाले, "कुणा नातलगाकडून लग्गा साधणार वाटतं ? "

" बहुतेक तसंच; " मधुकर होकारार्थी मान हालवून म्हणाला, " माझा एक मावसभाऊ आहे; त्याचं नांव किनखापे असं आहे. "

हें नांव ऐकतांच मोठ्या आनंदानें ऐकत असलेले गजाननराव आपल्या जागेवरून दचकून उठून म्हणाले, " काय म्हणतां ! "

" किनखापे या आडनांवाचे एक सद्गृहस्थ आहेत. ते माझे मावसबंधु असून नागपूरास राहतात. ते फार श्रीमंत आहेत असं ऐकतों. त्यांची संपत्ति मला मिळेल, नाहीं तर दुसरी एक चुलतबहीण आहे तिला मिळेल. "

गजाननरावांनीं आपली मुद्रा पूर्ववत् धारण करून म्हटलें, " होय; ह्या नांवाच्या एका गृहस्थाला मी ओळखतों. तो पक्का बदमाष असून त्यानं मला बरेच वेळां गंडा घातला आहे. त्या वेळीं तो तरुण असून त्याची विशेष खूण म्हणजे त्याचे डोळे घारे होते. "

" हा कुणी तरी दुसरा माणूस असेल. " मधुकर म्हणाला, "त्याला मीं अद्यापि जरी पाहिलेलं नाहीं, तरी त्याच्या फोटोवरून तो अशा प्रकारचा मनुष्य असेल असं कांहीं मला वाटत नाहीं. व तुम्ही म्हणतां त्याचे डोळे घारे आहेत हें तर मुळींच संभवनीय दिसत नाहीं. सरलेविषयीं म्हणाल तर तिचे डोळे काळेच आहेत. "

" सरला !" गजाननराव उद्गारले, " ही सरला कोण ?"

" माझी चुलत बहिण म्हणून आतांच तुम्हांला सांगितलं ना, ती ती. किनखाप्यांची संपत्ति कदाचित् तिलासुद्धा मिळेल. ती लोणावळ्याला राहते. पण माझी-तिची कांहीं फारशी ओळखही नाहीं. "

" म्हणजे ! हें तर फार चमत्कारिक ! "

" तिचं अस्तित्वसुद्धा मला माहित नव्हतं. थोड्याच दिवसापूर्वी मला हें कळलं. " मधुकर म्हणाला, " आमची एकदा अकस्मात् गांठ

पडली आणि—पण तें सर्व सांगायचं म्हणजे एक मोठं थोरलं बाडच होईल. ”

“ बरं, तें असो ” विषय बदलण्यासाठीं गजाननरावांनीं विचारलें, “त्या खुनाबद्दल तुमचं काय मत आहे ? ”

“ त्याविषयीं मला कांहींसुद्धा विचारूं नका. ” मधुकर त्या गोष्टीचा अगदींच वीट आल्याचें दाखवून म्हणाला, “ मीं जेवढं वाचलं व ऐकलं तेवढंच मला माहित आहे व आतां तर मी त्या गोष्टीला अगदीं कंटाळून गेलों आहें; पण तुमचं तरी मत ऐकूं द्या ! ”

“ तें कांहींच मला सांगतां येणार नाहीं. सर्वच कांहीं मला गूढ वाटतं. ह्या बंगल्यांत झालेल्या खुनामुळं ह्या बंगल्याला मी तर इतका कंटाळून गेलों आहें कीं, हा बंगला सोडून मी लवकरच कुठं तरी बाहेर गांवीं जाऊन राहायचं योजिलं आहे. ”

“ बाहेरगांवीं जाणार ! मग तुमच्या ऑफिसचं काम ?”

ह्या प्रश्नाचें उत्तर गजाननराव देण्यापूर्वींच त्या दिवाणखान्याचा दरवाजा उघडून रमाबाई एकदम आंत आल्या. त्यांच्या हातांत एक वर्तमानपत्र होतें. दिवाणखान्यांत मधुकराला पाहून त्यांच्या चेहऱ्यावर तिरस्कार दिसूं लागला; परंतु ताबडतोब त्यांनीं आपला चेहरा बदलून मधुकराकडे स्मित करीत म्हटलें,

“ ओ हो ! तुम्हांला इतक्या दिवसांनीं पाहून खरोखरच मला फारच आनंद झाला. नलिनी तुम्हांला भेटली का ? मी तिला पाहिजे तर पाठवून देतें. तुम्हांला भेटण्यासाठीं तिची अगदीं धडपड चालली आहे.”

“ नको, मी तिला भेटलों व आतां इथून निघण्याच्याच विचारांत मी आहें.”

“ अरेच्या ! ” रमाबाई पूर्वींच्याच वृत्तीनें म्हणाली, “असं का ?”

“ उं : ! हा विषय पुरे. ” गजाननराव मध्येंच म्हणाले, “ पण रमे, एवढया घाईनं कां आलीस ? झालं काय तें तरी सांगशील कीं नाहीं ? ”

परंतु त्यांच्या भाषणाकडे लक्षच न देतां त्यांच्या कपाळास हात लावून ती म्हणाली, “ किती गरम लागतं आहे तुमचं कपाळ हें ! ह्या खुनामुळं तुम्हांला बराच त्रास झालेला दिसतो. ”

" त्याची पुन्हा आठवण काढू नको म्हणून मीं तुला सांगितलं होतं ना ? " आपल्या कपाळावरील तिचा हात काढीत गजाननराव म्हणाले.

"पण आतां तरी आठवण काढल्याखेरीज गत्यंतरच नाहीं." रमाबाई एका खुर्चीवर बसून म्हणाली, " मधुकरराव, जाऊं नका. आमचं कांहीं गुप्त भाषण नव्हे. वर्तमानपत्रांतला हा एक ' पॅरिग्राफ ' आहे."

" त्यांना कांहीं शोध लागला आहे कीं काय ?" मधुकरानें शांतपणें विचारलें.

" नाहीं; पण त्यांतल्या गुंतागुंतींतला हा एक धागा आहे, असं म्हणायलास हरकत नाहीं. ही खोली तुम्हांला माहित आहेच कीं—"

" ही खोली !" दोघांनींही एकदा त्या सफेत दिवाणखान्यासभोंवार पाहिलें व नंतर त्यांनीं आपले डोळे रमाबाईकडे रोखले.

" होय. " रमाबाई शांतपणें म्हणाली, " मी तुम्हांला कांहीं सबंध 'पॅरा' वाचून दाखवीत नाहीं; पण त्याचा थोडक्यांत सारांश सांगतें. पोलिसखात्याच्या वरिष्ठ अधिकाऱ्याला नुक्तंच एक पत्र आलं असून त्यांत, लोणावळ्याला असलेल्या एका बंगल्यांत ह्या सफेत दिवाणखान्यासारखाच, अगदीं असाच, एक सफेत दिवाणखाना आहे, असं कमिशनरला कळविलेलं आहे. "

" लोणावळ्याला ! " मधुकरानें आश्चर्यचकित होऊन एकदम विचारलें.

" होय, किनखापे या नांवाचा एक गृहस्थ त्यांत राहतो."

" किनखापे ! " गजाननराव साश्चर्य मुद्रेनें मधुकराकडे पाहत म्हणाले, " तुम्ही नुक्तंच सांगितलं तेंच हें नांव."

" होय. " मधुकर म्हणाला, " सरला किनखापे या नांवाची माझी एक मावसबहीण आहे."

" असं !" रमाबाई म्हणाल्या, " मग जिचा ह्या दिवाणखान्यांत खून झाला तीच तर ती नसेल ? गरीब बिचारी !"

" रमे," गजाननराव एकदम उठून म्हणाले, " तूं म्हणतेस तरी काय ?"

" इतकं कांहीं उतावीळ होऊं नये." रमाबाई पूर्वीचीच शांत मुद्रा ठेवून म्हणाल्या, "ह्या घराची–लोणावळं येथील घरांतील–भाडोत्री मिसेस किनखापे कुठं नाहींशी झाली आहे. पोलिसाला आलेल्या पत्रांत त्याचा कांहीं उल्लेख केलेला नाहीं. पण चौकशीअंतीं तसा शोध लागला आहे. कदाचित खून झालेली स्त्री तीसुद्धा असूं शकेल. तिचा ह्याच बंगल्यांत खून व्हावा हेंच चमत्कारिक दिसतं. पण काय हो," ती गजाननरावांकडे वळून म्हणाली, " हा असा दिवाणखाना तयार करण्याची कल्पना अगदीं तुमची स्वतःचीच आहे का ?"

" होय." गजाननराव थोडे घोटाळून म्हणाले, " ही माझी स्वतःचीच कल्पना असून ही किनखापे कोण हें मला मुळींच ठाऊक नाहीं व तिनं ह्या दिवाखाणन्यासारखाच दिवाणखाना कां तयार केला तेंही मला माहित नाहीं."

" पण मी तें शोधून काढीन." जातां जातां मधुकर म्हणाला व असें म्हणून तो निघून गेला. गेल्यानंतर रमाबाई व गजाननराव एकमेकांच्या तोंडाकडे पाहतच राहिलीं.



प्रकरण ७ वें

## दुसरा सफेत दिवाणखाना

जी. आय. पी. रेल्वेनें मुंबईहून पुण्याला जाते वेळीं खंडाळ्याचा सर्व घाट चढून गेल्यावर, सर्व सृष्टिसौंदर्य अवलोकन केल्यावर, परमेश्वराच्या सर्व अगाध लीलांचें प्रत्यंतर पाहून त्याचें कौतुक केल्यानंतर, कर्जत, खंडाळें, इत्यादि स्टेशनें जाऊन लोणावळें हें स्टेशन लागतें. येथें घाटाच्या चढावाचा शेवट होतो. घाटांत असलेल्या सृष्टिसौंदर्याचा येथेंच शेवट होतो. घाटांतील रमणीय स्थलें, व वनश्रीची शोभा यापुढें पाहावयास मिळत नाहीं व येथेंच गाडीच्या इंजिनद्वयांपैकीं एक आपल्या जोडीदारास सोडून निघून जातें. अशा या रमणीय ठिकाणीं, वाचक हो, आपणास आतां जावयाचें आहे. लोणावळें हें ऐकून तुम्हाला माहित आहेच. तिकडे जर न गेलें तर तुम्हाआम्हांस तिकडे होणारी मजा पाहावयास सांपडणार नाहीं. काय म्हणतां? तुमच्याजवळ पैसे नाहींत? इतकेंच ना? त्याची काळजी तुम्हांला नको. आम्हीं तुमच्यासाठीं एक ‘ स्पेशल ’ तयार ठेविली आहे. मग तर तुमची हरकत नाहीं ना? हं, बसा तर आतां गाडींत. आमची गाडी झटकन् तुम्हांला आपल्या इच्छित स्थळीं घेऊन जाईल. मिटा आतां डोळे. भर्रर्रर्रर्रर्र! हं उघडा डोळे. हें पाहा लोणावळें आलें. उतरा खालीं. कशी आहे आमची गाडी! काय म्हणतां? घाटांतली शोभा तुम्हांला पाहावयास मिळाली नाहीं? ती पुन्हा मुंबईस जाते वेळीं पाहूं. चला आतां बाहेर जाऊं या. गांवांत त्या घाणींत जाण्याचें आपणांस कांहीं एक कर्तव्य नाहीं. आपणास गांवाच्या बाहेरच जावयाचें आहे व तेथें तुम्हांला

चांगली वनश्री पाहावयास मिळेल. टांग्याची गरज नाहीं. पायींच जाऊं. चला तर.

'हेस्टिंग्स लेन' हा लोणावळें या शहराबाहेर एक रस्ता असून तोच रस्ता पुढें खंडाळ्यास जातो. ह्या रस्त्याच्या दोन्ही बाजूस छोटे टुमदार बंगले असून, आजूबाजूचें सृष्टिसौंदर्य फारच रमणीय आहे. खंडाळ्याचा दूरपर्यंत दिसणारा घाट, त्याच्या अलीकडे दिसणारी, परंतु मनास भयद अशी खोल दरी, व या सर्व दरींतून पसरलेले लहानमोठे वृक्ष व रान, पलीकडे दिसणारा उंचच उंच असा 'ड्यूक्स नोज' (Duke's Nose) या नांवचा डोंगराचा कडा, त्याखालीं दिसणारें खोपोली खेडें व त्यालगतचीं हिरवींचार शेतें व त्यांतच मधून मधून डोकावणाऱ्या गरीब परंतु अत्यंत सुखी अशा शेतकऱ्यांच्या झोंपड्या; तसेंच एका बाजूस दिसणारें पठार व त्यांतून असलेले व चाऱ्यांनीं आच्छादिलेले असे उंचवटे, वगैरे देखावा पाहून दुःखित मनाला सुद्धा किंचित् काल विसावा मिळाल्याखेरीज राहावयाचा नाहीं, अशा तऱ्हेची रमणीयता त्या जागीं आहे.

अशा ह्या 'हेस्टिंग्स लेन' रस्त्यावरील एका छोट्या परंतु टुमदार अशा एका बंगल्यासमोरील फाटकाजवळ एके दिवशीं सकाळीं इन्स्पेक्टर सर्जेराव येऊन उभे राहिले. ते या वेळीं आपल्या नेहमींच्या पोलिशी वेशांत नसून, घरच्या साध्या पोषाखांतच होते. त्यांची मुद्रा किंचित् गंभीर व विचारी अशी दिसत होती. फाटकाजवळ येतांक्षणींच त्यांनीं त्या बंगल्यावर व त्यासभोंवतालीं असलेल्या छानदार बागेवर एकदा नजर फेंकली. बंगला लहानच असून आजकालच्या पद्धतीप्रमाणें सीमेंटचा बांधलेला होता. त्याकडे पाहतांच हा आंतून सर्व प्रकारच्या सुखसोयींनीं परिपूर्ण व सुव्यवस्थित असावा असें सहज अनुमान करतां येई व त्यावरून त्या बंगल्यांत राहणारा इसमही चैनीचा व आरामाचा भोक्ता असावा असें वाटत असे. सभोंवतालचा बगीचाही चांगल्या तऱ्हेनें रचलेला असून त्यांतलीं फुलझाडें व्यवस्थित लावलेलीं होतीं. या वेळीं तीं चांगलीं फुलून आलेलीं होतीं. बागेसभोंवतीं लांकडी

फळ्यांचें छानदार कुंपण असून त्याला निळसर रंग दिलेला होता. त्या फळ्यांतच मध्येंच एक लहानसें फाटक तयार केलेलें होतें. फाटकाजवळच्या एका खांबाला एक लहानच लांकडी फळी ठोकलेली असून त्यावर 'शांतिगृह' अशीं अक्षरें रंगविलेलीं होती. बंगल्याच्या दरवाजावर तसेंच खिडक्यांवर पडदे सोडलेले होते. बंगल्याचा मुख्य दरवाजा लांकडी असून त्याला लागून बाहेरच्या बाजूला एक कांचेचा दरवाजा लावलेला होता. त्या दरवाजाच्या पितळी कड्याही (handles) अद्यापपर्यंत चकचकीत दिसत होत्या.

त्या वेळीं थंडगार वारा वाहत असून सर्जेराव त्या वाऱ्याचा मजेत आस्वाद घेत फाटकासमोर उभे राहिले होते. सूर्यनारायण क्षितीजावर थोडासा आलेला होता. सर्जेराव त्या जागीं उभे राहून त्याच ठिकाणीं, त्यांनीं बोलाविलेल्या एका मनुष्याची वाट पाहत होते. त्या वेळीं सात वाजून पांच मिनिटें झालीं असून सर्जेरावांनीं त्या माणसाला नेमून दिलेली भेटण्याची वेळ टळून गेली होती. थोड्या वेळानें सर्जेराव किती वाजले हें पाहण्याकरतां आपलें घड्याळ काढून पाहातात तोंच तो मनुष्य तेथें येऊन थडकला. तो मनुष्य वृद्ध असून त्याच्या शरीरावर पडलेल्या सुरकुत्या त्याचें वयोमान दर्शवीत होत्या. त्यानें अशा तऱ्हेचा गचाळ पोषाख केला होता कीं, तो पाहतांच त्याला पोटभर खावयास मिळत नसावें अशीच एखाद्याची समजूत झाली असती. तो खोंकत खोंकत मधून मधून खांकरत व आपल्या हातांतील जाड दंडुका जमिनीवर आपटीत आपटीत सर्जेरावाजवळ आला. सर्जेरावांजळ येतांच तो त्यांना प्रथम निरखून पाहूं लागला. आपणास भेटणारा हाच माणूस असावा असें सर्जेरावांस वाटल्यामुळें त्यांनीं त्याला प्रश्न केला, "आपलंच नांव श्रीकोटे का?"

"कदाचित असेलही." सावधगिरी राखण्याच्या हेतूनें त्या वृद्धानें उत्तर दिलें, "पण मी ज्यांना एका स्थळीं भेटायला बोलावलं होतं ते इन्स्पेक्टर सर्जेराव तुम्हीच का?"

"होय, मीच तो. आपण, मिसेस किनखापे व सफेत दिवाणखाना यासंबंधानं लिहिलेल्या पत्रावरून मी इथं आपणाला भेटायला आलों आहें."

"मी तुम्हांला शोधाचा पाया दाखवून दिला तर तुम्ही मला काय बक्षिस द्याल ?" त्या वृद्ध गृहस्थानें कावेबाजपणानें विचारलें.

"तें कांहीं मला सांगतां येत नाहीं. ज्यांच्या घरीं त्या बाईचा खून झाला त्यांनीं मला, मी जर खुनी इसमाला शोधून काढलं, तर आपण कांहीं तरी बक्षिस देऊं असं कबूल केलं आहे; व माझी खात्री आहे कीं, तो गृहस्थ कमींत कमी दोन हजार रुपये तरी मला देईल."

"मग प्राप्तीचा अर्धा वांटा मला मिळाला पाहिजे." तो वृद्ध खोंकत खोंकत म्हणाला, "नाहीं तर मी कांहीं तुम्हांला आंत सोडणार नाहीं."

"तें तर तुमच्या हातून होणं शक्यच नाहीं." सर्जेराव दटावणीच्या स्वरानें म्हणाले, "तुमच्या पत्राच्या जोरावर मीं ह्या घराचा झाडा घेण्याबद्दल वारंट मिळवून आणलं असल्यामुळं मला कायद्यानं ह्या घरांत शिरतां येईल, समजलां ? तुम्हांला जर बक्षिस पाहिजे होतं तर पत्र लिहिण्यापूर्वींच तसा वायदा करायचा होता."

तो वृद्ध मनुष्य आपली काठी जमिनीवर जोरानें आपटून म्हणाला, "पण माझ्या भाड्याचं काय ?"

"त्याबद्दल मी कांहीं जबाबदार नाहीं. ती बाई तुझं देणं लागत होती का ?"

"नाहीं; तिनं आजपर्यंतचं सर्व भाडं चुकतं केलं आहे. पण वर्तमानपत्रांत प्रसिद्ध झाल्याप्रमाणं जर तिचा खून झाला असेल, तर मला ह्या घराला आतां कांहीं भाडोत्री मिळायचा नाहीं."

"पण मयत स्त्रीचं नांव किनखापे होतं याची आपल्याला अद्याप खात्री नाहीं."

"पण ज्या दिवशीं त्या बाईचा खून झाला त्याच दिवसापासून ही बाई नाहींशी झालेली आहे." त्या वृद्धानें उत्तर दिलें, "व तिचं हें घर तुमच्यापुढं आहे."

"व तेंच मला आतां पाहायचं आहे. या घरांत रत्नमहालांतल्याप्रमाणंच सफेत दिवाणखाना आहे. खरोखर तसल्याच दिवाणखान्यांत

पण दुसरीकडे तिचा खून व्हावा हें किती चमत्कारिक आहे ! हा काय घोटाळा असावा देव जाणे ! ”

“ जर मला तुम्ही कांहीं तरी द्याल तर मी तुम्हांला ह्या बाबतींत माझ्या हातून होईल तितकी मदत करीन. मी किती गरीब आहें तें पाहा ! हे माझे कपडे पाहा; तसंच मला जेवायलासुद्धा पोटभर मिळत नाहीं. नुसत्या भाकरीवर मी कसे तरी दिवस काढीत आहें.”

“ नाहीं. तें कांहीं मी सांगत नाहीं.” तो मनुष्य अत्यंत कद्रू असावा असें वाटून सर्जेराव म्हणाले, “ मला आतां घर दाखव. ”

“ नशीब आमचं, ” तो वृद्ध गृहस्थ निराशेचें चिन्ह दाखवून, फाटकाकडे वळून म्हणाला.

परंतु तितक्यांत त्याची नजर त्याच वेळीं तिकडे येणाऱ्या एका मुलाकडे जाऊन त्याच्यावर काठी उगारून तो म्हणाला, “काय व्रात्य मुलगा आहे हा ! किती घाणेरडं बोलत आहे तें पाहा. तुम्ही त्याला असल्या अपमानकारक शब्दांबद्दल पकडून कां नेत नाहीं ? ”

“ अहो साहेब, ” तो मुलगा सर्जेरावांकडे वळून म्हणाला, “ हा म्हातारा अतिशय चिक्कू आहे. खूब चिक्कट आहे. नुसता मारवाडी आहे ! कायरे ए मारवाड्या ! साहेब, त्याचे कपडे तर पाहा. मी जर आतां तुम्हाला कांहीं खायला घेऊन आलों तर हा तुम्हाला धड खाऊंसुद्धा देणार नाहीं. ”

“ ह्या काठीनं थोबाड रंगवीन चांगलं ! ” तो वृद्ध रागानें उसळून म्हणाला, “ पाजी कुठचा ! ”

“ जाऊं द्या हो. ” सर्जेराव त्याला दूर सारून म्हणाले, “ त्या पोराच्या नादीं काय लागतां ? सांगून सवरून मुलं तीं. चल, जा रे पोऱ्या, निघून जा इथून ! ”

पण तो मुलगा कांहीं जाईना. त्यानें सर्जेरावांच्या हातांत एक पाव देऊन म्हटलें, “ हा ह्या घरांतल्या बाईला द्या, साहेब. पण सांभाळा हो ! तो एकदम हिसकून घेईल. मी सांगतों तें अक्षरशः खरं आहे. ”

" पशु कुठचा ! " तो वृद्ध गृहस्थ बागेत शिरतां शिरतां म्हणाला.

सर्जेरावांनीं मागें राहून आपल्या खिशांतून एक रुपया काढून म्हटलें, " बाळ, इकडे पाहा. तूं ह्या घरांतील बाईला रोज पाव आणून देतोस का ? "

" नाहीं. " तो मुलगा रुपया पाहून पुढें येऊन म्हणाला, " एक दिवस आड आणतों. "

" मग हल्लीं जो पाव तूं आणतोस तो नेहमीं घेतला जातो काय ? "

" नाहीं. आज एक आठवडा होऊन गेला. कदाचित् पंधरावडा-सुद्धा असेल. मी नेहमींप्रमाणं पाव आणून स्वयंपाकखोलीमधल्या ठरलेल्या फडताळांत ठेवून देतों. पण कित्येक दिवसांचे पाव तसेच फडताळांत पडले आहेत. मला वाटतं, ते पाव खाण्यास ती बाई घरांतच नसावी. "

" तूं तिला शेवटीं केव्हां पाहिलंस ? "

" पंधरा दिवस होऊन गेले असावे. " तो मुलगा बोटें मोजीत म्हणाला, " नक्की तारीख कांहीं मला सांगतां येणार नाहीं; पण तो गुरुवारचा दिवस होता. तिनं नेहमींप्रमाणं पाव खाल्ला. नंतर शनिवारीं तिला ताजा पाव मिळावा म्हणून मी तो थोडा उशिरानंच घेऊन आलों; परंतु ती घरींच नव्हती व त्या दिवसापासून ती घरीं नसावी असं दिसतं. कारण मीं कांहीं त्यानंतर तिला पाहिली नाहीं; पण साहेब, ती कुठं आहे हें तुम्हांला माहित आहे का हो ? असलं तर तिचा पत्ता सांगा. कारण आमचा शेट तिच्याकडून सर्व पावाचे पैसे घेणार म्हणतो. कारण तिनं कांहीं पाव बंद करायला आम्हांला सांगितलेलं नसून ती पाव खात नाहीं हा कांहीं आमचा अपराध नव्हे. "

" पण आपल्यामागं तिनं नोकर कां ठेवूं नये ? "

" कारण तसं करायला ती अगदींच गरीब होती म्हणून. घरांतील सर्व काम ती स्वतःच करीत असे. पण साहेब, कांहीं असो, ती बाई फारच चांगली होती हो ! पण तिचं कांहीं बरंवाईट तर झालं नाहीं ना ? "

" नाहीं. मी फक्त तिला भेटायला आलों होतों."

" पण ती घरीं नाहीं हें मी खात्रीपूर्वक सांगूं शकतों. कारण ती असल्याचं कोणतंच चिन्ह दिसत नाहीं. मला वाटतं, त्या बुढ्ढेबुवांनींच तिला पळवून नेलं असावं. कारण मीं त्याला तिच्याकडे एकदोनदा डोळे मिचकावतांना पाहिलं होतं."

" इतकी ती सुंदर आहे का ?"

" होय, ती सुंदर व नाजुकही आहे. तिचे केस काळेभोर असून खूप लांब आहेत. ती वर्णानं गोरी व एकंदरींत दिसण्यांत सुंदर स्त्री-प्रमाणं दिसत असे. तिचा नवरा कोणी व्यापारी असून तो मधूनमधून इकडे येत असतो. पण तो बहुतकरून बाहेरगांवींच असतो."

" तूं त्याला कधीं पाहिला होतास काय ?"

" एकदा काळोखांत त्याला मीं पाहिलं होतं. तो दिसण्यांत उंच आहे. पण तो कसा काय दिसतो हें कांहीं मला सांगतां यायचं नाहीं."

" तूं फार हुषार मुलगा दिसतोस." आपल्या खिशांतून डायरी काढून व त्याला तो रुपाया देऊन सर्जेराव म्हणाले, " मला आणखी कांहीं माहिती तुझ्याकडून पाहिजे आहे."

" माझं नांव कृष्णा असून मी त्या ' गडाप्पा बेकरीं'त नोकरीला असतों." आपल्या झालेल्या स्तुतीनें खूष होऊन तो मुलगा म्हणाला.

" होय, तें दुकान मला माहित आहे." सर्जेराव ती हकीकत आपल्या डायरींत लिहून घेत म्हणाले, " मी एकदा इथं राहायला आलों होतों, तेव्हां त्याच दुकानांतून पाव घेत असें."

" आमचा शेट इतका कांहीं पैशाचा हपापलेला नाहीं. ही बाई त्याचे पैसे वेळच्या वेळीं चुकते करते. इतकी ती सज्जन आहे."

त्याचें आणखी कांहीं वेळ असेंच संभाषण चाललें असतें, परंतु तितक्यांत आंत गेलेला तो वृद्ध गृहस्थ ओरडत बाहेर आला. " अहो, पोलिस रावसाहेब," त्यांनीं रागारागानें सर्जेरावांस हाक मारली, "तुम्ही या कारट्याबरोबर बोलण्यासाठीं इथं आलां आहां काय ?"

त्याच्या तोंडचे 'पोलिस रावसाहेब' हे शब्द ऐकतांच कृष्णा दच-कला व दोन पावलें मागें सरून म्हणाला, "आपण पोलिसखात्यांतले आहां काय ? साहेब, या बाईला कांहीं अपघात तर झाला नाहीं ना ?"

"नाहीं." अशा रीतीनें आपण कोण हें उघडकीस आलेलें पाहून त्रासून सर्जेराव म्हणाले, "पण आपलं आतां झालेलं संभाषण जर कोणाला कळवणार नाहींस तर मी तुला पुढं पुष्कळ बक्षिस देईन."

"त्याबद्दल साहेब, मुळींच काळजी करूं नका. ह्या अशा गोष्टी गुप्त राखण्याबद्दल आमचा शेट नेहमी माझी स्तुति करीत असतो." असें म्हणून तो पुढें येऊं लागला; परंतु सर्जेरावांनीं त्याला ताबडतोब तेथून निघून जाण्यास सांगितलें. व तोही त्या वृद्ध मनुष्याला वेडावीत पळत पळत तेथून निघून गेला. तो निघून गेल्यावर सर्जेराव आंत शिरला.

"जर मिस्टर किनखापे या वेळीं इथं आले तर मी त्यांना हें वारंट दाखवून मला ह्या घरांत शिरण्याचा काय हक्क आहे तें सांगेन." तें वारंट दाखवून सर्जेराव म्हणाले.

"किनखापे ! कोणाला ? त्या बाईला वाटतं ?"

"अंहं; तिच्या नवऱ्याला."

"मीं तर त्याला कधींच पाहिलेला नाहीं." तो वृद्ध स्वतःशींच परंतु साधारण मोठ्यानें व सर्जेरावाला ऐकूं येईल अशा तऱ्हेनें म्हणाला, "एकदा त्या स्त्रीनं मात्र आपलं लग्न झालेलं आहे असं सांगितलं होतं. पण घराचं भाडं तीच देत असे व घरांतही एकटीच राहून सर्व कामकाज ती जातीनं पाहात असे. मीं त्याला कांहीं अजून पाहिलेलं नाहीं."

"तो व्यापारी असून फिरतीवर असतो असं त्या मुलानं सांगितलं."

"तो पोरगा पक्का बदमाष आहे." त्या वृद्धानें उत्तर केलें, "एखाद्या नुसत्या व्यापारी माणसाबरोबर लग्न करणारी ती स्त्री नव्हती. माझ्याजवळ ती आपल्या नवऱ्याविषयीं कधीं कधीं बोलत असे, पण तो कोणता उद्योगधंदा करतो हें तिनं मला कधींच सांगि-तलं नाहीं."

"हें घर तिच्याच नांवावर आहे का?"

"होय, व मला वाटतं तिचं लग्नही झालं नसावं."

"घर भाडयानं घेते वेळीं तिनं कुणाची ओळख दाखवली?"

"एका मास्तराची ओळख दाखवून तिनं एकदम सहा महिन्यांचं भाडं आगाऊ दिलं होतं."

"मास्तर! काय त्याचं नांव?"

"दांडेकर मास्तर."

"कोणत्या विषयाचे मास्तर आहेत ते?"

"साहेब," तो वृद्ध म्हणाला, "हें मला कसं बरं कळणार? कोणाही माणसाला आपली ओळख कोणालाही–विशेषतः परक्या इसमाला मास्तर या नात्यानं करून देतां येते."

मास्तराचें नांव ऐकतांच व तो विचार मनांत येतांच सर्जेरावांना मागच्या एका प्रसंगाची आठवण झाली. नलिनीची चौकशी करीत असतां तिनें शस्त्रापासून सुरवात करण्यास सांगितलें होतें तें त्यांना आठवलें. शस्त्र इकडचें नसून बाहेरचें असावें असें नलिनी म्हणाली होती. तेव्हां त्यांनीं ताबडतोब त्या वृद्ध माणसाला विचारलें,

"हे मास्तर ह्याच इलाख्यांतले आहेत का?"

"बहुतकरून तो इकडचा नसावा, असं मला वाटतं." त्या वृद्ध गृहस्थानें उत्तर दिलें.

"त्याला तुम्हीं कधीं पाहिलं होतं का?" सर्जेरावांनीं पुन्हा विचार करून विचारलें.

"नाहीं. अशा माणसांच्या नसत्या चौकशा करायला मला वेळ कुठं आहे? मला त्या बाईनं त्याचा पत्ता दिला होता, त्या पत्त्यावर एकदा मीं त्याला पत्र मात्र लिहिलं होतं. ती तो आपला आतेभाऊ आहे असं म्हणत असे. मीं त्याला पत्र धाडलं होतं. त्याचं उत्तर त्यानं 'ती स्त्री आपली मामेबहीण असून तिच्याविषयीं कसलाच अंदेशा बाळगूं नये,' असं लिहिलं होतं. व खरोखर ती तशी होतीही; पण तिचं लग्न झालं असेल असं मला कांहीं वाटत नाहीं. जर तिचं लग्न

झालं असतं तर तिचा पति इथं दिसला नसता का? व्यापारी म्हणे! निव्वळ थाप. अशा गोष्टी मला तरी सांगूं नका."

"त्या मास्तरचा पत्ता काय होता?"

"नं. २० डिलाइल रोड, माटुंगा असा होता. पण त्याचा आतां कांहीं उपयोग होईल का?"

हा पत्ता ऐकतांच सर्जेरावांच्या तोंडून एकदम अस्पष्ट आश्चर्योद्गार बाहेर पडला.

"हा रस्ता रत्नमहालापासून फार दूर नाहीं. एका हाकेच्या अंतरावर आहे."

सर्जेरावांचें हे शब्द ऐकून वृद्ध गृहस्थानें पुढें विचारलें, "त्यानं तर तिचा खून केला नसेल ना? तुमचं काय मत आहे?"

"तुम्हीं ह्या गुंतलेल्या धाग्याचं एक टोंक सोडवून माझ्या हातीं दिलं आहे असं मला वाटतं." सर्जेराव त्या मास्तराचा पत्ता आपल्या डायरींत लिहून म्हणाले, "याबद्दल तुम्ही कोणाजवळ कांहीं बोलूं नका बरं का? याबद्दल मी तुम्हांला कांहीं तरी देईन."

"अर्धे माझे बरं का." तो कद्रू माणूस पुन्हा म्हणाला, "फक्त हजारच मिळणार! पण कांहीं हरकत नाहीं. हजार तर हजार. वास्तविक पाहिलं तर त्यांनीं–काय हो त्यांचं नांव तें–गजाननराव हिंवाळे–त्यांनीं मलाच दोन हजार रुपये द्यावे; परंतु नाहीं तर नाहीं. मिळतील तेवढे तर घ्यावे."

"खरंच का!" सर्जेराव आपली डायरी खिशांत घालीत म्हणाले, "आणि मी चौकशी करतो आहें ती कशाकरतां?"

"हे असे खटले शोधून काढण्यासाठीं सरकार तुम्हांला पगार देतच आहे. मला कांहीं तसा पगार मिळत नाहीं." तो गृहस्थ दरवाजांत शिरून म्हणाला, "पण आतां तें राहूं द्या. आंत येऊन ही खोली पाहा. माझ्या वेळेला पुष्कळ मोल आहे. तुमच्याबरोबर सर्व दिवस बोलत बसायला मला फुरसत नाहीं. हं, हा पाहा दिवाणखाना."

## दुसरा सफेत दिवाणखाना

तो दिवाणखाना पाहतांच सर्जेराव आश्चर्यानें स्तंभितच झाले. रत्नमहालांतील सफेत दिवाणखान्याप्रमाणेंच, अगदीं थेट तसाच, तो तयार केलेला होता. मात्र त्यांतील सामान रत्नमहालांतील सामाना-इतकें मौल्यवान नव्हतें. भिंती व छत हीं तेलाच्या रंगानें पांढरीं रंगविलीं होतीं; तसेंच जमिनीवर पसरलेला गालिचा व इतर सर्व लांकूडसामान पांढऱ्या रंगाचें होतें. एकंदरींत हा दिवाणखाणा अगदीं रत्नमहालातील दिवाणखान्याप्रमाणेंच होता. परंतु त्यांत जशा अत्यंत मौल्यवान व सुखसोईच्या वस्तु होत्या तशा यांत नव्हत्या. एरवीं हे दोन्ही दिवाणखाने सारखेच होते. या घरांत राहणाऱ्या स्त्रीचा-किनखापे हिचा-तसल्याच एका दिवाणखान्यांत परंतु मुंबईसारख्या ठिकाणीं खून व्हावा हा विलक्षण योगायोग दिसत होता.

"तरी ज्या स्त्रीचा रत्नमहालांत खून झाला ती हीच आहे कीं काय हें आम्हाला अजूनही नक्की सांगतां येणार नाहीं." सर्जेराव सभोंवार पाहत म्हणाले.

"अं! त्यांत तर आतां संशय उरला नाहीं." तो वृद्ध गृहस्थ एका वेताच्या खुर्चीवर बसून म्हणाला, "तो पाहा तिकडे तिचा फोटो आहे."

दिवाणखान्यांतील एका मेजावर दुहेरी अशी फोटोची एक रुपेरी चौकट (silver frame) होती. त्या फ्रेमच्या डाव्या हाताकडील चौक-टींत एका सुंदर स्त्रीचा फोटो होता. फोटो पाहतांच तो त्या मयत स्त्रीचाच आहे हें सर्जेरावांनीं ताबडतोब ओळखलें.

"हा खात्रीनं तिचाच फोटो आहे." त्या फोटोकडे बराच वेळ पाहत सर्जेराव म्हणाले, "बिचारीचा खून असल्याच जागीं पण दुसऱ्या ठिकाणीं कसा व्हावा हें कांहीं मला कळत नाहीं. ह्या खटल्याच्या बाबतींत जितकं खोलांत शिरावं तितकाच तो अधिकाधिक गूढ होत चालला आहे. पण दुसऱ्या चौकटीबद्दल काय ?" ते पुन्हा एकदा दिवाणखान्यासभोंवतीं पाहत म्हणाले.

"मला वाटतं, त्यांत तिच्या नवऱ्याचा फोटो असावा."

"पण तो इथून काढून टाकलेला आहे." सर्जेराव म्हणाले.

" म्हणजे !" असा एक आश्चर्योद्गार काढून त्या वृद्ध गृहस्थानें ती रौप्यचौकट नीट पाहण्याकरितां आपल्या हातांत घेतली व त्यांत खरोखरच फोटो नाहीं असें पाहून तो म्हणाला, " खरोखरच फोटो काढून घेतलेला आहे; पण यांत निःसंशय त्याचाच फोटो होता; कारण एके दिवशीं मीं तिला तिच्या नवऱ्याबद्दल विचारलं असतां तिनं यांतील फोटो मला दाखवून तो त्याचाच असल्याचं मला सांगितलं होतं."

" त्या माणसाचा चेहरा कसा काय दिसत होता, हें तुम्हांला सांगतां येईल का ? " सर्जेरावांनीं त्या वृद्धाला विचारलें.

" नाहीं; कारण माझी नजर इतकी वाईट आहे कीं, दोन अक्षरं असलीं तरी तिथं मला एकच अक्षर दिसूं लागतं; पण इतकं मात्र मी सांगूं शकेन कीं, त्यानं दाढी राखलेली होती."

" टोंकदार दाढी होती ?" आनंदित होत्साते सर्जेरावांनीं विचारलें.

" तें कांहीं मला सांगतां येणार नाहीं; पण त्याला त्या फोटोंत दाढी होती, एवढं बरीक खरं आहं. सरलाबाई मला सांगत असत कीं, उद्योगधंद्यामुळं आपल्या नवऱ्याला नेहमीं दूरदेशीं फिरावं लागतं. पण तो व्यापारी होता हें तर तिनं मला केव्हांच सांगितलं नाहीं."

" सरला कधीं बाहेर जात असे काय ? "

" छेः ! ती कधींच सहसा बाहेर पडत नसे, हें मीं तुम्हांला पूर्वीच सांगितलं आहे. एखाद्या एकलकोंड्याप्रमाणं ती सर्वकाळ घरांतच बसून असे. ती अगदीं सज्जन व कुलीन होती, पण अशा प्रकारची एककल्ली स्वभावाची होती. तिला माणसांत मिळून मिसळून वागणं आवडत नसे व हा तिचा स्वभाव मला तर मुळींच आवडत नव्हता. आज ती पांच वर्षांहून अधिक काल माझी भाडोत्री असून आपलं भाडंही वेळच्या वेळीं चुकतं करीत असे; पण ती कोणालाही ओळखत नव्हती व कोणी तिला भेटायला आलाच तर त्याची ती भेट घेत नसे. तिनं हा अशा प्रकारचा दिवाणखाना रचलेला आहे हें मला मी इथं भाडं घ्यायला येत असें म्हणून कळलं."

" ती आपलं भाडं वेळच्या वेळीं चुकतं करीत असे का ? "

" होय. माझं भाडं मिळेल किंवा नाहीं ही शंका मला येत असल्या-मुळं मीच तें घेण्याकरतां इथं वेळच्या वेळीं येत होतों. आणि ताही आपलं भाडं कुरकुर केल्याशिवाय वक्तशीर देत असे. "

" तिला गाण्याचा शोक होता का ? "

" ती कधींमधीं नाटकाला जात असल्यामुळं मला वाटतं ती गाण्याची शोकीन असावी. "

" मग सांखळीचा दुवा जुळला तर ! " गाण्याची आठवण होऊन सर्जेराव आनंदानें ओरडले, " ती स्वत: कधीं गात असे काय ? "

" तिला गातांना मीं तर केव्हांच ऐकलेलं नाहीं. आणि तिची मला असावी तितकी फारशी माहितीही नाहीं; कारण ती माझ्यापाशीं विशेष असं कधींच बोलत नसे. तिनं पांच वर्षांपूर्वी इथं येऊन हें घर भाड्यानं घेतलं. त्यानंतर तिचा नवरा आला. हेंसुद्धा तिनंच स्वत: मला सांगितलं. पण मीं कांहीं त्याला कधीं पाहिलं नाहीं व ती या घराचं भाडं स्वत:च देत असल्यामुळं मला अधिक विचारतांही येईना. एवढीच काय ती माहिती मला आहे."

"तिचं लग्न झालं नव्हतं असं मघां तुम्हीं म्हणांला, तें कशावरून ?"

" तसं मीं कधींच म्हटलं नव्हतं; मी फक्त मला माहित नाहीं एव-ढंच काय तें म्हणालों होतों. ती अगदीं सज्जन बाई असून जेवणा-खाण्यांत व राहणींत अगदीं साधी होती. कधीं कधीं ती घराला टाळं मारून एक आठवडापर्यंत बाहेरही राहत असे. "

" नेहमीं एकच आठवडा राहत असे ? "

" होय. त्याहून अधिक दिवस ती कधींच बाहेर राहिलेली नाहीं. मला वाटतं, ती व तिचा नवरा अशीं दोघं कुठं तरी फिरायला जात. तशांत तिला मूलबाळही कांहींच नव्हतं. पण तें असो. तुम्ही आतां बाकीचं घर पाहणार नाहीं का ? "

" पाहणार तर !" असें म्हणून सर्जेरावांनीं पुन्हा एकदा त्या दिवाणखान्याभोंवतीं नजर फेकली; त्या वेळीं त्यांना दिवाणखान्याच्या

मध्यभागीं असलेल्या एका सफेत लांकडी वाटोळ्या मेजावर एक ' फोटो आल्बम " पडलेला दिसला. त्याचें वरील ' बाइंडिंग ' पांढऱ्या चामडयाचें होतें. सर्जेरावांनीं तो आल्बम घेऊन आंतील फोटो पाहिले. अर्धा अधिक आल्बम फोटोविरहितच होता व इतर जे फोटो होते ते सर्व स्त्रियांचेच होते. त्यांपैकीं कित्येक सरलेच्या बालपणचे असून कांहीं ती नऊ-दहा वर्षांचीं असते वेळीं घेतलेले होते, ती पंधरा सोळावर्षांची होती तेव्हांचे कांहीं होते व कांहीं अलीकडील होते. त्या आल्बममधील कांहीं फोटो काढून टाकलेले होते हें आल्बमच्या पानाच्या फाटलेल्या कोपऱ्यांवरून दिसून येत होतें. सर्जेरावांनीं हें सर्व पाहून ठेवलें व त्यावर विचार करीत ते दिवाणखान्यांतून बाहेर पडले. घरांतील सर्व पुरुषांचे चेहरे मुद्दाम व कांहीं तरी हेतूनेंच काढून घेतले असले पाहिजेत अशी त्यांची खात्री होऊं लागली. घरांत शिरण्यापूर्वीं, त्या घरांत कोणा ना कोणा पुरुषाचा फोटो दिसेल व त्यामुळें खुनी हुडकून काढण्यास आपणास बरीच मदत होईल अशी त्यांना आशा होती. परंतु वर दिल्याप्रमाणें त्यांना निराळाच अनुभव आला. दिवाणखान्याच्या दरवाजांतून बाहेर पडतांना त्यांची दृष्टि सहज खालीं गेली व तेथें जमिनीवर पसरलेल्या सफेत गालीचावर त्यांना पावलें उमटलेलीं दिसलीं. त्याबरोबर त्यांनीं त्या गांवीं पाऊस पडत होता काय असा त्या वृद्धास प्रश्न केला.

केलेला प्रश्न ऐकतांच बराच पुढें गेलेला तो म्हातारा माणूस मागें परतून त्या उमटलेल्या पावलांकडे न्याहाळून पाहूं लागला. गालिचावर उमटलेलीं पावलें चिखलाचींच होतीं हें स्पष्ट दिसत होतें. "आज आठवडाभर तर मुळींच पाऊस नाहीं," त्या वृद्ध गृहस्थानें उत्तर दिलें, "व सरला तर इतकी स्वच्छ व नीटनेटकी होती कीं, तिला असला अमंगळपणा व गलिच्छपणा मुळींच खपत नसे व अशा प्रकारचा लहानसा डागसुद्धा तिनं इथं राहूं दिला नसता."

" सध्या तर चांगला उन्हाळाच आहे. " विचार करून सर्जेराव म्हणाले.

"होयः पण आठ दिवसांपूर्वी मात्र इथं भयंकर वादळ झालं होतं."

" पण त्यापूर्वीसुद्धा चांगलाच कडक उन्हाळा होता."

" पण त्याचा इथं काय संबंध ? "

" मला वाटतं—" सर्जेरावांचा पुढें कांहीं बोलण्याचा इरादा होता. परंतु ते तेवढ्यावरच थांबून म्हणाले, " आपण बाकीचं घर तपासून पाहूंया. "

सर्जेरावांच्या डोक्यांत कोणते विचार चालू आहेत तें न समजल्यामुळें वृद्ध गृहस्थानें एकदा त्यांच्या चेहऱ्याकडे पाहिलें, परंतु त्यावरून त्याला कांहींच बोध न झाल्यामुळें तो तसाच काठी टेंकीत पुढें चालूं लागला. दिवाणखान्यांतून निघून ते एका लहानशा स्वयंपाकखोलींत आले, तेथून ते निजावयाची व जेवणाची खोली पाहून घराच्या मागच्या बाजूला बाहेर पडले. त्या बाजूस एक लहानशी खोली उघडी असून तींत जिन्नस ठेवण्यासाठीं फळ्या मारलेल्या होत्या व जशी पुढें तशीच घराच्या मागेंही एक छोटीशी छानदार बाग असून त्या बागेंत सुवासिक फुलांचे ताटवे लावलेले होते. पुढच्या भागाप्रमाणें मागच्या भागासही लांकडी फळ्यांचें कुंपण असून त्यांना चांगला तेलाचा रंग दिलेला होता. घराच्या एकंदर रचनेवरून व पुढेंमागें तयार केलेल्या बागेवरून सरला ही नीटनेटकी व बागेची शोकीन स्त्री असावी असें सहज अनुमान करतां येण्यासारखें होतें. असो.

स्वयंपाकगृहांत व जेवणाच्या खोलींत अगदीं साधें सामान नीट व्यवस्थेनें रचून ठेवलेलें होतें. भिंतींतच असलेल्या फडताळांत त्या मुलानें आणून टाकलेले पाव पडलेले होते व इतर रोजच्या उपयोगास लागणाऱ्या कांहीं वस्तु धुरळा पडून खराब झालेल्या होत्या. त्या खोलीचें अवलोकन करतांच, पुढच्या बागेंतून एकदम स्वयंपाकगृहांत येण्यासाठीं एक स्वतंत्र मार्ग आहे असें सर्जेरावांस आढळून आलें. त्यासंबंधानें पूर्ण खात्री केल्यानंतर ते पुन्हा घरांत आले व झोंपावयाची खोली तपासूं लागले.

" कदाचित् तिचं लग्न झालं नसावं, " तो वृद्ध गृहस्थ सर्जेरावांस उत्तरादाखल म्हणाला. " तो तिच्या हितचिंतकांपैकीं, ओळखीपैकीं अगर एखाद्या नातलगांपैकीं कोणीं तरी असून तिला भेटण्यासाठीं म्हणून मधून मधून इथं येत असावा; कारण तो इथं राहत नसे. "

" तो इथं कधीं कधीं राहत असे असं तो मुलगा सांगत होता. "

" अं ! तो पोरगा बदमाष आहे. " वृद्ध गृहस्थ रागानें म्हणाला.

" तें कांहीं मला माहित नाहीं; पण मला एक विचार सुचतो आहे."

" कोणता तो ? "

"मी तुम्हांला तो मग सांगेन." असें म्हणून सर्जेरावांनीं खोलींतील मेजाचे सर्व खण उघडून पाहिले. त्यामध्यें रुमाल, फिती वगैरे पुष्कळ उपयोगी वस्तु होत्या. परंतु त्या सर्व स्त्रियांच्याच उपयोगाच्या असून त्यांपैकीं पुरुषाला लागणारी एकही वस्तु नव्हती.

" तिची लिहिण्याची जागा कुठं आहे ? " सर्जेरावांनीं उतावीळपणें विचारलें.

" सफेत दिवाणखान्यांत तिचं लिहिण्याचं मेज आहे, मी मघांशीं बसलों होतों तिथं. "

सर्जेरावांनीं त्या खोलींत कांहीं कागदपत्र मिळतात कीं काय हें पाहण्याकरितां पुन्हा एकदा ती खोली बारकाईनें तपासली. परंतु त्यांचा प्रयत्न व्यर्थ झाला. तेथें कांहींच मिळत नाहीं असें पाहून ते पुन्हा सफेत दिवाणखान्यांत आले. त्या दिवाणखान्यांत तिचें लिहिण्याचें मेज एका खिडकीजवळ असून तें उघडेंच होतें. सर्जेरावांनीं त्याचें झांकण जरा वर उचलतांच तें साफ उघडलें. " हें मेज टाळं फोडून कुणीं तरी उघडलेलं आहे असं दिसतं, " असें म्हणून त्यांनीं तें झांकण साफ उघडलें. मेजांतील खणांत कोणीं तरी ढवळाढवळ केलेली दिसत होती.

मेजाचें झांकण उघडतांच त्या वृद्ध गृहस्थानें आंत डोकावून पाहिलें. आंत कांहीं बिलें, नोटपेपर, लिहिण्याचे कोरे कागद, कोरीं पाकिटें व दोनतीन लाखेचे तुकडे अस्ताव्यस्त रीतीनें पडलेले होते. परंतु

ज्याच्या योगानें सरलेबद्दल अगर तिच्या पतीबद्दल कांहीं बातमी मिळेल असें त्यांत कांहींच नव्हतें, आणि खुनाचा शोध तिच्या गत-चरित्रावरूनच लागण्यासारखा होता. सर्जेरावांनीं त्या मेजाकडे, कुलपाकडे, खणांत, जमिनीवर वगैरे ठिकाणीं बारकाईनें पाहिलें व इतकाच शोध लावला कीं, आठ दिवसांपूर्वी येथें कोणीं तरी येऊन त्यानें सरलेच्या मागच्या चरित्राचा, तसेंच तिच्या पतीचा पत्ता लागूं नये या हेतूनें सर्व प्रकारचा पुरावा, कागदपत्रें, फोटो वगैरे–नाहींसा करून टाकलेला आहे.

" हें तुम्हांला कसं समजलं ? " वृद्ध माणसानें विचारलें.

सर्जेरावांनीं जाजमावरील उमटलेलीं चिखलाचीं पावलें त्याला दाखवून म्हटलें, " इथं हल्लीं एक आठवडा तर अगदीं कडक ऊन पडत असतं असं तुम्ही म्हणतां. आठ दिवसांपूर्वी काय तें वादळ झालं होतं तेवढंच व अशा पावसाच्याच दिवसांत रस्त्यावर चिखल असा-यचा; अर्थात् त्याच वेळीं कोणी तरी येऊन इथं ढवळाढवळ करून गेलं असावं आणि—"

" पण तें वादळ रात्रीं झालं होतं. " मध्येंच तो वृद्ध म्हणाला.

" मग तर त्याला चांगलंच सोयीचं झालं. तो आला त्या वेळीं त्याच्या बुटाला चिखल लागला असला पाहिजे व त्याचंच पाऊल ह्या जाजमावर उमटलं. त्यानं सरलेच्या नवऱ्याची कोणतीच खूण इथं राहूं दिली नाहीं म्हणून—"

" काय ? " त्या वृद्ध गृहस्थानें मध्येंच विचारलें.

" मला वाटतं, कीं तो येणारा माणूस स्वतः सरलेचा नवरा असून त्यानंच आपल्या पत्नीचा रत्नमहालांत खून केला असला पाहिजे. "

प्रकरण ८ वें

## दांडेकर मास्तर

आतां आपण इन्स्पेक्टर सर्जेराव यांस लोणावळ्यास शांतिगृहांत सोडून सरोजिनीबाईंच्या हकीकतीकडे वळूंया. ह्या कादंबरीच्या आतांपर्यंत आलेल्या कांहीं प्रकरणांवरून आमच्या वाचकांचा सरोजिनीबाईंच्या स्वभावाशीं थोडाबहुत परिचय झालाच असेल.

दांडेकर मास्तर ! मास्तरांसंबंधीं सरोजिनीबाईंनीं काढलेले उद्गार वाचकांच्या स्मरणांतून गेले नसतीलच. परंतु त्यांच्या शब्दांवरून मास्तरांची कल्पना केल्यास ती खात्रीनें चुकीची ठरेल. मास्तर अजून-पर्यंत अविवाहित असून पुढेंही तसेंच जीवित कंठण्याचा त्यांचा सध्या तरी विचार होता खरा. ते एका इंग्रजी शाळेंत परकीय भाषा शिक-विण्याचे अध्यापक असून त्यांचा सर्व वेळ, त्यांच्या मतें, आपण घेत-लेल्या विषयाच्या अध्ययनांत जाई. मास्तरांस क्लबमध्यें अगर हॉटे-लांत राहणें आवडत नसल्यामुळें व त्यांना एकांतवासाची फार आवड असल्यामुळें, ते आजपर्यंत आपल्या मनास पाहिजे तशा एकांत जागेच्या शोधांतच होते, व तशी जागा त्यांना सरोजिनीबाईंच्या मालकीच्या असलेल्या जमिनीवरील एका झोंपडीवजा बंगलींत सांपडली. तावडतोब त्यांनीं ती जागा परवानगीनें आपल्या ताब्यांत घेतली. ही बंगली सरोजिनीबाईंच्या स्वतःच्या बंगल्याच्या मागच्या बाजूस कांहीं कदमांवर होती. त्या बंगलीसभोंवतीं लहान पण सुरेख असें फळ्यांचें कुंपण असून पाठीमागल्या बाजूस एक लहानसा ओढा

वाहत होता. हा ओढा फक्त पावसाळ्यांतच तुडुंब भरत असून त्यामुळें त्याच्या आसपासच्या जागेला एक प्रकारची सर्द हवा लागत असे. प्रथम सरोजिनीबाईंना ती बंगली भाड्यानें द्यावीशी वाटेना. पण अलीकडे मास्तरांना पाहिल्यापासून व त्यांच्या मनांतील विचार तिला तंतोतंत पटल्यामुळेंच कीं काय, अगर एकांतप्रिय स्वभाव पाहूनच तिनें त्यांना ती बंगली भाड्यानें देऊं केली. मास्तरांनींही, अगदीं आपल्या इच्छे-प्रमाणें जागा मिळत आहे असें पाहून, विशेष विचार न करतां ती जागा ताबडतोब भाड्यानें घेऊन तींत ते राहूं लागले व अशा रीतीनें बऱ्याच दिवसांपासून ते सरोजिनीबाईंचे भाडोत्री बनले होते.

मास्तर स्वभावानें अगदीं शांत व एकांतप्रिय होते. त्यांनीं आपल्या घरकामास कोणीही चाकर ठेवलेला नसून घरचें सर्व काम ते स्वतःच पाहत असत. मास्तर राहत असलेल्या त्या बंगलीमध्यें फक्त दोनच खोल्या असून त्यांपैकीं एक ते स्वयंपाकगृहाप्रमाणें वापरीत असत व दुसऱ्या बाहेरच्या खोलीचा उपयोग जेवण, निजणें, बसणें, उठणें वगैरे इतर किरकोळ कामाकडे होत असे. दुसरी–बाहेरील खोली आंतल्या खोलीपेक्षां मोठी व हवाशीर असून ती जरी थोडी सर्द होती, तरी आमच्या मास्तरांना ती विशेष आवडण्याचें कारण तिकडे अस-लेली शांतता व एकांत होय. त्या घराच्या पाठीमागल्या बाजूकडील ओढ्यावरून नजर फेंकली असतां पलीकडे निरनिराळ्या आकृतींचे, कल्पना लढवून बांधलेले मनोरम बंगले दृष्टीस पडत असत. बंगलीच्या डाव्या बाजूस साधारणतः शहराचा देखावा व आंतील रहदारी दिसून येत असे.

प्रथमतः कमलाकराला आमच्या मास्तराविषयीं, त्यांची साधी राहणी पाहून आदर वाटत असल्यामुळें तो मधून मधून त्यांना भेटा-वयास जात असे. तो त्या जागेचा सर्दपणा व ओलावा पाहून त्यांना तो काढावयास वरचेवर सांगत असे; परंतु व्यर्थ ! मास्तर पक्के हट्टी होते. “ मी आहें तोंपर्यंत मला याचा कांहींएक त्रास होत नाहीं,”

ते आपल्या नेहमींच्या पद्धतीनें म्हणत असत, "तशांत मी कदाचित् इथं फार दिवस राहणारही नाहीं."

"तुमचा सोडून जायचा बेत आहे ?" त्यांना भेटावयास आलेल्या कमलाकरानें विचारलें.

"कदाचित्. कारण माझं नशीब उघडण्याचा संभव आहे. कदाचित् वारस म्हणून मला माझ्या एका नातलगाकडून बरीच माया मिळण्याचा संभव आहे. मग इथं राहणार आहे कोण ? मला या बकाल मुंबईत राहावंससुद्धा वाटत नाहीं; पैसे मिळालेच, तर मी ब्रम्हदेशासारख्या ठिकाणींही जाऊन राहीन."

होकारार्थी कमलाकरानें नुसती मान हालविली.

दांडेकर मास्तर !–आपण एका इंग्रजी शाळेमध्यें परकीय भाषेचे अध्यापक असल्यामुळें सर्वांनीं आपणास मास्तर या वचनानें न संबोधतां ते शिकवीत असलेल्या गहन परकीय भाषेमुळें 'प्रोफेसर' म्हणावें अशी त्यांची फार इच्छा असे व म्हणूनच इतरांनीं जरी त्यांना ती पदवी दिलेली नव्हती तरी आपण होऊन ते 'प्रोफेसर' ही पदवी आपल्या नांवामागें लावून घेत असत. मास्तर दिसण्यांत अगदीं विलक्षण व तऱ्हेवाइक दिसत असत. ते शरीरानें अगदीं रोडके होते; मांसाचा त्यावर लवलेशही नव्हता. त्यांच्यासारख्या प्रकृतीच्या मनुष्याला सरोजिनीबाईच्या त्या सर्द जागेंत संधिवातासारखा रोग जडावयास कांहीं वेळ लागला नसता; परंतु आश्चर्य हेंच कीं, ते आजारी पडलेले कधींच दिसले नाहींत. त्यांचा घालण्याचा एक ठराविक काळा पोषाक असून कोठेंही जावयाचें असलें तरी ते त्याच पोषाकांत बाहेर पडत असत. त्यांचें चालणें अगदीं मंद असून तें स्मशानयात्रेस निघणाऱ्या माणसाप्रमाणें दिसत असे. त्यांचा चेहरा ब्रम्हदेश आसाममधल्या लोकांसारखा दिसत असे. परंतु तो इतका रोडावलेला होता कीं, त्याजकडे पाहतांच हें एक जिवंत मढें आहे कीं काय असा भास होत असे. त्यांचे ते खोल गेलेले गाल, पातळ व फिकट दिसणारे बटबटीत डोळे, ओष्ठद्वय, टक्कल पडलेलें कपाळ व स्मश्रू व दाढीविरहित

चेहरा हें पाहून त्यांचा चेहरा मनोवेधक न दिसतां उलट हिडिस व भेसूर दिसत असे. परंतु त्यांच्या एकंदर अवयवांमध्यें मनांत भरण्याजोगे असे त्यांचे डोळेच होते. वर असलेल्या काळ्याकुट्ट भुंवयांखालीं ते एखाद्या दीपज्योतीप्रमाणें चकाकत असल्याप्रमाणें वाटत असत. मास्तरसाहेब कितीही जरी अशक्त व दुबळे दिसत असत, तरी त्यांच्या त्या डोळ्यांकडे पाहतांक्षणींच त्यांच्यांत कांहीं तरी जीवनशक्ति असावी अशी मन साक्ष देत असे. त्यांचे हात त्यांच्या अखिल यष्टीप्रमाणेंच रोडके असून, त्यांचीं लाबटांगीं पावलें त्यांना एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं फारच लवकर नेत. लांब टांगा टाकीत, सरकत, आपला मार्ग आक्रमीत असतांना त्यांना पाहणाऱ्यांना अत्यंत आश्चर्य वाटत असे.

रत्नमहालांतील खुनासंबंधानें मास्तरसाहेबांचीं कांहींहीं मतें असोत; परंतु ते तीं कधींही आपण होऊन कोणापाशीं व्यक्त करीत नसत. त्यांना स्वतःला वर्तमानपत्रें वाचण्याचा बराच नाद असे, तरीही ते एकाही वर्तमानपत्राचे वर्गणीदार झाले नाहींत अगर त्यासाठीं त्यांनीं आपल्या पदरची एक दिडकीही खर्च केली नाहीं. मात्र सरोजिनीबाईच्या घरीं ' विश्ववृत्त ' म्हणून जें एक दैनिक येत असे तें वाचल्याशिवाय ते कधींही राहत नसत. एखाद्या दिवसाचा अंक त्यांचा वाचावयाचा राहिला असें कधींही झालें नाहीं. मास्तरसाहेब शाळेंतून घरी जातेवेळीं नियमितपणानें सरोजिनीबाईकडून त्या दिवसाचा अंक मागून घेऊन जात असत. अंक घेऊन जाण्याच्या वेळीं दांडेकर मास्तर सरोजिनीबाईबरोबर चालू विषयावर थोडा वेळ गप्पा मारीत व थोडा वेळ त्यांच्या प्रकृतीसंबंधानें बोलणें झाल्यानंतर ते तो अंक घेऊन घरीं जात.

एके दिवशीं नेहमीप्रमाणें सरोजिनीबाईच्या घरून वर्तमानपत्राचा अंक घेऊन घाईघाईनें घरीं जात असतां—मास्तर नेहमींच चालतांना स्टेशनवर आलेली गाडी पकडण्यास पळत असत—त्यांना वाटेंत कमलाकर भेटला. मास्तर कोठेंही जात असतां त्यांच्या गतींत कोणाच्या आकस्मिक भेटण्यानें अडथळा झालाच तर त्यांची मुद्रा एकदम त्रासिक

दिसूं लागे. तद्वतच कमळाकर दिसतांच त्रासिक चेहरा करून त्यांनीं त्याच्याकडे पाहिलें.

" ओहोहो ! मास्तरसाहेब ? कुठं एवढ्या घाईनं. ?" त्यांना पाहतांच त्यांचा रस्ता अडवून कमळाकरानें आपल्या नेहमींच्या विनोदी स्वरांत विचारलें. " आपल्याशीं कांहीं वेळ बोलत राहायला आपली कांहीं हरकत नाहीं ना ? "

" ह्यः ह्यः ! त्यांत हरकत कसली ! आपल्यासारख्या उद्योगी माणसाशीं दोन शब्द बोलायचं आमच्यासारख्यांना तरी भाग्य हवंच ना ?" मास्तरांनीं बळेंच म्हटलें. परंतु चेहऱ्यावरून त्यांची इच्छा कमलाकराच्या तावडींतून लवकरच सुटून जाण्याची दिसत होती.

" मास्तरसाहेब, " त्यांच्या इच्छेविरुद्ध त्यांचा हात आपल्या हातीं घेऊन कमळाकर म्हणाला, " रत्नमहालांत झालेल्या खुनासंबंधानं आपल्याशीं चार शब्द बोलायची माझी इच्छा आहे. आपण माझ्या प्रश्नांचीं उत्तरं द्याल का ? "

"तुमच्या शंकेचं समाधान माझ्याकडून होईल असं नाहीं." मास्तर म्हणाले. या वेळीं ते दोघेही मास्तरांच्या बंगलीभोंवतालच्या कुंपणापाशीं आले होते. "ह्या खुनाच्या विषयावर मला तुमची कोणतीही शंका फेडतां येणं शक्य नाहीं. माझं काम आपलं परकीय भाषेच्या अध्ययनाचं आणि अध्यापकाचं आहे. खुनी शोधून काढायचं नव्हे. मी कांहीं गुप्त पोलिस नाहीं. "

"गुप्त पोलिस नसलां म्हणून काय झालं ? खुनी इसम कोण असावा हें समजून घ्यायची आपल्यालाही उत्कंठा असणार. अर्थात् आपल्या विचारशक्तीच्या जोरावर खुनी इसम कोण असावा ह्यासंबंधानं कांहीं तरी अटकळ तुमची असणारच. तशी खात्रीलायक माहिती तुम्हांला आहे असं कांहीं माझं म्हणणं नाहीं. "

" आपण माझी कांहीं तरी स्तुति करीत आहां झालं. " खिशांतील किल्ली काढून दरवाजाच्या कुलपांत घालीत मास्तरांनीं म्हटलें, "आंत येतां का ?" दरवाजा उघडून आंत जातां जातां त्यांनीं कमळाकरास विचारलें.

" तुम्हीं बोलावतां तर आंत कां येणार नाहीं ? " कमळाकरानें प्रश्नात्मक उत्तर दिलें.

आपल्या प्रश्नाला कमळाकराकडून होकारात्मक उत्तर येईल अशी त्यांची कल्पना नव्हती. परंतु उत्तर अपेक्षेविरुद्ध आल्यामुळें आंत येण्याविषयीं आपण कमळाकरास विनाकारण विचारलें या गोष्टीची त्यांना चुटपुट लागून राहिली. दार उघडल्यानंतर ते दोघेही आंत शिरले. खोलींत शिरतांच कमळाकर एका आरामखुर्चीवर बसला व खिशांतून एक सिगारेट काढून त्यानें धूम्रपान करण्यास सुरवात केली, व सिगारेटकेसमधून दुसरी एक सिगारेट काढून ती मास्तरांपुढें केली.

" ह्यापेक्षां मला पाइपमधून धूम्रपान करणं अधिक आवडतं, " असें म्हणून मास्तरांनीं खणांतून एक 'पाइप' काढून त्यांत थोडा 'टोबॅको' भरून ते कमळाकराजवळच एका खुर्चीवर बसले व जणूं काय तुमच्या प्रश्नाचीं उत्तरें देण्यास आतां तयार आहों अशा दृष्टीनें त्याजकडे पाहून धूम्रपानामध्यें त्याचेंच अनुकरण करूं लागले.

" हें पाहा " कमळाकर थोड्या वेळानें मास्तरांच्या हातांतील वर्तमानपत्राचा अंक घेऊन त्यांतील एका पानावरील मजकूरावर बोट ठेवून म्हणाला, " हें वाचा."

" कांहीं खुनाबद्दलच आहे कीं काय ? " हवेंत एक धुराचा फवारा सोडीत मास्तरांनीं प्रश्न केला.

" होय त्या मूर्खानं-सर्जेरावानं रत्नमहालांतील खुनाच्या बाबतींत एक साधारण महत्त्वाचा शोध लाविलेला दिसतो. "

" असं जर असेल तर तो मूर्ख कसा बरं होईल ? " मास्तरसाहेब धुराचे लोटच्या लोट हवेंत सोडून म्हणाले, " पण त्या पत्रांत काय आहे तें तर मला सांगा. कारण मला तुमचा स्वभाव चांगलाच माहित आहे. तुम्हीं पांच मिनिटंसुद्धा स्वस्थ राहणार नाहीं. आणि मला तर वाचीत असतांना पूर्ण शांतता पाहिजे. "

" योग्य टोला दिलात बुवा, " कमळाकर हंसत हसंत म्हणाला, " माझी जीभ चुरुचुरू बोलणारी असून मन चहूंकडे भटकणारं आहे.

मी तुम्हांला तो मजकूर कांहीं वाचून दाखवीत नाहीं. कारण मलाही मोठयानं वाचायचा फारच कंटाळा आहे. पण त्या मजकुरा-वरून असं दिसतं कीं, त्यांनीं–अर्थात् सर्जेरावानं त्या मयत स्त्रीचं नांव शोधून काढलं आहे म्हणे."

"व: ! हा तर फारच चित्ताकर्षक मजकूर आहे." मास्तर म्हणाले, " पण त्याला तें कसं आढळून आलं बुवा ! "

" लोणावळ्याहून त्याला कुणी एकानं पत्र धाडलं कीं," कमळाकर आपल्या हातांतील वर्तमानपत्र बाजूच्या मेजावर फेंकून म्हणाला, " तेथील 'हेस्टिंग्स लेन'मध्यें एक बाई राहत असून ज्या प्रकारच्या दिवाणखान्यांत त्या बाईच्या खून झाला तसल्याच प्रकारचा एक दिवाणखाना ती राहत असलेल्या घरांत आहे. "

" हेस्टिंग्स लेन ?" मास्तर आपले डोळे ताणून म्हणाले.

" तेव्हां इन्स्पेक्टर सर्जेराव तो बंगला पाहायला गेले होते. " कमळा-कर त्यांच्या भाषणाकडे लक्ष न देतां पुढें म्हणाला, " पण त्यांना तें घर बंद असलेलं आढळून आलं. पण त्या घराच्या मालकाजवळ त्याची किल्ली असल्यामुळं त्यांना त्या घरांत शिरकाव करून घेतां आला. आंत गेल्यावर–रत्नमहालांत ज्या सफेत दिवाणखान्यांत त्या स्त्रीचा खून झाला तसलाच एक सफेत दिवाणखाना त्या घराला आहे, असं सर्जे-रावांना आढळून आलं. मात्र दोन दिवाणखान्यांत फरक इतकाच कीं, रत्नमहालांतील सफेत दिवाणखान्यांत उंची व मौल्यवान् सामान रच-लेलं आहे व त्यांत अगदीं साधारण प्रतीचं आहे. आणि आढळून आलेली सर्वांत महत्त्वाची गोष्ट ही कीं, त्या दिवाणखान्यांतील गालीचा-वर खून झालेल्या बाईची तसबीर–पडलेली होती."

" अहो, पण सविस्तर हकीकत तुम्ही भला मागाहून सांगितली तरी चालेल." मास्तर मध्येंच घाईनें म्हणाले, "मला प्रथम त्या बाईचं नांव सांगाल का ? कराच एवढी मेहरबानी. "

" तिचं नांव किनखापे. "

कमळाकराच्या तोंडून त्या बाईचें नांव बाहेर पडतांच मास्तरसाहेब झटका बसल्याप्रमाणें एकदम आपल्या खुर्चीवरून उठून उभे राहिले ! त्यांनीं हातीं असलेला पाइप फेकून देऊन, आपले हात समोरच असलेल्या मेजावर आपटीत ते म्हणाले,

" काय ? किनखापे ! सरला किनखापे ?"

" होय. पण तिचं नांव सरला हें तुम्हांला कसं समजलं? वा ! मास्तर, तुम्ही तरी बरेच दिसतां कीं! वर्तमानपत्र वाचत नाहीं म्हणतां काय ? "

" छे छे, अहो, ती तर माझी आतेबहीण !" शेवटीं एक दुःखोद्गार काढून मास्तरसाहेबांनीं दोन्हीं हातांनीं आपला चेहरा झांकून घेतला.

सरलेचें आणि मास्तरांचें नातें समजतांच कमळाकराच्या आश्चर्याला पारावारच राहिला नाहीं. मास्तरांच्या तोंडून अशी कांहीं तरी आणखी नवीन हकीकत आपणास समजेल अशी त्याची मुळींच कल्पना नव्हती. अर्थात् मास्तराच्या तोंडून ते शब्द बाहेर पडतांच तो आश्चर्यानें अगदीं थक्क झाला. कांहीं वेळ गेल्यानंतर त्यानें मास्तरास म्हटलें,

" मग तिचा खून कोणीं केला, हें तुम्हांला माहित असेल तर ?"

कमळाकराचे हे शब्द ऐकतांच मास्तर आपल्या अंगाला एकदम हिसडा देऊन त्याच्याकडे पाहूं लागले व एकदम ओरडून म्हणाले,"तुम्ही कोणत्या प्रकारचे माणूस आहां तेंच मला कळत नाहीं. तुम्ही म्हणतां तरी काय ? तिचा खून कोणीं केला हें मला कळणार कसं ?"

" तसा कांहीं माझ्या म्हणण्याचा अर्थ नाहीं हो. एकदम चिडूं नका. म्हटलं तुम्ही तिचे आतेभाऊ आहां आणि सर्जेराव तर असं म्हणत आहेत कीं, तिचा खून व्हायचं कारण तिच्या गतायुष्यावरून कदाचित् समजण्यासारखं आहे."

"पण मला तिच्या मागील चरित्राची अगदींच थोडी माहिती आहे;- मुळींच नाहीं म्हटलं तरी चालेल. "मास्तरसाहेब आपल्या खोलींत इकडून तिकडे जोरजोरानें येरझारा करीत म्हणाले.

" मग जी कांहीं थोडी माहिती आपणास आहे ती मला सांगायला कांहीं हरकत आहे का ?" कमळाकरानें विचारलें.

मास्तरसाहेब कमळाकराकडे एखाद्या अविश्वासी माणसाप्रमाणें पाहूं लागले. ते म्हणाले,"तें मला तुमच्यापाशीं सांगावंसं वाटत नाहीं. कारण, तें तुम्हांला सांगितलं तर तुम्ही तें सर्व गुप्त ठेवाल किंवा नाहीं याची मला शंका वाटते."

" असं जर तुम्हांला वाटत असेल तर तें सर्व कांहीं तुम्ही पोलिसांनाच सांगा. पण एवढं मात्र लक्षांत ठेवा कीं, त्यांना तुम्हांला सर्व कांहीं सांगावं लागून त्यासंबंधानं ते तुम्हांला पुन्हा पुन्हा विचारून बरेच त्रासून सोडतील. शिवाय, जें कांहीं तुम्ही त्यांना सांगाल तें सर्व प्रसिद्धही होईल."

" हो, हेंही एका अर्थी खरंच ! " मास्तरसाहेब घाबरून म्हणाले, " कमळाकर, खरोखर तुम्हीं हुषार व चाणाक्ष आहांत ! माझ्या आतांपर्यंतच्या बोलण्याचा राग न धरतां तुम्ही मला इत:पर निरपेक्ष मदत कराल अशी मी आशा करूं का ?"

"तुम्हांला मदत !" कमळाकर मास्तरांकडे पाहून म्हणाला, " ती कसली बुवा ? "

" म्हणजे ! पोलिसांच्या बाबतींत तुम्ही मला मदत करा, येवढंच माझं म्हणणं ! माझा अशा प्रकारें पोलिसाशीं कधींच संबंध न आल्यामुळं मला थोडी भीति वाटते. कारण ते मला, माझी हकीकत पुरती ऐकून घेतल्याशिवाय वाटतील तसे आडवेतिडवे प्रश्न विचारून भंडावून सोडतील अशी माझी खात्री आहे."

" मग त्यांत हरकत कसली ? " कमळाकर मास्तरांकडे पाहत म्हणाला, " तुम्हांला त्यांच्या प्रश्नांचीं उत्तरं सहज देतां येतील. "

"होय, तें खरं, पण पोलिस लोक किती संशयी असतात हेंही तुम्हांला माहित असेलच."

" असतील ! मग त्यांत येवढं भिण्यासारखं तें काय आहे ? "

" त्या स्त्रीचा सरलेचा–खून रत्नमहालांत झाला ती जागा ह्या बंगलीपासून अगदीं जवळ असल्यामुळं त्यांना कदाचित् असं वाटेल कीं—"

" तुम्हींच तिचा खून केलात असंच ना ? हें तुमचं आपलं कांहीं तरी. तिचा खून तुमच्या घरापासून जवळ झाला म्हणून त्यांत पोलिसांना तुमचा संशय कां म्हणून यावा ? पण काय हो मास्तरसाहेब, तुम्ही हिंवाळ्यांना ओळखतां का ? "

" छे, त्याचं नांवसुद्धा कधीं मीं ऐकलेलं नाहीं."

" नलिनीनं तुम्हांला कधींच सांगितलं नाहीं ? नलिनीची आणि तुमची ओळख आहे नव्हे ? "

" तसा कांहीं विशेष परिचय नाहीं. कुठं दोनचार शब्द बोलली असेल इतकंच. अनोळखी माणसाशीं विशेषतः बायकांशीं बोलण्यास आपणास शरम वाटते बुवा. तुमची भावी—"

"शरयू," मध्येंच कमलाकर म्हणाला.

"होय, शरयू; त्यांनींच मला नलिनीची ओळख करून दिली. पण आमची कांहीं फारशी ओळख झालेली नाहीं. तुमच्या भावि पत्नीनं बोलतां बोलतां सहज एकदा हिंवाळ्यांचं नांव काढलं होतं खरं. पण नंतर तें माझ्या स्मरणांत राहिलं नाहीं; पाहा बुवा मी किती विसरभोळा आहें तो !"

" होय, हें खरं आहे. " कमळाकर त्यांना धीर देण्याच्या उद्देशानें म्हणाला. त्यांच्या बोलण्यावरून व चेहऱ्यावर उठून येणाऱ्या तरंगांवरून ते बरेच भित्रे असावेत असा त्याला संशय येऊं लागला. तो पुढें म्हणाला, " हें पाहा मास्तरसाहेब, व्यर्थ घाबरण्यांत कांहीं अर्थ [illegible] मला अगदीं सावकाशपणें त्या तुमच्या आतेबहिणीची हकीकत [illegible] पाहूं."

" ती माझी वडील आतेबहीण; " मास्तर एका खुर्चीवर बसून अंगीं जितकें अवसान आणतां येईल तितकें आणून म्हणाले, " कांहीं दिवसां[illegible]लेच्या सॉलिसिटरकडन मला एक पत्र आलं होतं. हें

पाहा तें" असें म्हणून त्यांनीं एका खणांतून ती नोटिस काढून कमळाकरास दाखविली. तींत पुढील वाक्य टाइप केलेलें होतें.—

"Mrs. Sarlabai Kinkhape has come in for a large fortune and that she intends next year to allow you an income etc."

"मग तिच्या आकस्मिक मृत्युमुळं तुमचं नुकसानच झालं असेल, नाहीं ?" कमळाकर म्हणाला.

"असंच कांहीं नाहीं म्हणतां यायचं," किंचित थांबून ते पुढें म्हणाले, "खरं सांगायचं म्हणजे माझ्या नांवावर आपण कांहीं रक्कम ठेवणार असं तिनं मला पूर्वींच कळवलं होतं आणि त्याप्रमाणं आपलं मृत्युपत्रही तिनं मला फायदेशीर असंच करून ठेविलं आहे, याची मला खात्री आहे." मास्तरांच्या तोंडचें अखेरचें वाक्य ऐकतांच कमळाकर त्यांजकडे आश्चर्यानें टवकारून पाहूं लागला. त्यांची गरिबीची स्थिति पाहतांच सरलेचा खून होण्यास येवढें देखील कारण पुरेसें आहे असा एक विचार झटकन त्याच्या मनांत येऊन गेला. परंतु त्यावर विश्वास ठेवण्यास कमळाकराचें मन धजेना. कारण, मास्तरासारखा भ्याड माणूस खुनासारखें किळसवाणें कृत्य करील कीं काय, असा त्याला संशय वाटूं लागला. शेवटीं थोडा वेळ विचार करून त्यानें पुन्हा मास्तरांस विचारलें.

"तिची एकंदर मिळकत किती असेल बरं ?"

"वार्षिक वीस हजार."

"नशीब काढलंत खरं एकंदरींत तुम्ही !" कमलाकर म्हणाला, "तिच्या मरणानं तुमचा उलट फायदाच झाला म्हणायचा."

"काय बडबडतां हें !" मास्तर एकदम उसळून म्हणाले, "तिच्या जिवापेक्षां पैशाची किंमत मला अधिक आहे का ? तिचा अशा [illegible] पद्धतीनं खून व्हावा हा विचारच मुळीं माझ्या मनाला सहन होत [illegible] माझी स्थिति कशी आहे ती तुम्ही पाहत आहांच. जिथं हा खून झाला [illegible] जागा इथून जवळच आहे आणि मला पैशाची अतिशय निकड आहे. सरलेच्या मरणानंतर तिच्या वीस हजारांच्या दौलतीच[illegible] मीच

आहे. कमळाकर, मुंबईचे पोलिस कसे आहेत तें तुम्हांला माहित आहेत व अशा प्रकारच्या ह्या सर्व गोष्टींचा संबंध पाहिला म्हणजे तिच्या खुनाचा आरोप ते माझ्यावर ठेवूं शकतील कीं नाहीं याचा तुम्हींच विचार करा. ''

''छट् ! भलतंच कांही तरी मनांत आणून घाबरतां झालं ! नुसत्या एवढया संबंधावरूनच खुनाचा आरोप ठेवतां येत नाहीं.'' अशा मनुष्याविषयीं आपणास भलताच संशय आला कसा याची लाज वाटून कमलाकर म्हणाला, '' तुम्ही अगदीं न घाबरतां मन पूर्णपणें शांत ठेवा. एखाद्या धनाढ्य माणसाला त्याच्या वारसाकडूनच मृत्यु येतो असा कांहीं कुठं सिद्धान्त आहे का ? ''

''नाहीं हो ! मी अगदीं खरं सांगतों; मनापासून सांगतों. मला जगांतलं सर्व भांडार जरी कुणी देऊं केलं असतं तरी मीं सरलेचं वाईट चिंतलं नसतं; मग करणं दूरच राहो. ती फारच गोड मुलगी होती. ''

''तिला ही वीस हजारांची मिळकत कुठून मिळाली ? ''

''तें कांहीं मला सांगतां येणार नाहीं; तसंच, तिनं आपल्या पतीविषयींही मझ्याजवळ कधींच कांहीं सांगितलं नाहीं. पण तिच्या संदिग्ध भाषणावरून मात्र मला एवढं समजून आलं कीं, तो व्यापारी असून नेहमीं फिरतीवर असतो. तसंच, तिच्या चेहऱ्यावरून व इतर प्रसंगींच्या वागणुकीवरून ती सुखी नसावी असा मला मधून मधून संशय येत असे. पण तिनं बिचारीनं आपल्या दुःखासंबंधानं एक चकार शब्दसुद्धा [illegible]पाशीं कधीं काढला नाहीं. ''

''[illegible]स्सं !'' ''कमळाकर आपल्या जागेवरून उठून म्हणाला, ''पण काय [illegible]चा नवरा तिच्या मिळकतीसाठीं तुमच्यावर दावा करणार [illegible] ?''

'' तें कांहीं सांगवत नाहीं. कदाचित् तो आतां आपलं तोंडसुद्धा [illegible]खवणार नाहीं. ''

''कां [illegible] हजारांचं उत्पन्न कुणास नको होईल ? ''

" तें खरं. पण सर्जेरावांना, त्यानंच तिचा खून केला असावा असं वाटत आहे. हें पत्र वाचा मग समजेल तुम्हांला सारं. "

" असं जर असेल तर मग फारच वाईट गोष्ट झाली." मास्तर एकदम अंगावर शहारे आणून म्हणाले, " आतां मी पुढं काय करावं तें तुम्हींच मला सांगा. कराच एवढी मेहेरबानी. " थोडया याचनेच्या भाषेंत ते पुढें म्हणाले.

" माझंच जर मत तुम्हांला पाहिजे असेल तर तुम्ही असेच जाऊन तिच्या सॉलिसिटरला भेटा म्हणजे तेच तुम्हांला या बाबतींत पुढं काय काय करायचं तो सल्ला देतील."

मास्तसाहेबांनीं कमळाकराचें म्हणणें मान्य केलें.

" ठीक आहे," ते म्हणाले, "ह्या कामाकरतां त्यांचे खिसे भरूं असं तुमचं म्हणणं आहे एकंदरींत तर ? 'आलिया भोगासी असावें सादर !' लागावंच त्या कामाला. "

---

प्रकरण ८ वें

# सरलेचें मृत्युपत्र

'नरसिंग आणि कादर' ही सॉलिसिटर फर्म कोटांतच एका दगडी इमारतीच्या पहिल्या मजल्यावर होती. ही फर्म फार जुनी असून वर दिलेल्या दोन भागीदारांपैकीं सध्या फक्त कादर हाच तींत होता व नरसिंगच्याही कुळांनीं त्याच्या मृत्यूनंतर आपलीं सर्व कामें कादर याजकडेच सोंपविलीं होतीं. कादरच्या ऑफिसमध्यें सातआठ कारकून असून मुख्य कारकुनाची जागा त्यानें आपल्या मुलास दिली होती व पुढेंमागें तोही एक फर्मचा भागीदार होणार, अशी अफवा होती. ऑफिसच्या इमारतीच्या पुढील भागावर साधारण मोठी अशी 'नरसिंग आणि कादर', 'सॉलिसिटर्स' अशीं अक्षरें कोरलेलीं पितळी पाटी लटकावलेली होती. फर्मचा भागीदार नरसिंग हा जरी मयत झाला होता तरी त्याची हुषारी व कर्तबगारी यामुळें झालेल्या त्याच्या ख्यातीमुळें कादरनें त्याचें नांव अजूनही तसेंच ठेविलेलें होतें.

नरसिंगइतकी जरी कादरची प्रख्याति झालेली नव्हती तरी त्यानें हातीं घेतलेल्या कामांत बरेंच यश संपादन केलेलें होतें. कादर हा शरीरानें उंच व सुदृढ असून, आपल्या कामांत चालढकल करणारा असावा असा त्याजकडे पाहणाऱ्याचा समज होत असे व त्यामुळें हा आपलें काम काय करणार व त्याची कर्तबगारी ती काय असें त्याजकडे कामाकरितां येणाऱ्यांपैकीं बहुतेकांच्या मनांत येत असे. परंतु फर्मच्या नांवाकडे पाहून व जरी त्याची वरीलप्रमाणें दृष्टि होती तरीही तिच्यांत

एक प्रकारचा करारीपणा दिसून येत असल्यामुळें लोक त्याच्याकडे आपापलीं कामें सोंपवीत असत. तसेंच, आपणाकडे येणाऱ्या प्रत्येक कुळाचा गुणावगुण पाहण्याचा त्याचा जणूं स्वभावच बनून गेला होता. कोणीही मनुष्य–मग तो पुरुष अगर स्त्री असो, चोर असो किंवा साव असो–त्याजकडे तीक्ष्ण व भेदक दृष्टीनें पाहून त्याचें स्वागत करण्याचा त्याचा परिपाठच होऊन गेला होता. अर्थातच त्याच्या ऑफिसमध्यें प्रथमतःच पाउल टाकणारा मनुष्य त्याची ती दृष्टि पाहून भेदरून जावयाचा.परंतु मग हाही यक्षिणीच्या कांडीप्रमाणें आपली दृष्टि व चेहऱ्यावरील विकार ताबडतोब बदलून आपल्या हंसतमुख चेहऱ्यानें व कावेबाज भाषणानें येणाऱ्या इसमावर सहज आपली छाप बसवीत असे. तरीही त्याच्या अंगांत एक मोठा दोष होता. आलेला मनुष्य आपली हकीकत सांगत असतां त्याच्या हकीकतीकडे विशेष लक्ष न देतां, त्याच्या बोलण्यावरून, वागण्यावरून व भाषणावरून त्याचा स्वभाव ताडण्याचा तो प्रयत्न करीत असे व त्याच्या गुणदोषांपैकीं त्याच्या दोषांकडेच तो विशेष लक्ष पुरवी. असो. विशेष सांगावयाचें म्हणजे, कादरचा जरी वर दिल्याप्रमाणें स्वभाव होता तरी त्यानें आपल्या कर्तबगारीनें व मिठास भाषणानें आपणाकडे बरींच कुळें ओढून आणून आपली 'फर्म' भरभराटीस आणली होती.

एके दिवशीं सकाळीं अकरा वाजण्याच्या सुमारास सॉलिसिटर कादर आपल्या ऑफिसमधील स्वतंत्र खोलींत काम करीत बसला होता. ऑफिसास योग्य अशा असणाऱ्या इतर वस्तूंखेरीज कागदपत्रांचा ढीग पडला होता व त्या सर्वांची विल्हेवाट लावण्याचा त्याचा विचार होता. परंतु त्या वेळीं त्याचें लक्ष त्या कागदपत्रांकडे मुळींच नसून हातांत असलेल्या विश्ववृत्ताच्या आदल्या दिवसाच्या प्रतीकडे होतें. तें पत्र त्याच्या मुलानेंच त्याला दिलेलें असून त्यानेंच खूण केलेला,–रत्नमहालांत घडलेला खून, शांतिगृह, सरलाबाई किनखाप्याचा शोध,–वगैरेंसंबंधींचा मजकूर तो वाचीत होता. लिहिलेल्या मजकुराचें चांगलेंच मनन केल्यावर त्यानें बेल वाजवून आपल्या मुलास बोलाविलें

बोलाविल्याप्रमाणें थोडयाच वेळांत तो त्या खोलींत येऊन दाखल झाला.

"ये, बैस. मात्र तो दरवाजा तेवढा लावून घे हं !" तो आंत येतांच कादर म्हणाला, "मला तुझ्याजवळ यासंबंधानं कांहीं बोलायचं आहे."

" हें तूं मला कालच कां नाहीं दाखवलंस ? " तो बसल्यावर हातीं असलेलें वर्तमानपत्र पुढें करून त्याचा बाप म्हणाला.

" मीच मुळीं तें काल पाहिलं नव्हतं." अबदुलनें (कादरच्या मुलानें) उत्तर दिलें, " खरं सांगायचं म्हणजे असल्या भिकारडया वृत्त-पत्राकडे मी पाहतसुद्धा नाहीं. काल मी घरीं जाते वेळीं कांहीं फळं घेतलीं, तीं ठेवण्याकरतां मला कागद पाहिजे होता; म्हणून स्टेशनवर मीं हें विकत घेतलं, तें असंच पडलं होतं. आज सकाळीं सहज माझी यांतील एका मजकुरावर नजर गेली. वाचून पाहिल्यानंतर मला तो थोडासा महत्त्वाचा वाटल्यामुळं मीं हें पत्र तसंच ठेवून दिलं.कारण, तुम्हीं ऑफिसांत निघून आल्यामुळं मला तें त्याच वेळीं तुम्हांला दाखवतां आलं नाहीं. आणि इथं येतांक्षणींच मीं तें तुमच्याकडे पाठवून दिलं. "

" त्या खुनाविषयीं इतर कोणत्याही पत्रांत कसलाच मजकुर नाहीं. " कादर म्हणाला.

" हें बरीक खरं आहे. हा मजकूर दुसऱ्या पत्रांत नाहीं. त्या स्त्रीचा खून कसा झाला, कोणीं केला, खुनी बंगल्यांत शिरला कसा, व खून कोणत्या हेतूनं केला, वगैरे सर्व गोष्टी अद्यापि उजेडांत आल्याच नाहींत. आणि तिचा खून दुसऱ्या घरांत असलेल्या शांतिगृहाच्या दिवाण-खान्यासारख्या दुसऱ्या दिवाणखान्यांत व्हावा, हा तरी किती विलक्षण योगायोग नव्हे ? "

" पण काय रे, खून झाला ती तीच असेल का ? "

" यांत काय संशय ! ती सरलाबाई किनखापेच असली पाहिजे. कारण, त्या सर्जेरावानं शांतिगृहांत मिळालेल्या तिच्या फोटोवरून तसं

म्हटलेलं आहे. छे, फारच चमत्कारिक बुवा हें. आपली तर मति गुंग होऊन गेली आहे ! ”

“ कशाविषयीं ? खुनाविषयीं ? ”

“ होय, अर्थातच. ” अबुदुल म्हणाला, “ आणखी त्यानं-काय बरं त्याचं नांव तें--हं सर्जेराव-त्याच्या शोधाचंसुद्धा मला अत्यंत आश्चर्य वाटतं. आम्हीं तिला इथं येऊन भेटण्यासाठीं किती तरी पत्रं लिहिलीं होतीं. तीं त्या शिपाईबहाद्दराला कशीं मिळालीं नाहींत, याचंच मला आश्चर्य वाटतं ! ”

“ पण तीं पत्रं शोधायला कदाचित त्याला वेळ मिळाला नसेल. ”

“ असेलही. कारण बहुश: पोलिसखात्यांतले लोक आपला वेळ व्यर्थ कधींच घालवीत नाहींत. पण तिचा बिचारीचा खून करणारा हा आहे तरी कोण ?

“ तें कांहीं मला सांगतां येत नाहीं. खुनासंबंधानं झालेल्या चौकशीची हकीवत मी नुसती वरवर वाचली होती. जिचा खून झाला ती सरलाबाई आहे, असं जर मला त्या वेळीं कळतं, तर मी चौकशीच्या वेळीं तसाच पुढं झालों असतों; कारण, त्यापासून आपलाच फायदा आहे. ” कादर म्हणाला.

“ मनांत आलंच तर अद्यापिही होण्यासारखं आहे.” अबदुल थोडा वेळ विचार करून म्हणाला, “ कारण तिच्या मृत्युपत्राबद्दल आम्हींच जबाबदार आहोंत. आणि खुनी इसमाला शोधून काढण्याकरतां तिच्या वारसाला बक्षिस लावण्यास सांगायचा आम्हांला हक्कही आहे. पण त्या मृत्युपत्राची व्यवस्था आपणाला आतां केली पाहिजे. ”

“ त्याच उद्योगाला आतां लागणार मी. तें त्या पेटींत आहे. ” तेथेंच असलेल्या एका पेटीकडे बोट दाखवून कादर म्हणाला, “ पण तिनं आपलं मृत्युपत्र नवऱ्याच्या नांवचं कसं केलं नाहीं ? ”

“ मला वाटतं, तिचं आणि तिच्या नवऱ्याचं पटत नसावं.” अबदुल म्हणाला, “कारण, तो नेहमीं दूर राहत असे. ”

" एँ: त्यांत कांहीं अर्थ नाहीं. तो व्यापारी असल्यामुळं त्याला नेहमीं गांवोगांवीं जावं लागत असे. "

" पण मला कांहीं तसं वाटत नाहीं. " अबदुल एकदम मध्येंच म्हणाला, " तो व्यापारी होता यावर माझा मुळींच विश्वास बसत नाहीं. कारण, अशा माणसांबरोबर सरलाबाईनं लग्न लावलं असेल हें मला शक्यच वाटत नाहीं.तुम्ही किनखाप्यांना कधीं पाहिलं आहे का ?"

" नाहीं. " कादरनें नकारार्थी मान हालवून म्हटलें, " तू तरी ? "

" छे; कधींच नाहीं. तुम्ही मला कांहीं कामाकरतां पाठवल्यामुळं मी दोन वेळां तिच्या घरीं गेलों होतों, तरीही तो मला कुठंच दिसला नाहीं. तिच्या घरांतील तो सफेत दिवाणखाना मला चांगलाच आठवतो. पण ज्या वेळीं रत्नमहालांतील खुनाची हकीकत पुढं आली त्या वेळीं त्याचा मला कसा विसर पडला याचंच मला आश्चर्य वाटतं ! तें जाऊंद्या. पण सरलाबाईचा व आमचा संबंध कसा आला ? मी या ऑफिसचं काम करूं लागल्यावर तिनं आम्हांला आपला सॉलिसिटर नेमलं ? "

" होय. " कादर आपली शून्यदृष्टि खोलीच्या खिडकीबाहेर रोखून म्हणाला, " तिचा दूरचा एक चुलता तिच्या आईला मदत करीत असे व आईच्या मृत्यूनंतर तिच्या मुलीलाही तो तेवढीच मदत दरमहा देई. "

" मग त्याच्या मरणानंतर त्याची सर्व मिळकत हिला मिळाली असावी. "

"होय. थोड्याच दिवसांपूर्वी ती तिला मिळाली. मी ताबडतोब तिला भेटायला बोलावलं. ध्यानींमनीं नसतां आपणास एवढी संपत्ति मिळालेली पाहून तिला त्या वेळीं जवळ जवळ मूर्च्छाच आली ! नंतर मी तिच्या एकंदर मिळकतीची माहिती देऊन तिचं काम कसं काय पाहायचं तें ठरविण्याकरितां तिच्या नवऱ्याला पाठविण्यास सुचविलं. कारण, असल्या भानगडी स्त्रियांपेक्षां पुरुषालाच समजतात. पण आपला नवरा एक महिन्यापूर्वी कलकत्त्यास गेला आहे असं तिनं मला कळवलं."

" तिचा दुसरा एक चुलतभाऊ आहे ना ? "

" होय,–मधुकर सरनाईक त्याचं नांव." सरलेचें मृत्युपत्र असलेल्या पेटीकडे नजर वळवून कादर म्हणाला, "तो नाटकांत काम करतो. मला त्याला आतां ताबडतोब भेटायला बोलावलं पाहिजे."

"कां ? त्याचा कांहीं तिच्या मृत्युपत्राशीं संबंध आहे ?"

परंतु त्या प्रश्नाचें कादरनें उत्तर देण्यापूर्वीच एका शिपायानें आंत येऊन त्याच्या हातीं एक 'व्हिजिटिंग कार्ड' दिलें. "दांडेकर," तें कार्ड वाचून कादर म्हणाला, "हा सरलाबाईचा मामेभाऊ असून बहुतकरून तिच्या मृत्युपत्राची चौकशी करण्यासाठीं आला असावा. मग अबदुल, तूं जरा वेळ बाहेर जा. मास्तरसाहेबांशीं मला एकटयालाच थोडा वेळ बोलूं दे. मात्र बालिवाला थिएटरांत मधुकर सरनाईक यांना भेटण्याविषयींचं पत्र घालायला विसरूं नको. तेवढं काम आतांच करून टाक."

मास्तरसाहेब आंत येतांच कादरनें त्यांच्याशीं हस्तांदोलन करून त्यांना बसावयास एक खुर्ची पुढें केली.

"आपण येण्याची तसदी घेतलीत हें पाहून मला फार आनंद होत आहे." कादरनें पुढें आपण होऊनच बोलावयास सुरवात केली. "आपली आतेबहीण आपल्याविषयीं मजपाशीं पुष्कळदा बोलत असे."

"खरं कीं काय ?" कादरच्या चेहऱ्याकडे टक लावून मास्तरसाहेब म्हणाले, "आम्हां उभयतांच्या अल्प परिचयाकडे पाहतां तिनं असं करावं म्हणजे खरोखरच आश्चर्याची गोष्ट आहे. बरं, तें असो. पण ज्या अर्थी तुम्हीं म्हणतां आहांत, त्या अर्थी तिच्यासंबंधीं सर्व हकीकत आपणांस कळलीच असेल."

" अगदीं तसंच कांहीं म्हणतां येणार नाहीं. जिचा खून झाला ती सरलाबाई होती हें आतांच मला या वर्तमानपत्रावरून कळत आहे." कादर समोर पडलेल्या वर्तमानपत्राकडे बोट करून म्हणाला, " मला वाटतं, तुम्ही याच कामाकरतां मला भेटायला आलां असाल. पण तुम्हाला ही बातमी कळली कशी ?"

"तुमच्याप्रमाणंच मलाही ती कळली. माझ्या एका मित्रानं वर्तमान-पत्र आणून दाखवलं."

" अस्सं. पण तुम्ही सरलाबाईचे मामेभाऊ आहां, तें तुमच्या मित्राला माहित होतं का ? "

"नाहीं; आमचं नातं असेल अशी त्याला कल्पनाही नव्हती. कालच तो सहज हें पत्र घेऊन माझ्या घरीं आला होता. "

" तुमचं घर कुठं आहे ? "

"दादर व माटुंगा यांच्या दरम्यान. म्हणजे ज्या घरांत तिचा खून झाला त्यापासून जवळच."

" अगदीं लागून आहे का घर तें ? "

" अगदीं लागून जरी नसलं तरीं एका हाकेच्या अंतरावर आहे. "

"तेव्हां तुम्ही तिचे मामेभाऊ असून रत्नमहालापासून जवळच राहतां तर. " कांहींसें हळू व कांहींसें मोठ्यानें कादर पुटपुटला.

" होय; आणि म्हणूनच मीं पुढं काय करावं तें विचारायला आलों आहें. " मास्तर अगदीं त्रासून गेल्याप्रमाणें म्हणाले. "साहेब, तुम्हांला खरं खरं सांगतों, या खुनाविषयीं मला अवाक्षरही माहित नाहीं, व जें कांहीं माहित झालेलं आहे तें सर्व वर्तमानपत्रांवरूनच कळलं. आणि कांहीं गोष्टी मात्र कमळाकर महाले यांनीं सांगितल्या. "

" कमळाकर कोण ? "

" खुनाच्या रात्रीं ज्यांची मोटर चोरीला गेली ते. ती मोटर ठाणे स्टेशनजवळ सांपडली. " मास्तर म्हणाले, " पोलिस म्हणत होते—"

" हं, आतां आठवलं. खुनी इसम त्या मोटरींतूनच फरारी झाला असं पोलिसखात्याचं म्हणणं होतं. पण चौकशीच्या दिवशीं त्यांना तसं कांहीं सिद्ध करून दाखवतां आलं नाहीं. बरं, तुम्ही ह्या गुन्ह्याविषयीं कांहीं हकीकत कमळाकराच्या तोंडून ऐकली; होय ना ? "

" होय, आणि वर्तमानपत्रांतूनही वाचली. पण जिचा खून झाला ती माझी आतेबहीण सरला असेल अशी मला कालपर्यंत कल्पना नव्हती ! तें कळतांच मीं आपणांस भेटायचं ठरवलं. "

" तें कां ? " कादरनें संथपणें विचारलें.

हा प्रश्न ऐकतांच मास्तरांना जरा आश्चर्य वाटलें. "म्हणजे ?" ते म्हणाले, "सरलेनं आपल्या उत्पन्नापैकीं कांहीं ठराविक वार्षिक उत्पन्न मला तोडून देण्याचा केलेला बेत आपणच मला प्रथम कळवलात."

"होय. तिचा तसा पूर्वी बेत होता खरा. पण मागाहून तो बदलला."

"तें मला माहित आहे." कादरचें उडवाउडवीचें भाषण व वागण्याची पद्धति वगैरे पाहून आश्चर्याच्या स्वरानें मास्तर म्हणाले, "ज्या वेळीं तिनं मला तसं लिहिलं त्या वेळीं मी तिला जाऊन भेटलों. आपण आपल्या मृत्युपत्रांत तुझ्या नांवानं कांहीं तरी ठेवीन असं तिनं मला त्या वेळीं वचन [illegible]लं होतं."

हें ऐकतांच [illegible]दरनें एकदम चमकून वर पाहिलें. दांडेकरांचें वरील भाषण चालू असतां दुर्लक्ष केल्याप्रमाणें दाखवून आपल्या समोरच असलेल्या टिपकागदावर तो हातांतील टांकानें कांहीं तरी खरडीत होता. परंतु त्यांचा एकही शब्द त्याच्या कर्णेंद्रियांतून निसटूं शकला नाहीं. वर पाहतांच त्यानें मास्तरसाहेबांच्या मनांत काय असावें हें काढण्याचें मनांत आणलें.

"सरलाबाईनीं तुम्हांला फायदेशीर असं मृत्युपत्र त्यांच्या मृत्यूपूर्वी एकच आठवडा केलं होतं" तो म्हणाला, "पण आतां त्यांचं मृत्युपत्र तुम्हाला फायदेशीर नाहीं."

"म्हणजे ! तुम्ही म्हणतां तरी काय ?" मास्तरांनीं एकदम ओरडून विचारलें. अंगावर वीज कडाडून पडावी अगर डोंगराचा कडा कोसळावा तद्वत् कादरचे शब्द ऐकतांच मास्तरांची स्थिति होऊन त्यांच्या तोंडून आपोआपच वरील शब्द आले.

"तुम्ही असं काय म्हणतां तें मला समजलं नाहीं." निराशेचा ओघ ओसरल्यानंतर ते थोडया वेळानें अडखळत म्हणाले.

"सरलाबाईनीं थोडया दिवसापूर्वी आमच्याकडे येऊन एक मृत्युपत्र तयार करून आपली सर्व जिंदगी तुमच्या नांवं करून ठेवली !" कादरनें आपली हकीकत सांगण्यास सुरवात केली, "त्यांची सर्व मिळ-

कत वर्षाला दहा हजारांच्या उत्पन्नाची आहे. त्या मृत्युपत्रांत तुम्हांला आपल्या हयातीपर्यंत वर्षाला कांहीं एक रक्कम मिळावी असंही तिनं नमूद करून ठेवलं होतं. त्यानंतर आपण काय व्यवस्था केली आहे तें तुम्हांला कळवण्याचं मनांत आणलं; पण अशा रीतीनं स्वतःला बांधून न घेण्याचा सल्ला आम्हीं दिल्यामुळं तिनं मागाहून आपलं मन बदललं; त्यानंतर आमच्या विचारानं आम्हीं काय लिहिलं तें तुम्हांला माहित आहेच. कांहीं दिवसांनीं तिनं तुम्हांला वर्षासन देण्याचा आपला बेत आम्हांला कळवून त्याप्रमाणं एक निराळं मृत्युपत्र बनवण्यास सांगितलं व तिच्या सांगण्याप्रमाणं आम्हीं एक तसं मृत्युपत्र तयार-सुद्धा केलं होतं."

"हें तिच्याकडून मला कळलं होतं," दांडेकर मध्येंच म्हणाले, "व नंतर—"

"नंतर तिनं स्त्रीस्वभावास अनुसरून आपला विचार बदलला! त्यानंतर आणखी कांहीं दिवस गेल्यानंतर ती पुन्हा आमच्याकडे आली व पूर्वीचं मृत्युपत्र स्वहस्तें रद्द करून ताबडतोब नवं मृत्युपत्र तिनं तयार करवलं. त्यामध्यें तिनं आपली सर्व जिंदगी मधुकर सरनाईक याच्या नांवं करून दिली. मधुकर सरनाईक तुमच्या माहितीचे असतीलच."

"मधुकर सरनाईक! कोण—तो, नट?" मास्तरांनीं एकदम ओरडून विचारलें.

"होय, तोच तो; मीं त्याला अजून प्रत्यक्ष पाहिलं नाहीं. पण माणूस मोठा उमदा आहे असं ऐकतों. तुमची जरी ह्या मृत्युपत्राच्या बाबतींत फसवणूक झालेली आहे, तरी तुमची स्थिति पाहून व तुमचा व सरलाबाईंचा आप्तसंबंध जाणून तो तुम्हांला कांहीं तरी भाग देईल असं माझं मन मला सांगतं. आम्हीं त्याला आजच लिहिलं असून तो लवकरच आम्हांला भेटल्याशिवाय राहणार नाहीं."

मास्तर या वेळीं कादरचें भाषण स्वस्थपणें ऐकून घेत होते. आपण केलेल्या मनोराज्याची इमारत ढासळून पडली, आपल्या सर्व आशांची

राखरांगोळी झाली हें त्यांना पूर्णपणें कळून चुकलें. सरलेच्या मृत्यु-पत्राची हकीकत ऐकतांच ते रागारागानें आपल्यावर उसळतील असें कादरनें अनुमान केलें होतें, परंतु त्यांनीं तसें कांहींच केलें नाहीं, हें पाहून त्यांना आश्चर्य वाटलें. मास्तरांचा चेहरा अकस्मात मिळालेल्या धक्क्यामुळें फिका पडून छातींत कळ येऊन जावी त्याप्रमाणें त्यांचा श्वासोच्छ्वास मंद चालला होता. अशा स्थितींत बराच वेळ गेल्यानंतर मास्तरांनीं एक दीर्घ श्वास सोडून हंसरी मुद्रा करीत म्हटलें, "एकंदरींत तिनं मला कांहींच ठेवलं नाहीं तर ! ठीक आहे. आनंदाची गोष्ट आहे !"

"आनंदाची ! ती कशी बुवा ?"

"एका अर्थानं आनंदाचीच नाहीं तर काय ? कारण जर तिनं मला आपला वारस केलं असतं तर तिच्या खुनांत माझंही थोडंबहुत अंग असावं असा संशय येऊन पोलिसांनीं छळ करण्यास कमी केलं नसतं; नेम कुणीं सांगावा ?"

"हें खरं यांत संशय नाहीं." कादर जरासा घोटाळून म्हणाला, "पण पोलिसांना तुमचाच संशय आला असता, असंच तुम्हाला कां वाटतं ? आतां ज्या घरांत तिचा खून झाला तिथून जवळच तुम्ही राहतां, तरी त्या वेळीं, त्या रात्रीं व त्या घटकेला तुम्ही कुठं होतां, काय करीत होतां हें साक्षीपुराव्यानिशीं सिद्ध केलं असतं तरी तुम्हांला कसलीच भीति नव्हती."

"मग तिकडेच तर नडत आहे ना !" मास्तरसाहेबांनीं कादरला संथपणें सांगितलें. "मी एकटाच राहतों आणि त्या दिवशीं संध्याकाळीं पांच वाजल्यापासून मीं कुणालाही पाहिलं नाहीं व कुणासही भेटलों नाहीं. मग साक्षीपुरावा कुठून आणूं ? अर्थात् कुणाला न भेटतां रात्रीं रत्नमहालांत जाऊन पैशाच्या आशेनं तिचा खून करून स्वस्थपणें आपल्या घरीं आलों असं नेहमींच प्रत्येकाकडे संशयी दृष्टीनं पाहणाऱ्या पोलिसखात्याला वाटल्याखेरीज राहील का ? त्यांच्या संशयाला प्रथम मीच बळी पडणार."

" तुम्ही व्यर्थ स्वत:ला अस्वस्थ करून घेत आहांत झालं." मास्तरांना घाबरलेले पाहून धीर देण्याच्या उद्देशानें कादर म्हणाला, " पोलिसखात्याची ही संशयी नजर तुमच्याकडे कधींच वळणार नाहीं, अशी माझी पूर्ण खात्री आहे. "

" तें कसं ? "

" कारण, जर तुम्ही अपराधी असतां तर तुमची वागण्याची तऱ्हा त्याहून निराळी असती. न केलेला अपराध आपल्याच माथ्यावर लादण्याचा अपराध खरा अपराधी कधींच करीत नाहीं ! बरं, तें असो. या विषयावर वादविवाद वाढवण्यांत अर्थ नाहीं. कारण तें काम पोलिसखात्याचं असून त्याबद्दल आपण कितीही जरी उरस्फोट केली तरी सरकारकडून आपणांस एक कपर्दिकाही मिळायची नाहीं. बरं, याखेरीज आणखी विशेष कांहीं तुम्हांला सांगतां येण्यासारखं आहे काय ? "

"कांहींच नाहीं. जितकं ठाऊक होतं तितकं मीं सांगितलंच आहे, पण आतां ज्या अर्थी तिची सर्व दौलत मधुकरास मिळाली आहे, त्या अर्थी खुनी इसम हुडकण्याचा प्रश्न त्यांनीं हातीं घेतला पाहिजे असं तुम्हांला नाहीं का वाटत ? जर पैसा मला मिळाला असता तर मींच तें केलं असतं. "

" तुमचं म्हणणं काय आहे तें माझ्या ध्यानांत नाहीं आलं. "

" एवढं तुम्हाला समजलं नाहीं ! " मास्तरांनीं आश्चर्ययुक्त हेटाळणीनें विचारलें, " माझ्या आतेबहिणीचा खून करणारा इसम फांसावर लटकलाच पाहिजे ! कालच मीं एका वर्तमानपत्रांत एक जाहिरात पाहिली. अशा प्रकारचे गुन्हे शोधून काढण्याचं काम एक खासगी माणूस करीत असतो. इथं येण्यापूर्वी मी तिकडेच गेलों होतों. "

"अस्सं ! आणि तुम्हीं त्याला काय सांगितलंत ? "

"त्याचं नांव रामसिंग असं आहे. सरलेच्या मृत्यूविषयीं जेवढी माहिती मला होती तेवढी सर्व मीं त्याला सांगितली. तसंच, ह्या खुनाशीं संबंध असणारी इतर हकीकतही मीं त्याला सांगून हा खटला हातीं

घेण्याबद्दल मीं त्याला सुचवलं आहे व त्याप्रमाणं तो प्रथम आपल्याला भेटायला येईल."

"मला भेटण्यापासून त्याचा कांहीं फायदा होणार नाहीं." मास्तरांच्या या उठाठेवी कादरला न पटल्यामुळें तो थोडासा चिडून म्हणाला, "जर तुम्ही तिच्या मिळकतीचे वारस असतां तर तें ठीक होतं; पण ज्या अर्थी तुमची अशी हलाखीची स्थिति आहे, त्या अर्थी हा उपव्याप तुम्ही करायला नको होता. कारण, त्याच्या श्रमाचा मोबदला तुम्ही त्याला कुठून देणार, तेंच मला कळत नाहीं."

"तें खरं." मास्तरसाहेब थोडे घुटमळून म्हणाले, "आणि म्हणूनच मधुकरानं त्याच्याच हातीं हें काम द्यावं अशी माझी इच्छा आहे."

"अशी सक्ति तुम्हांला कशी करतां येईल ? आम्हाला पसंत असेल तो माणूस निवडून त्याच्याकडेच हें काम आम्हीं देणार." कादर म्हणाला.

"असंच जर असेल तर त्या गोष्टीचा छडा लावण्याचा मीही प्रयत्न करणार." "मास्तर गुर्मीतच ठांसून म्हणाले, "खुनी इसम शोधून काढण्याचा मीं निश्चयच केला आहे. मधुकराला—"

"जें योग्य असेल तेंच करण्याची आम्ही सल्ला देऊं." कादर उठून मास्तरांचें वाक्य पुरें होऊं न देतां मध्येंच म्हणाला, "त्याला दहा हजारांची मिळकत आतां मिळाली असून खुनी इसमाचा तपास करायला तो मागंपुढं पाहणार नाहीं, अशी आमची खात्री आहे. मात्र ती गोष्ट शक्य असली पाहिजे."

"शक्य कां नसणार ? खात्रीनं शक्य असलीच पाहिजे." मास्तर आपला हात मेजावर आपटून म्हणाले. "सरला कांहीं कारण असल्याशिवाय त्या घरीं गेली नाहीं, अशी माझी खात्री आहे. हिंवाळे कसे काय आहेत तें मला माहीत नाहीं व किनखाप्यांनाही मी ओळखत नाहीं. पण ह्या दोघांपैकीं कुणीं तरी एकानं तिचा खून केला असला पाहिजे."

"याबद्दल तुमच्यापाशीं काय पुरावा आहे ?" कादरनें ताबडतोब प्रश्न केला.

" कारण, रामसिंगानं तसं मला पटवलं म्हणून. माझी सर्व हकीकत ऐकतांच तो असं म्हणाला. " मास्तरांनीं उत्तर दिलें.

आतां कुठें कादरच्या डोक्यांत थोडा प्रकाश पडूं लागला.

" तुम्ही रामसिंगाला इकडे पाठवून द्याल का ? माझा व मधुकर-रावांचा जर त्याच्याविषयीं चांगला ग्रह झाला तर आम्हीं खुनी इसमाचा तपास करण्याचं काम त्याजकडेच सोंपवूं. मी इन्स्पेक्टर सर्जेरावांनाही लिहून त्याची कांहीं मदत मिळाल्यास पाहतों. हें ठरलं तर, पण काय हो मास्तरसाहेब, ह्या खुनाच्या शोधाला उपयोगी पडतील असे सरलाबाईच्या आयुष्यांतील कांहीं प्रसंग मला सांगतां का ? ह्या कामीं उपयोग होईल म्हणून विचारतों. "

"ती सुस्वभावी व निर्मळ वर्तनाची स्त्री होती यापेक्षां मला कांहींच अधिक माहित नाहीं. पण तिचा खून झाला तो सूड घेण्याच्या हेतूनंच झाला असावा यांत संशय नाहीं. खुनी इसम मिळालाच पाहिजे; नाहीं तर—"

" तुमचा संशय घेतील कदाचित् ! " कादर मध्येंच उपरोधिकपणें हंसून म्हणाला.

" ती निराळी गोष्ट ! " मास्तर म्हणाले, " मी जरी गरीब असलों तरी माझा आहे तेवढा पैसा खर्च करीन, अगदीं कफल्लक होईन, पण खुनी इसम शोधून काढण्याचा प्रयत्न केल्याशिवाय कधींही राहणार नाहीं. "

" पैशाकरतांच जर सरलाबाईचा खून झाला असेल, तर खुनी मिळाल्याशिवाय कधींच राहणार नाहीं. कारण, तिच्या पैशांवर आपला हक्क शाबीत करूं पाहणाऱ्या प्रत्येकावर आम्ही करडी नजर ठेवल्या-शिवाय राहणार नाहीं. " असें म्हणून कादरनें जाण्यास उठलेल्या मास्तरांना आपल्या खोलीचा दरवाजा उघडला. " मग आपल्याला कांहीं वार्षिक रक्कम देण्याविषयींची गोष्ट मी मधुकररावापाशीं काढूं का ? " मास्तर बाहेर पडत असतां त्यानें पुढें विचारलें.

" नको नको ! तसं करण्याची कांहीं जरूरी नाहीं." मास्तरमजकूर जरा रागानेंच म्हणाले, "मधुकरराव परके आहेत ! व मी परक्याचं धन कधींही घेत नाहीं. त्याला जर पैशाचा लोभ नसेल तर त्यानं त्यापैकीं कांहीं भाग खुनी माणसाचा पत्ता लावण्याच्या कामीं खर्चीं घालावा. आणखी इतकंही करून जर मला कांहीं तिचा नातलग म्हणून देण्याचीच कांहीं इच्छा असली, तर रामसिंगालाच त्यांनीं ह्या कामावर नेमावं अशी माझी इच्छा आहे,ती पूर्ण करावी. कारण सरलेची जिंदगी मलाच मिळणार, ह्याच समजुतीवर मी त्याला शब्द देऊन चुकलों आहें.

" रामसिंग हुषार आहे का ? "

" तसं माझं तरी मत आहे खरं. "

" पण त्रोटक हकीकत ऐकून एकदम आपलं मत प्रतिपादन करणारा माणूस दिसतो. कारण, चौकशीच्या वेळीं हिंवाळ्यांनीं आपला निरपराधीपणा सिद्ध करून दाखवला असतांही तो त्यांनाच खुनी ठरवूं पाहत आहे. चांगले गुप्त पोलिस असा चंचलपणा कधींच करणार नाहींत व त्याचा तपास करण्याची पद्धति जर अशा प्रकारची असेल तर ती चुकीची असून, त्याचा उपयोग आम्हांला होणार नाहीं, असं माझं प्रामाणिक मत आहे. "

"असं जर आपलं मत असेल तर आपण तो खटला वाटेल त्याच्या हातीं देण्यास समर्थ आहां. हा माझा पत्ता. " आपल्या खिशांतून एक व्हिजिटिंग कार्ड काढून कादरच्या हातीं देत मास्तर म्हणाले, " मधुकररावांना भेटण्याकरतां लिहा. तो हल्लीं पूर्वीच्याच ठिकाणीं राहत असेल. "

घडून आलेल्या एकंदर गोष्टीवर विचार करीत मास्तर तेथून बाहेर पडले.



## प्रकरण १० वें

# आचाऱ्यानें लाविलेला शोध!

यानंतर थोड्याच दिवसांची गोष्ट. रमाबाई आपली मुलगी माणक हिला खेळविण्यांत गढून गेली होती. इतक्यांत गजाननराव तेथें आले. त्यांचें आगमन रमाबाईंना आवडलें नसावें असें त्यांच्या मुद्रेवरून दिसलें.

" आपण या वेळीं इथं आलां नसतां तर बरं झालं असतं; कारण, इतक्यांत माझ्या कांहीं मैत्रिणी मला भेटायला यायच्या आहेत. " रमाबाई त्यांच्याकडे निरखून पाहत शांतपणें म्हणाल्या.

" पण मी कांहीं इथं फार वेळ राहणार नाहीं. " गजाननरावांनीं खिडकीच्या बाहेर पाहत उदासीनवृत्तीनें उत्तर दिलें.

"तसं असलं तर बरंच आहे. पण सध्या आपण आपल्या नेहमीच्या उद्योगधंद्याला कां जात नाहीं ? " विषय बदलण्याच्या हेतूनें रमाबाईंनीं विचारलें.

" तूं मला जाऊं देशील तेव्हां ना ! " गजाननरावांनीं बेफिकीर वृत्तीनें उत्तर दिलें.

" एकूण, माझी संमति नाहीं म्हणून आपण जात नाहीं, असंचा ना !" रमाबाई आपल्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें गजाननरावांना खिजविण्याच्या उद्देशानें म्हणाल्या, "नाहीं तरी घरची व्यवस्था पाहण्याकरतां आपण घरीं राहिलंच पाहिजे. नाहीं तर तें सर्व स्वतः मलाच पाहावं लागेल. छे, कोण ग बाई तो त्रास सोशील ! "

" जशी तुझी इच्छा !" गजाननराव मिनीशेजारीं जमिनीवर बसून तिला खेळवीत म्हणाले, " आपण कांहीं तुझ्या इच्छेबाहेर नाहीं. "

" अस्सं ? म्हणूनच उद्योगधंद्याच्या निमित्तानं महिन्यांतले पंधर-दिवस आपण बाहेर घालवीत होतां वाटतं ? कुणी ऐकलं तर त्याला या बिचाऱ्यांची दयाच यायची ! जशी बायको अगदीं कर्कशाच आहे. पण आपण या महिन्यांत प्रवासाला कसे गेलां नाहीं ? " रमाबाईंनीं विचारलें.

" नाहीं गेलों. आणि यापुढं बहुतकरून मी कधींच जाणार नाहीं व मला ही प्रवासाची दगदगही सोसवत नाहीं. शिवाय मी नेहमी बाहेर असतों अशी माझ्या मागची पिरपीर चुकेल. पण काय ग, आपला हा रत्नमहाल विकायला केव्हां काढणार ! आपल्यानं बुवा ह्या खून झालेल्या घरांत कांहीं राहवत नाहीं." गजाननराव विषय बदलण्याच्या हेतूनें पुढें म्हणाले.

" मी त्याच तजविजीस आतां लागलें आहें. बहुतकरून या महि-न्यांतच तें काम होईल. या बंगल्याचे पैसे येतांच आपण पुण्यालोणा-वळ्यासारख्या हवेच्या ठिकाणीं एखादा बंगला विकत घेऊं. आपली मिनीही तसल्या ठिकाणीं सुधारेल. "

" तिकडे राहणं आपल्याला कांहीं आवडणार नाहीं. "

" कां बरं ? आपण तर आतां व्यापारधंदा पाहणार नाहीं म्हणतां, मग तिकडे जाऊन राहायला हरकत कोणती ? पण, आपली इच्छा नसली तर माझी कांहीं बळजबरी नाहीं. कारण, जोंपर्यंत मला स्वतःचा कारभार पाहायला अडचण होत नाहीं तोंपर्यंत मला कुठंही राहणं सारखंच. "

"मला वाटतं हें शहर सोडून बाहेर कुठंच जाण्याची आपणास गरज नाहीं. " गजाननराव म्हणाले.

" आपल्याला नसली तरी मला आहे. " रमाबाई जरा कुऱ्यानेंच म्हणाल्या, " माझ्या मनाप्रमाणं चालण्यांत तुमचं कल्याण आहे. काय केल्यानं आपलं हित होईल हें मलाच कळतं, समजलं ? हं,ऐका,

खालीं कुणी तरी बोलत आहे. बहुतकरून माझ्या मैत्रीणीच आल्या असतील. "

गजाननरावांची इच्छा नव्हती तरी त्यांना उठावेंच लागलें. रमाबाई-पुढें त्यांची मात्रा चालत नसे. ते बाहेर जातां जातां म्हणाले, " आज मी चांगलीच झोंप काढली तरी कांहीं माझी सुस्ती जात नाहीं. मला वाटतं, आज नाटकाला गेलेलं बरं. मनाची कांहीं तरी करमणूक तरी होईल; जाऊं ना ? " त्यांनीं रमाबाईस विचारलें.

" आपली इच्छा असली तर खुशाल जावं. " रमाबाई शांतपणें म्हणाल्या.

रमाबाई आणखी पुढें कांहीं बोलणार होत्या, तोंच दरवाजावर थाप ऐकूं येऊं लागली व मागोमाग नोकरशाही पोषाक केलेला व अंगानें फोफसा असा एक माणूस त्या दिवाणखान्यांत शिरला. त्याला आंत आलेला पाहून आपल्या पत्नीच्या मैत्रिणीची वर्दी देण्याकरितां तो आला असावा अशी समजूत करून, गजाननराव बाहेर निघून गेले. तो माणूस आंत येतांच आपल्या धनिणीकडे कावऱ्याबावऱ्या नजरेनें पाहत उभा राहिला.

" काय रे, काय गडबड आहे ? " रमाबाईनें त्याला थोडेंसें दटावू-नच विचारलें.

"कांहीं नाहीं, बाईसाहेब," तो नवागत माणूस चांचरत म्हणाला, " आपला स्वयंपाकी वेडयासारखाच कांहीं तरी बडबडत आहे, एवढंच सांगायला आलों होतों. "

" खरं कीं काय ? " त्याच्या बातमीनें भयभीत व आश्चर्यचकित होऊन रमाबाईनीं विचारलें. ती बातमी ऐकून तिच्या हातीं असलेलें विण-कामाचें सामान तिच्या नकळतच गळून पडलें होतें. "म्हणजे ! असं ते काय बडबडत आहे ? " तिनें पुढें विचारलें.

"आपल्याला अगणित द्रव्य सांपडलं असून लवकरच आपण लक्षा-धीश होणार असं कांहींच्याबाहींच तो बरळत सुटला आहे, व ही हकीकत आपणास कळविण्याकरतां तो स्वतः वर येणार आहे, बाई

साहेब. पण काय रे, असं कांहीं तरी बडबडायची ही त्याची तिसरी खेप नव्हे ? मागं केव्हां केव्हां असंच कांहीं तरी तो बरळत असतांना आपण ऐकलं आहे."

"होय. प-पण बाईसाहेब, मला वाटतं, कीं या वेळीं मात्र तो व्यर्थ बडबड करीत नसावा. कारण त्याला खरोखरच हिरे सांपडलेले आहेत."

"हिरे सांपडले ! तूं म्हणतोस तरी काय ? शुद्धीवर आहेस ना ?" या वेळीं मात्र रमाबाईंच्या चेहऱ्यावर आश्चर्याची छटा स्पष्टपणें दृग्गोचर होत होती.

"ते हिरे त्याला स्वयंपाकखोलींत वर असलेल्या एका कोनाडयांत सांपडले. आणि ते—"

इतक्यांत तो स्वयंपाकी तेथें आला. "बाईसाहेब," तो धापा टाकीत म्हणाला, "मीं आपली नोकरी आज याच घटकेला, नव्हे याच क्षणाला सोडली, बरं का ?" त्याच्या दृष्टींत हळू हळू बेपर्वाईची झांक मारूं लागली. "माझं सामानसुमान सर्व कांहीं बांधून तयार असून फक्त आपला निरोप घ्यायचाच तेवढा राहिला आहे."

"हूं ! अस्सं !" रमाबाई उत्तरादाखल उपहासात्मक हंसून म्हणाल्या, "ठीक आहे, तुला जायचं असेल तर खुशाल जा. माझी मुळींच आडकाठी नाहीं. पण तसं केलंस तर झाल्या दिवसांचा पगार कांहीं तुला मिळणार नाहीं व पुन्हा जर इथं भिक्षा मागायला आलास तर तुला मी दारांत उभा करणार नाहीं, समजलास ? चल, चालता हो खालीं !"

"पण मला आतां पगार मिळाला न मिळाला सारखाच ! मला त्याची आतां मुळींच फिकीर नाहीं." तो आपल्या जागेवरून न हालतां म्हणाला, "म्हणजे मी तुमची चोरी करून जात आहें असं मात्र मनांत आणूं नका, हं. कारण मला तुमच्या स्वयंपाकघरांतील वरच्या कोनाडयांत बरंच धन मिळाल्यामुळं मी आतां तुमच्या बरोबरीचा श्रीमंत माणूस झालों आहें."

"अस्सं ! कसलं धन तुला सांपडलं ?"

"अहं, तें मी नाहीं सांगणार. तुम्हांला तें मीं सांगितलं, तर तुम्ही तें माझ्याकडून घेतल्याशिवाय राहाल का ?"

" हं ! तुझी जीभ एकंदरींत बरीच लांबत चालली. पण माझ्याशीं तुझ्या गमजा चालायच्या नाहींत, हें तूं विसरलास. तुला सांपडलेली वस्तु जर तूं मला ताबडतोब दाखवली नाहींस तर पोलिसला बोलावून आणून त्याच्या स्वाधीन तुला इथल्या इथं करीन, समजलास ? हं, काढ बाहेर काय तें. "

"नको नको, बाईसाहेब, तेवढं मात्र करूं नका." पोलिसाचें नांव ऐकतांच त्या आचाऱ्याची निशा पार उतरली. त्याचा पूर्वींचा लालट चेहरा एकदम भीतीनें फिका होऊन तो आंतल्या आंत थरथर कापूं लागला.

" ही पाहा ती, बाईसाहेब." असें म्हणून त्यानें एक खंजीर सदऱ्याच्या खिशांतून बाहेर काढला. त्या खंजीराचें पातें पोलादी असून अत्यंत तीक्ष्ण धारेचें होतें. खंजीराची मूठ सुवर्णाची बनविलेली दिसत असून तीवर ठिकठिकाणीं हिरे, माणकें, पाचूचे खडे इत्यादि अत्यंत मौल्यवान दिसणारीं रत्नें बसविलेलीं असून ती अत्यंत सुशोभित केलेली दिसत होती. त्या आचाऱ्यानें तो खंजीर बाहेर काढतांच त्या दिवाणखान्याच्या खिडकींतून आंत आलेले सूर्यकिरण त्यावर पडून त्या खड्यांची प्रभा एकदम चोहोंकडे फांकली, व तिचे तांबडे, हिरवे, जांभळे व इंद्रधनुष्याचे रंग परिवर्तित होऊन त्या दिवाणखान्याच्या भिंतीवर चोंहोंकडे पसरले व त्यामुळें त्या दिवाणखान्यास एक प्रकारची विलक्षण शोभा आली. रमाबाईची लहानगी मिनी जवळच खेळत होती; ती ते खडे व त्यांचा तो रंगीत स्वैरसंचार पाहतांच टाळ्या पिटूं लागली. व तो खंजीर आपणास मिळावा, म्हणून त्या आचाऱ्याशीं लडिवाळपणानें लगट करूं लागली. तिचा तो आनंद पाहतांच त्या आचाऱ्यासही आपणास मिळालेल्या दिव्य वस्तूविषयीं अभिमान वाटूं लागला.

" किती तरी छान आहे हा, नाहीं ताईसाहेब ? " तो अभिमानानें त्या लहानग्या मुलीस विचारूं लागला, " आणि हा मला एकट्यालाच सांपडला हो. "

" मला तो पाहायला दे पाहूं. " त्याच्या बडबडीकडे दुर्लक्ष करून रमाबाई मध्येंच म्हणाल्या.

पोलिसच्या भीतीनें म्हणा अगर रमाबाईंच्या वटारलेल्या दृष्टीकडे पाहून घाबरून म्हणा, त्यानें तो खंजीर ताबडतोब त्यांच्या हातीं दिला. परंतु त्यानें त्यावरील आपली तीक्ष्ण नजर क्षणभरसुद्धा वळविली नाहीं. रमाबाई तो खंजीर जसजसा इकडून तिकडे करीत असत तशी त्याची नजरही त्या त्या बाजूला वळत असे. यदाकदाचित् रमाबाईंनीं तो खंजीर जर मालकीच्या जोरावर स्वतः गिळंकृत करण्याचा प्रयत्न केला असता तर त्यानें तिजवर हल्ला करण्यासही कमी केलें नसतें, व तसें करून यःपलायन करण्याचीही त्याची तयारी दिसत होती. असो. रमाबाई त्या खंजिराकडे अगदीं आश्चर्यचकित होऊन पाहत आहेत असें पाहतांच त्यालाही आनंदाच्या उकळ्या फुटूं लागल्या. नशेंत आपण काय बोलावें व काय नाहीं याचा विचार करण्याची त्याची शक्तिही हर्षातिशयानें नष्ट होत चालली होती.

स्वयंपाक्याचें बरळणें चाललेंच होतें. रमाबाई खंजीर नीट न्याहाळून पाहत होत्या.

" मूर्ख आहेस झालं. तुला वाटत आहे तितक्या किंमतीचा हा नाहीं."

" बाईसाहेब, तुम्ही कितीही थट्टा केलीत, तरी मी कांहीं फसायचा नाहीं हो. मलाही थोडीबहुत खड्यांची माहिती आहे."

" तुला किती माहिती आहे तें दिसतंच आहे. नाहीं तर हे खडे कसले आहेत हें तुला ओळखतां आलंच असतं."

" म्हणजे ! आपलं म्हणणं माझ्या ध्यानांत नाहीं आलं."

" मूर्खा, त्याचा अर्थ हाच कीं, हा खंजीर माझा असून त्यावरील हे खडे नुसते कांचेचे तुकडे आहेत. आतां तरी डोक्यांत शिरलं कीं नाहीं ? "

"तुमचा ! बाईसाहेब ? कांहीं तरी सांगतां झालं. असल्या खंजिराचा तुम्हाला काय उपयोग ?"

" म्हणूनच तर तुला मी मूर्ख म्हणतें. त्या दिवशीं मी व मिनी फिरायला गेलों होतों तें तुला आठवत नाहीं का ?"

" त्याचा ह्या खंजिराशीं काय संबंध ?"

" चुप बैस. मूर्ख कुठला ! मध्येंच तोंड न घालतां सांगतें, तें सर्व नीट ऐकून घे." रमाबाई रागानें म्हणाल्या, "त्या वेळीं वाटेंत आम्हाला नाटकाला लागणारं स ान विकायला ठेवलेलं एक दुकान दिसलं. तिथं हा खंजीर पाहतांच माझ्या मिनीनं हा खंजीर आपणाला हवा असा हट्ट घेतल्यामुळं मीं हा दोन रुपयांना विकत घेतला. पण असला धारेचा खंजीर लहान मुलांना खेळायला योग्य नाहीं म्हणून घरीं येतांच तिला जेव्हां त्याचा विसर पडला तेव्हां तो तिच्या हातीं पुन्हा लागूं नये अशा विचारानं मीं त्या कोनाडयांत ठेवून दिला होता; तो आज तुला सांपडला."

ही हकीकत ऐकतांच त्या आचाऱ्याची मुद्रा पाहण्यालायक झाली ! तो तेथल्या तेथेंच मटकन् एका खुर्चीवर अवसानगलित होऊन बसला. जर तो पूर्ण शुद्धीवर असता तर त्याला संशय येऊन रमाबाईंनीं सांगितलेली हकीकत खोटी वाटण्याचा संभव होता व त्याचा तिजवर विश्वासच बसला नसता. कारण, तिनें सांगितलेली हकीकत खोटी वाटण्याजोगी होती. आधीं रमाबाईसारखी स्त्री असली वस्तु कधींच घ्यावयाची नाहीं, व यदाकदाचित् तिनें ती घेतलीच, तर मुलीपासून लपविण्याकरतां ती आपल्या ताब्यांत असलेल्या कुलपाकिल्लींत न ठेवतां एखाद्या धुळीनें भरून गेलेल्या घाणेरडया कोनाडयांत ठेवील ही गोष्ट कधींच संभवनीय नव्हती. परंतु मदिरेनें आपला पूर्ण अंमल त्याजवर बसविल्यामुळें खऱ्या वस्तुस्थितीचा विचारच त्याच्या मनांत आला नाहीं. रमाबाईंनीं सांगितलेली हकीकत ऐकतांच त्याची श्रीमंतीची धुंदी पार उतरून गेली. आपण श्रीमंत तर होणार नाहींच, परंतु उलट तिच्यासमोर केलेल्या अरेरावीमुळें ती कदाचित् आपणास नोकरीवरून दूर करील ही भीति त्याला आतां वाटूं लागली. तरीही त्या नशेंतच विचार करतां करतां एक आशेचा किरण त्याला दिसूं लागला.

" पण बाईसाहेब, तो खंजीर एखाद्या जवाहिऱ्याकडे तरी घेऊन जातों, म्हणजे ते खडे खरे आहेत कीं खोटे याचा तरी एकदांचा निर्णय होईल." तो निराशायुक्त स्वरानें म्हणाला.

" छट्, तुला काय वेड लागलंय् ? हे खडे खोटे आहेत हें तुला एखादं लहान पोरसुद्धा सांगू शकेल. तेव्हां हा खंजीर जवाहिऱ्याकडे न्यायची मुळींच जरूर नाहीं." रमाबाई नकारार्थी आपली मान हालवून म्हणाल्या, " तेव्हां हा मी मजपाशीं ठेवून देतें; कारण, जर हा तुजजवळ असला तर तुझं डोकं कांहीं ठिकाणावर राहायचं नाहीं, आणखी आतां तूं जी माझ्याशीं बेमुर्वतखोर वर्तणूक केली आहेस त्याबद्दल एक वेळ तुला क्षमा करतें. पण पुढें असं केव्हां केलंस तर तुला कदापिही क्षमा व्हायची नाहीं, हें ध्यानांत ठेव. चल, जा खालीं आणि लाग आपल्या कामाला ! "

त्या आचाऱ्यावर वज्राघातच झाला ! आज्ञेप्रमाणें तो जावयास उठला, परंतु तो खंजीर हस्तगत करून घेण्याकरतां शेवटचा तरी प्रयत्न करून पाहावा ह्या हेतूनें तो म्हणाला, " बाईसाहेब, पण ज्या अर्थी तो मला सांपडला आहे त्या अर्थी त्यावर माझीच मालकी नाहीं का ?"

" आमच्या घरांत असलेल्या अगर सांपडलेल्या प्रत्येक वस्तूवर मालकी आमचीच, समजलं ? चल नीघ आतां. खालीं गेल्यानंतर तुझ्या मित्रांनीं जर तुला ह्या खंजिराविषयीं कांहीं विचारलंच, तर त्यांना मीं सांगितलेली हकीकत सांगून त्यांचीं तोंडं बंद कर."

बिचारा आचारी ! यावर पुढें काय बोलणार ! मुकाट्यानें तेथून निघून जाण्याखेरीज त्याला गत्यंतर नव्हतें. " अरेरे ! शेवटीं गुलामगिरींतच खिचपत पडण्याची पाळी आली ! " असें स्वगत पुटपुटून तो निघून गेला. त्याच्या मनांतून आणखी कांहीं बोलावयाचें होतें; परंतु रमाबाईंची करडी नजर पाहतांच त्याला तेथून काढता पाय घ्यावाच लागला.

तो आचारी दिवाणखान्यांतून निघून जातांच रमाबाईंनीं पोलक्याच्या खिशांतून तो खंजीर पुन्हा बाहेर काढला व विचार करीत त्या त्याजकडे न्याहाळून पाहूं लागल्या. विचार करीत असतां मधूनच

त्या त्याच्या तीक्ष्ण धारेच्या पात्यावरून हात फिरवीत असत. इत-क्यांत जिन्यावर कुणाचीं तरी पावलें ऐकूं आल्यामुळें त्यांना तो खंजीर पुन्हा आपल्या खिशांत लपवून ठेवावा लागला.

लवकरच त्या दिवाणखान्यांत नलिनीनें प्रवेश केला. जिन्यावर पावलें वाजत होतीं तीं तिचींच होतीं.

" तुझी कुणी मैत्रीण आज भेटायला येणार होती ना ग ? मग अद्याप कुणी कसं आलं नाहीं तें ? " आंत येतांच तिनें रमाबाईस प्रश्न केला.

" नाहीं. " रमाबाईनीं उत्तर दिलें.

" कुणींच नाहीं ?"

" छे, कुणींच नाहीं." रमाबाईनीं जरा त्रासूनच म्हटलें, "कां ग ? मधुकर येणार आहे का ?" त्यांनीं पुन्हा जरा खोचीनें विचारलें.

नलिनी जरा त्रासल्यासारखी झाली. रमाबाईनीं हा प्रश्न कोणत्या हेतूनें विचारला असावा तें तिला समजलें.

" तें कांहीं सांगतां येत नाहीं. " तिनें त्याच स्वरांत उत्तर दिलें, " पण बहुतकरून ते आज येणार नसावे असं वाटतं. "

" त्या दिवशींही तूं असंच म्हणालीस. पण त्यांनंतर थोड्याच वेळानं मी जेव्हां खून झालेल्या स्त्रीच्या नांवाचा पत्ता लागला असं त्यांना कळवायला वर आलें, तेव्हां त्याला मीं बरोबर बोलत असलेला पाहिला. " असें म्हणून नलिनीच्या चेहऱ्यावर काय परिणाम होतो तें रमाबाई बारकाईनें न्याहाळूं लागल्या. परंतु नलिनीनें तिच्या भाषणाकडे अगदीं दुर्लक्ष केलें.

" पण मला वाटतं, आपण हा विषय सोडून दिलेला बरा नाहीं का ?" ती म्हणाली, "हें बोलून आपल्याला काय करायचं आहे ? एक वेळ सूर्याच्या अस्तोदयाच्या दिशांत फरक होईल; पण तूं त्यांच्याकडे चांगल्या दृष्टीनं कधींच पाहायची नाहींस.

" कां बरं मी पाहणार नाहीं ? " रमाबाई सौम्यपणें म्हणाल्या, " पण तूं त्याला त्या कंपनीच्या नव्या खेळांत काम करतांना कधीं

पाहिलं आहेस का ? " रमाबाईनीं एकदम विषय बदलला. हातांनीं त्यांचें वीणकाम चाललें होतें, पण त्यांचें सर्व लक्ष नलिनीच्या उत्तराकडे होतें. " मला वाटतं, तूं भवान्यांच्या मंडळीबरोबर त्या खेळाला गेली होतीस, नव्हे ? "

" होय, मी शरयूबरोबर गेलें होतें व तो खेळही मला फारच आवडला. " नलिनीनें थंडपणें उत्तर दिलें.

" आणि आतां मला असंही आठवतं कीं, त्या नाटकाच्या दुसऱ्या अंकांत राजा आपल्या प्रधानासह दौऱ्यावर असतांना प्रधान स्वतः राजाचा खून करतो. ज्या खंजीरानं तो स्वतःच्या स्वामीचा खून करतो त्याची मूठ चांगल्या हिरेमाणकांच्या खड्यांनीं मढवलेली असते. होय ना ? "

" होय. प्रधानाचं काम तेच करतात. पण तूं हे प्रश्न आज कां म्हणून विचारते आहेस ? "

" तसंच. " रमाबाई नलिनीच्या प्रश्नाकडे दुर्लक्ष करून गंभीरपणें म्हणाल्या, "जेव्हां मधुकर यांना भेटायला आला होता, त्याच दिवशीं आपल्या ह्या सफेत दिवाणखान्यासारखा दुसरा एक दिवाणखाना लोणावळ्यास असून तें घर सरलाबाई किनखापे नांवाच्या कुणा बाईनं घेतलं होतं, हें माझ्या वाचण्यांत आलं व त्याच दिवशीं मधुकरानं आपण त्या सरलेचा चुलतभाऊ असं इकडे सांगितलेलं मीं ऐकलं आहे. आणि त्या रात्रीं जिचा ह्या सफेत दिवाणखान्यांत खून झाला ती सरलाबाई किनखापे होती. "

" म्हणजे, तुझं म्हणणं आहे तरी काय ? " नलिनी त्रासल्याप्रमाणें होऊन म्हणाली. रमाबाई बोलत असतांना तिचा चेहरा कधीं रागानें लाल तर कधीं भीतीनें फिकट होत असे.

" मधुकर त्या कंपनीच्या नव्या खेळांत प्रधानाचं काम करतो. " रमाबाई पुढें म्हणाल्या, " त्या वेळीं राजाचा खून करायच्या पूर्वी त्याच्याकडे हिरेमाणकांच्या खड्यांनीं मढवलेल्या मुठीचा एक खंजीर खात्रीनं असतो. "

" हो. तसला एक खंजीर त्याच्याजवळ असतो. पण त्याचा इथं संबंध काय ? "

"संबंध इतकाच कीं, त्याच्याजवळच असतो तो खंजीर हा." असें म्हणून रमाबाईंनीं आपल्या पोलक्याच्या खिशांत पूर्वीं लपवून ठेवलेला तो खंजीर बाहेर काढून नलिनीस दाखविला. " हाच तो खंजीर. " ती पुढें म्हणाली, " यावरील हिरेमाणकं दिसतात ते निवळ कांचेचे खडे आहेत व हा खंजीर आमच्या आचाऱ्याला स्वयंपाकखोलींतील कोनाड्यांत सांपडला. "

" पुढं ? " नलिनीनें तो खंजीर आपल्या हातीं घेऊन नीट तपासून म्हटलें. त्या वेळीं तिची मुद्रा फिकट झाली होती.

" पुढं ? " रमाबाई कुत्सित हेतूनें नलिनीस म्हणाली, " पुढं काय तें तूंच विचार करून ठरव. मी यापेक्षां अधिक सांगूं इच्छित नाहीं. "

" म्हणजे त्यांनीं तिचा खून केला हेंच तुझं म्हणणं कीं नाहीं ? "

" तूंच विचार करून पाहा, ती त्याची चुलत वहीण होती.–हा खंजीर नाटकी लोकांच्या उपयोगाचा आहे.–तिसरं मधुकर वरच्यावर इकडे येत असून त्याला ह्या बंगल्याची चांगली माहिती आहे.–सर्व मुद्यांची नीट जुळवाजुळव करून त्यांतून निष्कर्ष निघतो—"

" बस्स, बस्स ! पुढं एक शब्दही बोलूं नकोस. " रागानें उसळून नलिनी म्हणाली, " तूं जरी कांहीं म्हटलंस तरी माझा कल्पांतींही विश्वास बसायचा नाहीं. समजलीस ? जरी ती त्यांची चुलत बहीण होती तरी आपल्या प्रत्यक्ष बहिणीचा खून ते कां म्हणून करतील ?"

" तो खंजीर आणि त्या दोघांचं नातं लक्षांत आण. पण काय ग, आपल्या बंगल्याच्या मुख्य दरवाजाची किल्ली मधुकराला कोणीं दिली ? तूं का ? " रमाबाईंनीं एकदम विचारलें.

" द्वेषाचा अतिरेक याहून होणं शक्य नाहीं. प्रत्यक्ष मागच्या बहिणीच्या भावि पतीविषयीं अकारण द्वेष ! त्या बाईचा खून करण्यांत त्यांना मीं मदत केली, असं तर तुझं म्हणणं, नाहीं ?"

" हं, आतां ये अशी ताळ्यावर. एकूण मधुकरानं तिला मारलं हें तूं कबूल करतेस तर ?" रमाबाईनीं विचारलें.

" नाहीं नाहीं ! तें मीं कधींच म्हणणार नाहीं. तुझ्या खोंचदार बोलण्यानं तूं मला फसवलंस. त्यांनीं हा खून केला हें मला केव्हांही खरं वाटणार नाहीं. तुझ्या बोलण्यानं माझं डोकं भिरभिरतं आहे." बोलतां बोलतां नलिनी खुर्चीवरून उठून त्या दिवाणखान्यांत जोराजोरानें येरझारा करीत म्हणाली, " नाहीं, त्यांनीं हा खून मुळींच केला नाहीं हा खून करून त्यांना कांहींच फायदा—"

" नले ! " रमाबाई मनांत कांहीं निश्चय करून आपल्या जागेवरून उठून म्हणाल्या, " तुला या खुनांतलं कांहीं तरी माहित असलंच पाहिजे, अशी माझी पूर्ण खात्री आहे. कारण, मधुकराबरोबर खुनापूर्वी तूं जशी वागत होतीस तशी आतांशा वागत नाहींस. सांग, तुला काय माहित आहे तें, कांहीं एक न लपवतां सांग."

" नाहीं. मला खरोखरच कांहीं माहित नाहीं." उद्वेगानें जोरानें चाललेल्या श्वाच्छोच्छ्वासामुळें या वेळीं तिचें वक्षस्थळ एकसारखें खालींवर होत होतें. त्याच वेळीं रमाबाईनीं तिचे दोन्ही हात घट्ट पकडून तिच्या हृदयांचा भेद करण्याकरितांच जणूं काय त्या तिजकडे भेदक नजरेनें पाहत राहिल्या.

" चल, मला जाऊं दे—" आपले हात सोडविण्याचा प्रयत्न करीत नलिनी म्हणाली.

" नाहीं, तूं सर्व कांहीं सांगेपर्यंत नाहीं."

रमाबाई आणखी पुढें कांहीं बोलणार होत्या. इतक्यांत त्या दिवाणखान्याचा दरवाजा उघडून एक नोकर आंत आला व त्यानें सरोजिनीबाई भेटीस आल्याची वर्दी रमाबाईस दिली. त्याच्या मागोमागच सरोजिनीबाई आंत आल्या. त्यांना पाहतांच रमाबाईनीं आपला क्षुब्ध झालेला चेहरा, जसें कांहीं कांहींच झालें नाहीं, अशा तऱ्हेनें एकदम पूर्वीप्रमाणें सौम्य करून त्यांचें मोठ्या प्रेमानें स्वागत केलें.

" या, या ! आज किती दिवसांनीं आमच्या घरीं पायधूळ झाडली ही ! " रमाबाई गोड शब्दानें बोलूं लागल्या. " बसा इथं. तुम्ही येण्या-पूर्वी मी व नली एक प्रहसन बसवीत होतों. आमची तालीमच चालली होती म्हणाना ! आमच्या इथं लवकरच स्त्रियांचं संमेलन भरायचं असून त्यांत हें प्रहसन करून दाखवायचं आहे. पाहणाऱ्या बायका व प्रहसनांत भाग घेणाऱ्याही बायकाच आहेत. किती मजेदार बेत आहे हा आमचा, नाहीं ? " सरोजिनीबाईंना मुळींच बोलूं न देतां तिचें चित्त दुसरीकडे गुंतविण्याकरतां रमाबाई एकसारख्या बोलतच होत्या.

"अरे, गोविंदा, जा, सुरेखसा चहा नी फराळाचं यांच्यासाठीं तयार करून लवकर वर घेऊन ये;" नंतर सरोजिनीबाईंकडे वळून त्या म्हणाल्या, " आतां चहा येईल, बरं का. पण सध्या तुमची प्रकृति कशी काय आहे ? दिसते आहे तर चांगली. "

इतकें जलद भाषण ऐकण्याची कधींच सवय नसल्यामुळें रमा-बाईंच्या ह्या चऱ्हाटाला सरोजिनी अगदींच त्रासून गेली. इतकेंच नव्हे तर तिचा मेंदू इतका तरतरीत नसल्यामुळें तिच्या भाषणाचा बहुतेक भाग तिला समजलाच नाहीं ! ती जवळ्याच्याच एका कोचावर बसून, चालून आल्याकारणानें आलेल्या थकव्यामुळें रमाबाईंच्या भाषणाकडे दुर्लक्ष करून विश्रांति घेऊं लागली.

" अग, मी केव्हांची येणार होतें." सरोजिनीबाईंनीं बोलावयास सुरवात केली, " पण येतां येतां आजचा दिवस उजाडला. आणखी बेत लांबवला असता तर केव्हां आलें असतें कोण जाणे ! पण दोन दिवसांपूर्वी आमच्या मास्तरसाहेबांनीं एक बातमी सांगितल्यापासून केव्हां एकदा इकडे येऊन नलिनीचं अभिनंदन करीन असं मला झालं आहे. "

" काय बातमी सांगितली मास्तरसाहेबांनीं ? " रमाबाईंनीं विचारलें.

" मधुकराला दैवयोगानं बरीच मोठी दौलत मिळाली आहे असं ते मला सांगत होते."

" दौलत ! कुठली दौलत ? " नलिनीनें मध्येंच विचारलें; तिचा चेहरा या वेळीं अगदीं उतरून गेला होता.

" वाऽऽग!" सरोजिनीबाई लडिवाळपणें म्हणाल्या, " जसं कांहीं तुला ठाऊकच नाहीं अं ! पण त्यानं सर्व कांहीं तुला सांगितलं आहे हें मला माहित आहे हो ! जिचा खून झाला ती त्याची चुलत बहीण हें त्यांनीं तुला सांगितलं होतं कीं नाहीं ? तिचा पैसा मधुकराला मिळणार आहे. "

थोड्या वेळानें सरोजिनीबाई गेल्यावर रमाबाई नलिनीला म्हणाल्या,

"नलू , सरलेच्या खुनाचं कारण तुला हवं होतं ना ? ऐक तर; मधुकरानं निवळ पैशाच्या लोभाकरतां तिचा खून केला. आतां समजलं का ? "

नलिनीच्या तोंडून तिला नकळतच एक भयसूचक उद्गार बाहेर पडला !



## प्रकरण ११ वें

# रहस्यभेदक

मधुकर दादरवरच एका आड रस्त्यावरील घरांत दोन खोल्या भाड्यानें घेऊन तेथें राहत असे. त्याच्या वरच्या मजल्यावर घरमालक राहत असे. त्याची व घरवाल्याची चांगलीच जानपछान असल्यामुळें तो बाहेर गेला असतां घरवाला केव्हां केव्हां त्याच्या जागेंत येऊन बसत असे. आज बाहेरून घरीं येतांच दोन अपरिचित व्यक्ति त्याच्या नजरेस पडल्या.

" मधुकरराव," मधुकर बाहेरून खोलींत येतांच तेथेंच बसलेला घरवाला त्या दोघांचा परिचय करून देण्याच्या उद्देशानें म्हणाला, " हे इथं बसलेले हे दांडेकर मास्तर व पलीकडे बसलेले त्यांचे एक मित्र रामसिंग, यापलीकडे यांची मला फारशी माहिती नाहीं. त्यांना इथं आणून बसवल्याला थोडाच वेळ झाला."

घरवाल्यानें परिचय करून देतांच मधुकरानें त्या दोघांकडे पाहून आदरानें नमस्कार केला व प्रत्येकाकडे कांहीं वेळ नीट न्याहाळून पाहिलें. रामसिंग व दांडेकर मास्तर या दोघांच्या चेहऱ्यांत व शरीरांत जमीनअस्मानाचा फरक होता. मास्तर जितके अशक्त तितकाच, किंबहुना अधिक, रामसिंग शरीरानें धट्टाकट्टा व दिसण्यांत बऱ्यापैकीं दिसत असे. त्याचा चेहरा वाटोळा गरगरीत असून त्याचें डोळे घारे व पाणीदार होते. चेहऱ्यावर कावेबाजपणाची व विनोदी स्वभावाची झांक मारत असे. त्याला पाहतांच हा चांगलाच विनोदी असावा असा पाहणाऱ्याचा समज होई. असो.

मधुकर त्या दोघांकडे पाहत असतांच दांडेकर मास्तरांनीं त्याला रामसिंग हा कोण आहे याची माहिती करून दिली. तो 'रहस्यभेदक' असून त्याचें काम गुन्हे पकडण्याचें आहे हें त्यांनीं त्यास कळविलें. मधुकरानें ती त्यांची माहिती स्वस्थचित्तानें ऐकून घेतली. परंतु त्याच वेळीं त्याला आश्चर्य वाटल्याखेरीज राहिलें नाहीं.

" यांना तुम्हीं माझ्याकडे कां आणलं ? " मधुकरानें रामसिंगाकडे पाहून मास्तरांस विचारलें.

"हा खून कुणाच्या हातून घडला याचा शोध लावण्यासाठीं. खुनी मनुष्याचा शोध लावायला मी इतका उत्सुक कां आहें हें तुम्हाला कादरसाहेबांनीं सागितलं असेलच ! "

" याच कामासाठीं ह्यांना तुम्ही इथं आणलंत ?" मधुकरानें प्रश्न केला.

" मग दुसरं कोणतं काम असणार ?" मास्तर दीनवाणीनें म्हणाले, " माझी व बिचाऱ्या सरलेची दोन वेळांच भेट झाली व तेवढ्या अल्पशा वेळांत तिनं मला फार प्रेमानं वागवल्यामुळं तिच्याबद्दल मला जिव्हाळा वाटत होता. तिच्या रक्तानं हात विटाळणाऱ्या दुष्टाचा पक्का सूड उगवला पाहिजे, अशी माझी फार इच्छा आहे."

" तशी इच्छा तर सर्वांचीच आहे ! "

" मी मध्येंच बोलतों म्हणून रागवूं नका हं. " रामसिंग म्हणाला, "सर्वांनाच अशी इच्छा असेल असं मला कांहीं वाटत नाहीं. आतां त्या खुनांची गोष्ट बहुतेकाच्या डोक्यांतून निघून गेली असून जो तो पूर्वीप्रमाणंच आपापल्या कामांत गढून गेला आहे. हे लोक बेसावध असतांनाच खुनी शोधून काढायचं काम आपण माझ्याकडे सोंपवा. कारण मास्तरांना पैसे द्यायचं सामर्थ्य नाहीं म्हणून आपणांस सांगत आहें. यांच्या सांगण्यावरून मीं माझ्या तपासाच्या कामाला सुरवातही केली आहे. "

" मग त्यापासून कांहीं तुम्हांला आशा वाटते का ? " मधुकरानें विचारलें, " खुनी मिळण्याचा कांहीं संभव आहे ?"

" तसा मीं एकदोन गोष्टींचा मेळ बसवला आहे." रामसिंगानें आपलें नोटबुक बाहेर काढून म्हटलें, " व आणखीही पुराव्याच्या शोधांत मी आहेंच. मला पुरेसा पुरावा मिळाल्यानंतर मी त्याला पकण्याच्या मार्गास लागणार. पण," त्यानें तें नोटबुक बंद करून म्हटलें, " तें काम मीं हातीं घ्यावं अशी आपली इच्छा नसेल तर यांतील पानं मी फाडून टाकीन."

" छे छे ! असं मुळींच करूं नका. आपल्या हातून होईल तितका प्रयत्न करून तुम्ही खरा खूनी शोधून काढावा असं माझं तुम्हांला सांगणं आहे. आपला सर्व खर्च मी सोशीन."

" आपलं काम माझ्या हातून झालंच असं समजा." रामसिंग आनंदानें मान हालवीत म्हणाला, " हें आश्वासन म्हणजे थोडंथोडकं नाहीं ! हर प्रयत्नानं मी खरा खुनी शोधून काढीन."

" आतां तुमची इच्छा पूर्ण झाली ना?" मधुकरानें मास्तरकडे वळून विचारलें.

" होय." औपचारिक रीतीनें ते ताबडतोब म्हणाले, " याबद्दल आपले आभार मानावे तितके थोडेच आहेत. आपले शब्द ऐकून मला फारच बरं वाटलं. अच्छा, आतां आमचं काम झाल्यामुळं आमच्या जाण्यास तुमची हरकत नसेलच. जातों तर? घेऊं निरोप ?"

" नाहीं." मधुकरानें मास्तरसाहेबांस अडवून म्हटलें, " तुम्हांला एव्हां जातां येणार नाहीं. ज्या अर्थी रामसिंग तुमच्या नोकरींतून माझ्या नोकरींत आतां आले आहेत, त्या अर्थी माझ्या सांगण्याप्रमाणं त्यांना केलं पाहिजे. तुम्हीं या खुनाच्या बाबतींत आजपर्यंत काय काय शोध लावले आहेत, ते जाणण्याची माझी इच्छा आहे." ते रामसिंगाकडे वळून म्हणाले.

" ठीक आहे." पुन्हां आपलें नोटबूक बाहेर काढून उघडीत रामसिंग म्हणाला, " वर्तमानपत्राच्या मजकुरावरून, माझ्या स्वतःच्या निरीक्षणावरून व मास्तरसाहेबांनीं जी कांहीं हकीकत मला सांगितली

त्यावरून आणि कमळाकर महाले याजकडून मिळालेल्या बातमीवरून मी प्रथम खुनाच्या प्रकरणांतील बारीकसारीक गोष्टी समजावून घेतल्या. "

" कमळाकर ? " तें नांव आठवण्याचा प्रयत्न करीत मधुकर म्हणाला, " हं, आतां आठवलं. खुनाच्यान रात्रीं ज्याची मोटर हरवली तोच ना तो ? "

" याहून तुमचा–त्यांचा चांगला परिचय आहे, रावसाहेब." दांडे-कर मास्तर मध्येंच म्हणाले, " आपल्या भावी पत्नीची मैत्रीण शरयू भवाने हिच्याशीं त्याचं लग्न ठरलं आहे. "

" हें तुम्हांला कसं समजलं ? "

" म्हणजे ? मी भवान्यांच्याच वाडींत राहतों. मी तर त्यांचा भाडोत्री असून कमळाकर व शरयू या दोघांची व माझी चांगलीच ओळख आहे. नलिनीबाईही एकदा मला भेटल्या होत्या, आणि—"

"आणि तिनंच तुम्हांला हें सर्व सांगितलं ?" मधुकर मध्येंच म्हणाला.

" छे छे ! मला ही बातमी कमळाकराकडून समजली व मलाही तें जरा चमत्कारिक वाटण्याचं कारण जिच्या घरांत सरलेचा बळी पडला तिच्या बहिणीशींच तुमचा विवाह होण्याचं घाटत आहे ! "

"हा निव्वळ योगायोग म्हणायला हरकत नाहीं." मधुकर शांतपणें म्हणाला, "पण असं म्हणण्याचा तुमचा हेतु मला समजला नाहीं। त्या खुनाच्या अंगांत माझं कांहीं तरी अंग असावं असं मला अप्रत्यक्षपणं कळवण्याचा तुमचा हेतु आहे का ? "

" छे, तसं नाहीं. " दांडेकरांस गप्प राहण्यास खुणावून रामसिंग मध्येंच म्हणाला, " त्यांचा तसा हेतु नव्हता. कारण जगांत अशा तऱ्हेचे योगायोग अनेक वेळां घडून येतात. "

" बरोबर; माझंसुद्धा तेंच म्हणणं आहे." मास्तर म्हणाले.

मधुकर संशयित वृत्तीनें त्या दोघांकडे आळीपाळीनें पाहूं लागला. परंतु त्यांनीं आपल्या चेहऱ्यावर मात्र कोणत्याही तऱ्हेचा विकार त्यांना दिसूं दिला नाहीं.

कांहीं वेळानें रामसिंगानें बोलण्यास सुरुवात केली, " रत्नमहालाच्या मुख्य दरवाजाची चावी फक्त गजाननरावांपाशींच असून त्यांनीं ती कधींच आपल्या ताब्यांतून जाऊं दिली नाहीं; तसंच ज्या लोहारानं ती किल्ली बनवली त्यानंही, तशी दुसरी किल्ली कधींच पुन्हा बनविली नाहीं हें शपथेवर सांगितलं. शिवाय त्या दरवाजाचं कुलुपही विशेष प्रकारचें असून त्याच्या किल्लीशिवाय दुसऱ्या कोणत्याही चावीनं तें उघण्यासारखं नाहीं. असं असतांना सरलाबाई त्या बंगल्यांत कशा गेल्या, हाच बिकट प्रश्न आहे ! रत्नमहालांतील सर्व मंडळी त्या वेळीं चौपाटीवर राहायला गेली होती हें तिला माहित कसं झालं, असं तुम्हाला वाटतं ?"

" तें मला कसं सांगतां येणार ? " मधुकर म्हणाला.

" सर्वच कांहीं गोंधळ आहे !" रामसिंग म्हणाला, " रत्नमहालाच्या मुख्य दरवाजाची चावी एकट्या गजाननरावांजवळ होती, हाच सर्वांत मुख्य मुद्दा आहे. अर्थातच त्यांच्याजवळून ती कुणींतरी नकळत घेऊन तिच्या ठशावरून तसली दुसरी चावी केली असली पाहिजे. किंवा—"

" किंवा काय ?"

" मी सांगतों." मास्तरसाहेब खिडकीजवळ उभे राहून मधून मधून त्यांचें संभाषण ऐकत होते, ते एकदम पुढें येऊन म्हणाले, " किंवा गजाननरावांनींच त्या स्त्रीचा खून करून रस्त्यावर भेटलेल्या पोलिस-हवालदाराला झुलवीत दूर नेलं असावं.—बिचारी सरला मात्र विना-कारण प्राणास मुकली. "

" पण " मधुकर शांतपणें म्हणाला, " तो मनुष्य हवालदाराकडे बोलत असतां दिवाणखान्यांत गाणं चालू होतं. अर्थात् तोंपर्यंत खून झाला नव्हता, हें तुम्हीं विसरलां वाटतं ! "

" मुळींच विसरलों नाहीं. " मास्तर जरा हेटाळणीच्या स्वरानें म्हणाले, " उलट अर्थी तो मनुष्य त्या हवालदाराला झुलवीत झुलवीत दूर नेत असतां व दिवाणखान्यांत गाणं चालू असतां त्या स्त्रीला

मरून तीन तास झाले होते, हें डॉक्टरनं सांगितलेलं माझ्या चांगलंच ध्यानांत आहे. ”

“ पण तो माणूस हवालदाराला झुलवीत नेत होता असं म्हणायला तुमच्याजवळ काय पुरावा आहे ? कांहींच नसणार ! रामसिंग, तुमचं म्हणणं काय आहे या बाबतींत ?”

रामसिंग आपली टिपणवही खिशांत ठेवून आपल्या जागेवरून उठून म्हणाला, “या गोष्टीवर अद्यापि उजेड पडत नाहीं. तथापि मी तो पाडण्याच्या आतां उद्योगासच लागणार आहें, व एखादा महत्त्वाचा शोध मला लागलाच तर आपल्याला मी अवश्य कळवीन. ”

“ पण तुम्ही आतां सुरवात कुठून करणार ?” मधुकरानें अस्वस्थपणें विचारलें.

“ मी प्रथम रत्नमहालाच्या मुख्य दरवाजाच्या किल्लीपासूनच सुरवात करणार ! त्याखेरीज तसली किल्ली दुसऱ्या कोणाजवळच नव्हती असं ते सांगतात; तेव्हां त्या रात्रीं ते काय करीत होते, हें प्रथम शोधून काढणार. ”

“ ते चौपाटीवर होते. ”

“ असं ते म्हणतात. ” रामसिंग म्हणाला.

“ आणि रमाबाईही असंच सांगतात.” मास्तर मध्येंच म्हणाले, “मला वाटतं त्या रात्रीं पोलिस शिपायाबरोबर बोलणाऱ्या टोंकदार दाढीवाल्या गृहस्थाला तुम्ही प्रथम हुडकून काढा.” रामसिंगाकडे वळून ते पुढें म्हणाले.

“ पोलिसांनीं एवढा प्रयत्न केला तरीही तो त्यांना शेवटीं मिळाला नाहीं. ” मधुकर शांतपणें म्हणाला, “ व तो यापुढं मिळेल असंही मला वाटत नाहीं.”

यावर मास्तर कांहीं बोलणार होते, परंतु तिनक्यांतच रामसिंग त्यांना ओढीतच दरवाजाकडे जाण्याकरतां निघाला, व आतां बाहेर पडणार, इतक्यांत रामसिंगाला कांहीं आठवण होऊन तो म्हणाला,

" मधुकरराव, आपण कधीं सरलाबाईच्या नवऱ्याला पाहिलं होतं का ?"

" छे, कधींच नाहीं. "

" बरं, त्याचा फोटो तरी ?"

" नाऽहीं. " मधुकरानें जरा अडखळतच उत्तर दिलें, " तो-सुद्धा नाहीं ! "

" बरं, येतों आतां. लवकरच पुन्हां येऊन त्या किल्लीविषयीं कांहीं तरी अधिक माहिती मी तुम्हांला सांगेन, " असें म्हणून रामसिंग मास्तरासह निघून गेला.

ते निघून जातांच मधुकर एका खुर्चीवर बसला व त्यानें आपलें मस्तक आपल्या दोन्ही हातांच्या तळव्यावर ठेवून हातांचे कोपरे पुढील मेजावर टेंकले. झालेल्या गोष्टीमुळें त्याचें डोकें अगदीं त्रासून गेलें होतें व त्याच्या मनासही फारच त्रास झाला होता. मेजावर हात टेंकून बसला असतां तो आपल्याच विचारांत इतका गढून गेला होता कीं, कोणीतरी दरवाजा उघडून आंत येऊन त्याच्या खांद्यावर हात ठेवी-पर्यंत त्याला समजलेंच नाहीं ! खांद्याला स्पर्श होतांच तो एकदम दच-कून उठून उभा राहिला. त्यानें वळून पाहिलें तो त्याच्या मागें नलिनी उभी होती !



प्रकरण १२ वें

# मधुकर व नलिनी

तें प्रणयी जोडपें बराच वेळ भीतीनें एकमेकांकडे पाहत राहिलें होतें. गेल्या प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें रामसिंग व दांडेकर मास्तर हे दोघेजण निघून जाते वेळीं झालेली मुद्रा नलिनीच्या अकस्मात झालेल्या आगमनामुळें, मधुकरास पुनः पूर्वस्थितीवर ताबडतोब आणतां आली नाहीं. तो तशाच स्थितींत तिजकडे पाहत राहिला. मागील एका प्रकरणांत लिहिल्याप्रमाणें, सांपडलेल्या रत्नखचित खंजीराच्या आधारावरून 'मधुकर हाच खुनी' असें रमाबाईनीं नलिनीच्या मनांत भरवून दिल्यामुळें, तिनें केलेलें विधान साफ खोटें अशी मनाची खात्री असतांनाही, केवळ संशयामुळें ती इच्छेविरुद्ध मनाशीं झगडत खऱ्याखोट्याचा निर्णय करण्यासाठीं या वेळीं मधुकराकडे आली होती.

" या वेळीं तूं इकडे येशील अशी माझी कल्पना नव्हती. " मधुकरानें बोलण्यास सुरवात केली, " तुझा चेहरा किती तरी काळवंडलेला व चमत्कारिक दिसतो आहे. बरं वाटतंय् ना तुला ?"

" आतां इथं कोणी माणसं आलीं होतीं वाटतं ?" त्याच्या प्रश्नास उत्तर न देतां तिनें प्रश्न केला.

" हो " या वेळीं त्यानें आपलें मन ताब्यांत आणलें होतें व त्याचा स्वर शांत होता. " जे दोघेजण आतांच ह्या खोलींतून बाहेर गेले त्यांपैकीं एकजण गुप्तपोलिस रामसिंग असून दुसऱ्याचं नांव दांडेकर–"

" दांडेकर ? " आपला खालचा ओंठ वरच्या दातांनीं घट्ट दाबून नलिनी एकदम ओरडली, " त्याला पाहतांच, हा चेहरा पूर्वी कुठं तरी पाहिला असावा असं मला वाटलं. " ती पुढें म्हणाली, " होय, तोच तो. मीं त्याला मावशीच्या घरींच एकदोन वेळ पाहिलं होतं. तो तिच्या वाडींतच असलेल्या एका लहान झोंपड्यांत राहत असतो. बहुतेक दर-दिवशीं तो वर्तमानपत्र अगर कांहीं तरी पुस्तक नेण्याच्या निमित्तानं मावशीकडे येतो–किती बाई त्याचा भयंकर चेहरा तो ! पाहण्याबरोबर मला तिटकाराच येतो ! "

तिचा त्या वेळचा आवेश पाहून मधुकराला अत्यंत आश्चर्य वाटलें.

" मलांसुद्धा तो माणूस बिलकुल आवडत नाहीं. " तो म्हणाला, " मी आज त्याला प्रथमच पाहत आहें. अशा तऱ्हेच्या त्या माणसाचं व माझं नातं असावं हें किती तरी विलक्षण, नाहीं ? "

" नातं ? नलिनी पुन्हा तेंच शब्द पुटपुटली, " होय, आतां मला आठवलं खरं. रत्नमहालांत खून झालेली स्त्री आपली मावसबहीण होती असं तो कमळाकरांना एकदा सांगत होता खरा. "

" खरं आहे. तिची आई आणि दांडेकरांची आई ह्या बहिणी-बहिणी होत्या. "

" आणि आपण तिचे चुलतभाऊ ना ?"

" होय. माझ्या काकांची ती मुलगी. "

" दांडेकर मास्तरांची मला नेहमी भीति वाटते." थोडा वेळ थांबून नलिनी म्हणाली, " शिवाय तुम्ही त्याच्या सुखाआड येतां आहां."

" कोण, मी ? तो कसा ? " मधुकरानें विचारलें.

" कसं तें आपल्या ध्यानांत नाहीं का येत ? मग आमची बायकी बुद्धि बरी म्हणायला हरकत नाहीं ! आपल्या मावसबहिणीचा आपणांस बरेच पैसा देण्याचा बेत आहे, हें त्यानं कमळाकरांना एकदा सांगितल्याचं मला आठवतं; पण त्याच्या अपेक्षेप्रमाणं तिनं त्याला कांहींच न ठेवून त्याची अगदीं निराशा केली व त्याऐवजीं आपणांस वार्षिक दहा हजारांचं उत्पन्न ठेवलं हें मला मावशीकडून समजलं, व

ही गोष्ट स्वतः मास्तरांनींच तिला कळवली होती. दांडेकर मास्तर अत्यंत गरीब असून त्यांची स्थिति हलाखीची आहे, अर्थात् इतक्या गरीब स्थितींतला माणूस अशा तऱ्हेनं आपलं नुकसान मुकाटयानं सोसून घेईल असं तुम्हांला वाटतं का ?"

"खरंच, माझ्या हें ध्यानांतच नाहीं आलं ! पण दांडेकरांची मला मुळींच भीति वाटत नाहीं." मधुकर म्हणाला. यानंतर कांहीं वेळ नलिनी स्तब्ध होती. नंतर तिनें एकदम प्रश्न केला, "माझ्यावर आपलं प्रेम आहे ना ?"

"म्हणजे, हें काय विचारते आहेस ? तुझ्याशीं केव्हां तरी मीं प्रतारणा केली आहे का ?"

"नाहीं. म्हणूनच मी हें धाडस करीत आहें." धडधडणाऱ्या हृदयानें नलिनीनें उत्तर दिलें, "हें पाहा काय तें !" असें म्हणून थरथरणाऱ्या आपल्या हातानें आपल्या वस्त्रांत लपविलेला तो रत्नजडित खंजीर बाहेर काढून तिनें भीतभीत विचारलें, "अगदीं खरं सांगायचं, हा आपला आहे का ?"

"होय. हा माझाच आहे." तिच्या हातीं तो खंजीर पाहून अत्यंत आश्चर्य वाटून तो म्हणाला, "आमच्या नव्या खेळाच्या दुसऱ्या अंकांत मी घेतों तोच हा खंजीर ! मीं हा तुला कधीं पूर्वी दाखवला नव्हता का ?"

"हो. पण तो खुनापूर्वी दाखवला होता." नलिनीचें हृदय अधिक धडधडूं लागलें.

ती काय बोलत आहे तें मधुकराला न समजल्यामुळें तो आश्चर्यचकित होऊन तिजकडे पाहतच राहिला.

"मला सर्व कांहीं सांगूं दे," तो पुढें म्हणाला, "कारण, तुला आज माझ्याविषयीं कसला तरी संशय येत असावा, हें तुझ्या असल्या चमत्कारिक भाषणावरून मला वाटत आहे. आज तूं काय बोलत आहेस तें मला तर समजत नाहींच, पण तुलाही तें कळत नसणार. कारण कुणाच्या तरी शिकवणीवरून हें तूं बोलत असावीस. ऐक. मध्यें

बोलूं नकोस. मागं तुला हा खंजीर दाखवल्यानंतर थोडयाच दिवसांनीं तो मजपासून हरवला, आणि—"

" हरवला नाहीं. त्या स्त्रीचा खून करून आमच्या स्वयंपाकघरांतील कोनाडयांत मुद्दाम फेकून दिला."

" नलि–नलि !" मधुकर आपलें मस्तक दोन्ही हातांनीं घट्ट दाबून निराशायुक्त स्वरानें ओरडला. थोडयाच वेळापूर्वी असलेला त्याचा शांत व निग्रही चेहरा नलिनीचे वरील शब्द ऐकतांच एकदम फिकट व घाबरट माणसाप्रमाणें दिसूं लागला. त्याचे पाय लटलटूं लागले. त्याचे लालभडक ओंठ एखाद्या क्षयरोग्याप्रमाणें कळाहीन व रक्तहीन दिसूं लागले. तेजःपुंज दिसणारी त्याची शरीरकांति एकदम कोमेजून गेली !

" नली ! नको ! अशी मजविषयीं निष्ठुर होऊ नकोस," बोलतां बोलतां त्याचे डोळे पाण्यानें भरून येऊन त्यानें आपला चेहरा दोन्ही हातांनीं झांकून घेतला.

" निव्वळ संशय ! प्रत्यक्ष प्रेमाच्या माणसाकडून असे शब्द ऐकण्यापेक्षां अधिक वाईट शब्द ते कोणते !" अडखळून त्यानें कसें तरी वाक्य संपविलें.

त्याची अशी स्थिति झालेली पाहून नलिनीला आपल्या निष्ठुर वर्तनाबद्दल अतिशय वाईट वाटलें. तिच्या डोळ्यांतील दोन कढत अश्रुबिंदु मधुकराच्या पायावर पडले.

" आपण निरपराधी आहां, खरंच आपण शुद्ध असून खुनाचा डाग आपणांस मुळींच लागलेला नाहीं !" नलिनी स्फुंदतच मधुकराजवळ आली व त्याच्या पुढयांत जमिनीवर गुडघे टेंकून तिनें त्याच्या गळ्यासभोंवतीं आपला करपाश घातला व आपलें मस्तक त्याच्या छातीवर ठेवून ती स्फुंदून रडूं लागली.

" आपण अगदीं निरपराधी आहांत. अशी माझी पूर्ण खात्री होती. "आपण खुनी, या शब्दावर मीं कधींच विश्वास ठेवला नाहीं व ठेवणारही नाहीं. आपलं मन दुखवलं म्हणून मला क्षमा करायची. नाहीं ना रागवायचं ? बोला ना गडे ! क्षमा केली म्हणेतोंपर्यंत आपले पाय

सोडणार नाहीं." असें म्हणून नलिनीनें खरोखरच त्याचे पाय धरून त्यांवर ती अश्रु ढाळूं लागली.

मधुकराचें मन द्रवलें. त्यानें तिला ताबडतोब उठवून जवळच असलेल्या एका खुर्चीवर बसविलें, व आपणही तिथल्याच एका खुर्चीवर बसून तिजकडे पाहत राहिला.

"आतां मला किनई, किती तरी हलकं वाटतं," खुर्चीवर बसल्यानंतर कांहीं वेळानें नलिनी उद्गारली. "मला आपल्याजवळ पुष्कळ बोलायचं आहे. आपण निर्दोषी आहां—"

"पण अजून तरी तुझी खात्री झाली का?" डोळे मिचकावीत मधुकरानें विचारलें.

"हिणवूं नका गडे असं! त्याबद्दल माझी अगदीं पूर्ण खात्री आहे." तिनें निश्चयी स्वरांत उत्तर दिलें. "मघांच्या आपल्या उत्तरानं इतरांना जरी कांहीं वाटणार नाहीं, तरी त्यामुळंच माझ्या अंतःकरणास, माझ्या सदसद्विवेकबुद्धीला आपल्या पूर्ण निरपराधीपणाची जाणीव झाली. पण माझा जरी आपल्यावर पूर्ण विश्वास आहे, तरी इतरांचा कसा बसणार? आपल्या नात्याकडे पाहून माझं म्हणणं कुणी खरं मानणार नाहीं. हा खंजीर—"

"कुठं मिळाला हा?" मधुकरानें तो खंजीर पाहत विचारलें; त्याची मुद्रा अद्यापि निस्तेज दिसत होती.

"आमच्या आचाऱ्याला स्वयंपाकघरांतील वरच्या एका कोनाडयांत हा मिळाला. त्याला हा मूल्यवान असेल असं वाटल्यामुळं त्यानं हा रमाताईस दाखवला; पण तिनं तो आपल्या मिनीस खेळण्यासाठीं घेतला होता, अशी त्याची खोटीच समजूत घालून त्याला वाटेला लावल्यावर मला बोलावून तो दाखवला व या खुनाच्या बाबतींत आपणच अपराधी आहां असं बोलून दाखवलं. आपला नवा खेळ तिनं पाहिला असल्यामुळं, दुसऱ्या अंकांत राजाचा खून करते वेळीं आपण असला खंजीर वाळगतां हें तिला ठाऊक होतं, म्हणूनच तिला एकदम आपला संशय आला. पण मीं तिचा जोरानं निषेध करून असं कधींही शक्य

नाहीं असं सांगून त्याच पावली इथं आलें." बोलत असतां नलिनीच्या मुद्रेवर राग, तिरस्कार, आवेश इत्यादि विकारांच्या छटा दिसूं लागल्या. तिचा कंठही बराच सद्गदित झाला होता. "आपण आतां मजपासून कांहीं एक लपवून न ठेवतां घडली असेल ती सर्व हकीकत मला सांगितली पाहिजे; कांहीं एक लपवूं नका. खुनाच्या रात्रीपासून मी आपणापासून मुद्दाम दूर दूर राहत होतें हें आपण जाणतांच. असं वागतांना माझ्या मनाला काय यातना होत होत्या त्या माझ्या मलाच माहित! पण आपणांस या प्रकरणांत कुणीं ओढूं नये म्हणून–म्हणून होतां होईल तों मी आपल्या दृष्टीसमोर येत नसें."

"होय." मधुकर तीव्रतेनें म्हणाला, "हें मला स्पष्ट दिसत होतं. त्या दिवशीं जेव्हां मी तुझ्या घरीं तुला भेटायला आलों होतों, तेव्हां तूं मला भेटण्याची टाळाटाळ केलीस, हें माझ्या नजरेंतून सुटलं नाहीं. माझ्या पत्रांचींही तूं उत्तरं पाठवलीं नाहींस. मला वाटलं तुला माझा संशय—"

"नाहीं! केव्हांही नाहीं." नलिनी एकदम मध्येंच म्हणाली, "आपला संशय येण्यास इतरांना जरी सबळ कारण आहे तरी मला आपला संशय कधींच येणार नाहीं."

मधुकर तिच्याकडे चकित होऊन पाहूं लागला. आपला संशय येण्यास सबळ कारण कोणतें तें त्याला समजेना. त्यानें कुतूहल दृष्टीनें तिजकडे पाहिलें.

"आपण मला रत्नमहालांत भेटण्याविषयीं लिहिलं होतं तें आपल्या स्मरणांत असेल." नलिनीनें म्हटलें.

"मी? केव्हां?" मधुकरानें प्रश्न केला. नलिनीच्या प्रश्नानें तो थिजूनच गेला.

"२४ जुलईच्या दिवशीं रात्रीं साडेनऊ वाजतां–म्हणजे ज्या दिवशीं त्या बिचारीचा खून झाला त्या रात्रीं."

"असं! नलू," मधुकरानें बोलण्यास सुरवात केली. या वेळीं त्याच्या शब्दांत पूर्णपणें गांभीर्य व चेहऱ्यावर उद्विग्नता पसरली

होती. " नलू ," तो पुढें म्हणाला, " मीं तर तुला कधींच बोलावलं नव्हतं. उलटं तूंच मला तसं लिहिलं होतंस, तें तू विसरलीस का? तूं पाठवलेलं—"

"काय ?" आश्चर्यचकित होऊन ती म्हणाली, " कांहीं तरी भयंकर घोटाळा झाला आहे यांत शंका नाहीं. आम्हां उभयतांना संकटांत लोटण्यासाठीं आपल्या भोंवतीं खांचखळगे तयार करण्यांत आले आहेत, कशीं जाळीं पसरलेलीं आहेत, याची आपल्याला कल्पना नाहीं. त्या दिवशीं रात्रीं साडेनऊ वाजतां भेटण्याकरतां म्हणून आपण मला पाठवलेलं पत्र अद्यापि माझ्या खिशांतच आहे. आपण त्या दिवशीं रात्रीं रत्नमहालांत आलां होतां, हा आपल्याविरुद्ध जाणारा पुरावा अजिबात नाहींसा व्हावा, यासाठीं मीं तें पत्र ताबडतोब जाळून टाकलं असतं; पण तें आपणांस दाखवून आपल्यास रत्नमहालाच्या मुख्य दरवाजाची किल्ली कशी मिळाली हें विचारण्यासाठीं मीं तें तसंच ठेविलं आहे."

" कां बरं ? ती चावी तूंच नाहीं का मला पाठवलीस ?" तो एकदम चकित होऊन म्हणाला, "तुला पुरावा हवाच असेल, तर तुझं पत्रही माझ्याजवळ आहे. पण—पण नंतर ती किल्ली कुठं हरवली."

" ती त्या दिवशीं रात्रीं पोलिसबरोबर बोलत असतांना तुम्हींच नाहीं का रस्त्यावर टाकली ? "

मधुकरानें नकारार्थी मान हालविली.

" पण, " तो पुढें म्हणाला, " तो माणूस मीच हें तुला कशावरून वाटतं ?"

" त्यांत एवढं कठीण तें काय आहे ? त्या पोलिसानं आपलं व आपल्या पोषाखाचं वर्णन केलं, विशेषतः त्याच्याबरोबर बोलणाऱ्या इसमाला लहानच टोंकदार दाढी होती असं जेव्हां सांगितलं, त्याच वेळीं ती बहुतेक आपलीच स्वारी असावी हें मीं ओळखलं. कारण, आपल्या नव्या खेळाच्या दुसऱ्या अंकांत खुनाच्या वेळीं आपण तसलाच वेष नाहीं का करीत ? आपण ठरवलेल्या वेळीं येण्याचा आपल्या हातून

होईल तेवढा प्रयत्न केलात, पण आपणाला कामामुळं रत्नमहालांत वेळीं येतां आलं नाहीं, होय ना? नंतर येण्याच्या धांदलींत आपण आपल्या रंगभूमीवरच्या वेशांतच व एकंदर नाटकी स्वरूपांतच रत्न-महालांत आलां, हें नंतर मला समजलं. येण्याच्या घाईंत तो वेष उतर-विण्याची आठवणसुद्धा इकडे झाली नाहीं, अं? " असें म्हणून नलिनी त्याच्या तोंडाकडे पाहूं लागली.

" असं जर आहे तर सरलेचा खून माझ्याच हातून झाला, असंही तुला वाटलं पाहिजे. कारण खून झाल्यानंतर तिथून—"

" नाहीं, नाहीं! " नलिनी त्याला एकदम थांबवून म्हणाली, " आपण रत्नमहालांत साडेनऊ वाजतां मुळींच आला नव्हतां; कारण त्या वेळीं मी आपलीच वाट पाहत रत्नमहालाच्या फाटकापाशीं उभी होतें. आपण पत्रांत लिहिल्याप्रमाणं, मी रत्नमहालांत येतांच, आपण आधींच आंत येऊन बसलां असाल ह्या समजुतीनं, आपण मला आंत घ्यावं म्हणून मीं किती वेळ तरी 'बेल' वाजवली. पण आंतून कुणींच माझ्या हाकेला उत्तर न दिल्यामुळं, थिएटरांतील कामामुळं आपणांस उशीर झाला असावा, असा मीं तर्क केला. अर्थात् ज्या अर्थीं सरला-बाईंचा खून नऊ वाजण्यापूर्वीं झाला होता, त्या अर्थीं आपण पूर्ण निरप-राधी आहां हें सिद्ध झालंच, नाहीं का?"

" नलू," मधुकरानें बोलण्यास सुरवात केली, "आतां मी तुला माझी सर्व हकीकत सांगतों. मग तुला, मी इतके दिवस तटस्थ कां राहिलों होतों तें समजून येईल. प्रथम मी तुझ्या पत्रापासून सुरवात करतों. तुझं मला आलेलं पत्र —"

" पण दुसऱ्या गोष्टींस सुरवात करण्यापूर्वीं प्रथम तें पत्र मला दाख-वायचं. मला तें एकदा नीट पाहूं द्या. आपण पाठवलेलं पत्र हें पाहा इथं आहे. " ती पत्र दाखवून पुढें म्हणाली, "आपली इच्छा असेल तर तें आपण पुन्हा एकदा वाचावं. तोंपर्यंत मी बाहेर जाऊन आपलं भाषण कुणी ऐकत आहे कीं काय तें पाहून येतें."

नलिनी टेहेळण्याकरतां बाहेर गेली. ती बाहेर गेल्यावर मधुकरानें आपल्या मेजांतून एक ( पत्र्याची पेटी ) बाहेर काढून तीमधून एक पत्र बाहेर काढलें, व तें नलिनीनें त्याला दिलेल्या पत्राजवळच उघडून ठेवून दिलें. आजूबाजूस राहून आपलें भाषण कोणीही ऐकत नाहीं याची खात्री करून जेव्हां नलिनी आंत आली तेव्हां त्यानें तिला तिचें पत्र दाखवून म्हटलें,

" हें पत्र मी मुळींच लिहिलेलं नाहीं." तो खात्रीच्या स्वरानें पुढें म्हणाला, " कुणीं तरी माझ्या अक्षराची हुबेहुब नक्कल करून हें तुला पाठवलं आहे."

" आणि आपण माझं पत्र जें म्हणतां तेंहीं मी लिहिलं नसून असंच नकली आहे." नलिनी त्या दोन्ही पत्रांकडे पाहत आश्चर्यानें म्हणाली, "अहाहा, काय पण अक्षर काढलं आहे !" ती उपहासात्मक स्वरांत पुढें म्हणाली, " तो मेला माझ्यासारखं लिहायचा प्रयत्न करीत होता, पण किती तरी ठिकाणीं चुकला आहे. सही मात्र कशी ती हुबेहुब माझ्या सही सारखी केली आहे. पण पत्रांतला शेवटला मजकूर तर अगदींच गचाळ लिहिला आहे. ऊं:, नक्कल कांहीं इतकी चांगली साधली नाहीं."

" पण हें शेवटीं काय लिहिलं आहे तें पाहिलंस का ? " मधुकर त्या पत्रांतीळ एका ओळीवर बोट ठेवून म्हणाला, " 'पत्र घाईनं लिहिल्यामुळें अक्षराला हसूं नये,' असं त्यानं लिहिल्यामुळं मला या पत्राचा कसलाच संशय आला नाहीं. कारण तुझं प्रत्येक वेळचं अक्षर नीट व सुरेख असतं; पण या शेवटच्या वाक्यावरून, तूं घाईंत असल्यामुळं असं अक्षर काढलं असावंस, असा विचार करून या पत्राच्या खरेखोटेपणाविषयीं मीं विचारच केला नाहीं व तसं कारणही नव्हतं; एरव्ही तुझ्या अक्षराचं वळण त्याला बरंच साधलं आहे, यांत संशय नाहीं."

" एँ. मी पत्र नेहमी नीट लिहितें. कितीही गडबडींत असलें तरी असं गचाळ कधींही लिहीत नाहीं. शिवाय असलं घाणेरडं पत्र पाठवा-यला मला किती तरी लाज वाटली असती. पत्राचा नोटपेपर मात्र यानं थेट माझ्या नोटपेपरसारखाच घेतला आहे."

" पण आपल्या पत्राबद्दल संशय घ्यायला मात्र बिलकुल जागा नाहीं हं." ती किंचित् काल थांबून मधुकराच्या पत्राकडे नजर वळवीत म्हणाली, " आपले खेळ ज्या थिएटरांत होतात तिथूनच हें आलेलं असून शिवाय बाहेरील पाकिटावर व आंतील नोटपेपरवरसुद्धा आपलं छापील नांव आहे. मग बाई आपल्या पत्राबद्दल संशय तरी कसा घ्यावा ? हें मला शरयूच्या घरीं पोस्टमननं आणून दिलं."

" आणि हें तुझं म्हणून मला २४ जुलई रोजीं दोन प्रहरीं आमच्या घरवाल्यानं आणून दिलं. यांतच रत्नमहालाच्या मुख्य दरवाजाची किल्ली होती."

" यांतून ती किल्ली आपणांजवळ आली ? आपण म्हणतां तरी काय ?" अत्यंत आश्चर्यचकित होऊन नलिनीनें प्रश्न केला.

" प्रथम हें तूं वाचून पाहा, मग तुझी खात्री पटेल." असें म्हणून मधुकरानें तें नलिनीच्या हातीं दिलें.

पत्र पुढीलप्रमाणें होतें:— " २४ जुलई—

C/o सरोजिनी आ. भवाने,

माटुंगा, मुंबई.

आपणापाशीं मला अत्यंत महत्त्वाच्या व जरूरीच्या अशा कांहीं गोष्टी बोलावयाच्या असल्यामुळें मी आपणांस हें पत्र लिहीत आहें. म्हणून आज रात्रीं साडेनऊ वाजतां रत्नमहालांत येऊन मला अवश्य भेटण्याचें करावें. हल्लीं रमाताई वगैरे सर्व मंडळी चौपाटीवर राहावयास गेली असल्यामुळें बंगला बाहेरून बंद आहे. यासाठीं, तो आपणास उघडून आंत जातां यावें म्हणून सोबत मुख्य दरवाजाची चावी मी भाउजींकडून घेऊन पाठवीत आहें. मला तिथं येण्यास कदाचित् उशीर होईल. याकरितां किल्ली आपणाजवळ पाठवीत आहें. तरी आल्याशिवाय राहूं नये. विशेष भेटीवर ठेवतें.

पत्र घाईनें लिहिल्यामुळें अक्षराला हंसूं नये.

सर्वस्वी आपलीच,

**नलिनी** "

" यापैकीं एक अक्षरही मीं लिहिलेलं नाहीं," पत्र वाचून होतांच नलिनी म्हणाली, "तसंच ती चावीसुद्धा मीं पाठवलेली नाहीं. ह्या पत्रांत लिहिल्याप्रमाणं भाउजी आणि रमाताई त्या वेळीं चौपाटीवर राहायला गेलीं होती खरीं, पण भाउजींनीं रमाताईच्या धाकामुळं ती चावी मज-पाशीं केव्हांही दिली नसती. आणि तीं जोंपर्यंत चौपाटीवर होतीं तों-पर्यंत मी रत्नमहालाच्या आसपाससुद्धा फिरलें नाहीं. त्या वेळीं मीं मावशीकडे राहायला गेलें होतें हें आपणांस माहीत असेलच."

नलिनीला आलेलें पत्र कांहींसें अशाच प्रकारचें होतें. त्यांत " कांहीं जरूरीच्या गोष्टींविषयीं बोलावयाचें असल्यामुळें रात्रीं साडे नऊ वाज-ण्याच्या सुमारास रत्नमहालामध्यें अवश्य येऊन भेट; तूं येण्यापूर्वीच मी तेथें जाऊन तूं दरवाजाबाहेरील 'बेल' वाजवितांच तुला आंत घेईन. आजच्या नाटकांतील माझें काम दुसऱ्या एका पात्रावर सोंप-विल्यामुळें मला जाण्यास कोणतीच हरकत राहणार नाहीं–" वगैरे मजकूर लिहिलेला असून खालीं मधुकराच्या सहीची हुबेहुब नक्कल केली होती.

" हीं पत्रं लिहिणारा मनुष्य मोठा धूर्त आणि कावेबाज आहे यांत शंका नाहीं." मधुकर त्या पत्रांकडे पाहत म्हणाला, " त्यानं हीं दोन्हीं पत्रं तुला व मला संध्याकाळच्या वेळीं पाठवलीं. अर्थात् त्यानंतर तुला व मला रात्रींच्या ठरलेल्या वेळाखेरीज भेटणं शक्यच नव्हतं. हाच त्याचा कावा, व खरं काय तें त्याच वेळीं समजायचं. आम्हां उभयतां-नाही तोंडघशीं पाडण्याच्या विचारांत तो होता. काय घोटाळा आहे, काय नाहीं, तें कांहीं सांगवत नाहीं."

" पण आपण रत्नमहालांत खरंच आलां होतां का ?" नलिनीनें विचारलें.

"होय, त्या रात्रीं मी रत्नमहालांत आलों होतों." मधुकरानें उत्तर दिलें. " मॅनेजरची परवानगी घेऊन घरीं येतांच मीं प्रथम माझं जेवण आटोपलं. पुढील गोष्टीविषयीं मी विचार करीत असतां, मला केव्हा झोंप लागली तेंच समजलं नाहीं. जागा होतांच घड्याळाकडे पाहिलं,

तों नुक्तेच नऊ वाजून गेले होते. यावरून मला फार वेळ झोंप लागली असावी असं वाटतं. नेहमींच्या माझ्या संवईप्रमाणं वास्तविक मी केव्हांच जागा व्हायचा. पण त्याच दिवशीं कशी ती झोंप लागली. तरीही मला रत्नमहालांत वेळींच हजर राहतां आलं असतं, पण कपडे करून मी बाहेर पडतों न पडतों तोंच मॅनेजरकडून मला अत्यंत निकडीचं बोलावणं आलं. ज्याला तो माझं काम करायला लावणार होता, तोच मनुष्य त्या दिवशीं अकस्मात आजारी झाल्यामुळं त्या दिवसाचं माझं काम मलाच केल्याशिवाय गत्यंतर नव्हतं. नाइलाजानं मला माझं काम करावं लागलं. अर्थात् खेळ खलास होईपर्यंत मला बाहेर पडणं शक्यच नव्हतं. तुझी मूर्ति माझ्या डोळ्यांसमोर असल्यामुळं त्या दिवशीं माझ्या हातून माझं नेहमीचं कामसुद्धा उठावदार झालं नाहीं. तुला भेटण्याची मला इतकी उत्कंठा लागली होती कीं खेळ आटोपतांच, रंगभूमीवरील पोषाकसुद्धा न उतरतां मी तसाच गाडी करून पंधरावीस मिनिटांत रत्नमहालांत येऊन थडकलों. तूं कदाचित् भेटणार नाहींस, असं मला वाटत होतं, पण आशा ही वेडी आहे. "

"अग बाई ! आपण रत्नमहालापर्यंत गाडी आणली होती ?" नलिनीनें प्रश्न केला.

" नाहीं. तुझ्या हितासाठीं आपली भेट गुप्त राखावी असं मला वाटल्यामुळे दहाबारा घरं अलीकडे गाडीवाल्याला सोडून मी रत्नमहालांत पायींच आलों. त्या वेळीं आसपास कोणीही चिटपाखरूं नव्हतं. मी तसाच बागेंत शिरलों; पण तूं कांहीं मला तिथं दिसली नाहींस. नंतर मी बाहेर वेळ न घालवितां मजजवळ असलेल्या चावीचा उपयोग करून बंगल्यांत शिरलों. बरीच रात्र होऊन गेली असल्यामुळं तूं येऊन गेली असावीस अशी माझी पूर्ण खात्री झाली होती. पण कदाचित तूं एखादं पत्र अगर निरोप आंत लिहून ठेविला असल्यास तो पाहावा, या हेतूनं मी बंगल्यांत शिरलों. शिवाय मी बागेंत शिरलों त्या वेळीं दुसऱ्या मजल्यावर दिव्यांचा चांगला चकचकाट होता. त्यामुळं तूं कदाचित् वरही असशील असाही दुसरा विचार माझ्या मनांत आला.

तुला बराच वेळ तिष्ठत ठेवल्यामुळं मला वाईटही वाटलं. म्हणून मी खालीं अधिक वेळ न दवडतां जिथं ते दिवे पेटलेले होते त्या सफेत दिवाणखान्यांत एकदम शिरलों. पण आंत कुणीच नव्हतं. दिवाण-खान्यांतील एका कोपऱ्यांत मात्र उघडलेल्या बाजाच्या पेटीवर झोंपल्या-प्रमाणं डोकें टेकून खुर्चीवर बसलेली एक स्त्री मला दिसली. ती जिवंतच आहे असं मला प्रथम वाटलं; पण जवळ जाऊन पाहतों तों ती मृत स्थितींत होती. एवढंच नव्हे, तर ती माझी चुलत बहीण सरला आहे असं मला आढळून आलं. तिचा प्राण गेला असून तिच्या गळ्याच्या मागील बाजूनं वाहत असलेला रक्तप्रवाह सुकून गेलेला होता. हा देखावा पाहतांच माझ्या डोळ्यांसमोर अंधेरी येऊन, मी मट-कन शक्तिपात झाल्याप्रमाणं खालींच बसलों. माझ्या लाडक्या बहि-णीची—माझ्या सरलेची अशी दुर्दशा झालेली पाहतांच मला एकदम दु:खाचा उमाळा आला. खरोखर त्या वेळच्या माझ्या स्थितीचं वर्णन करायला एखादा कादंबरीकारही असमर्थ होईल. मी तिच्या शांत दिस-णाऱ्या चेहऱ्याकडे किती तरी वेळ शून्य दृष्टीनं पाहत होतों. त्याच वेळीं पोलिसास बोलावून आणून तिचा बळी घेणाऱ्या दुष्टाचा मागमूस लावावा असं माझ्या मनांत आलं होतं. पण असं केल्यास ते कदा-चित् मजवरच उलटायचे इतकंच नव्हे, तर तुझ्यावरही संशय घ्यायला पुरावा आहे असा विचार करून भीतीनं मीं तो बेत रद्द केला.

"फार वेळ त्या जागीं राहणं मला शक्य नव्हतं. आधीं तिकडून काढता पाय घ्यावा, मग पुढचा विचार, याच विचारांत मी होतों. कारण या गोष्टीचा सुगावा लागतांच पोलिसखातं अपराधी म्हणून मलाच जबाबदार धरल्याशिवाय राहतं ना. शिवाय नात्यानं मी तिचा चुलतभाऊ असून रत्नमहालाची मुख्य चावी माझ्यापाशीं होती, हे माझ्याविरुद्ध असणारे भक्कम पुरावे पोलिसांना आयतेच मिळाले असते. प्रेतवत् पडलेल्या माझ्या सरलेला सोडून जातांना माझं मन द्विधा झालं. तिला त्या स्थितींत टाकून मला तेथून जाववेना. पण परिणामाकडे लक्ष देऊन, मन घट्ट करून, मला तिथून शक्य तितक्या लवकर निघणं भागच होतं.

शेवटीं मनाचा हिय्या करून मी खालीं बागेंत आलों. बरोबर त्याच वेळीं तो पोलिस बागेंत डोकावून पाहत होता. त्याच्याचबरोबर बोलत बोलत वर्तमानपत्रांत प्रसिद्ध झाल्याप्रमाणं मी तिथून निसटलों. मात्र त्याच्याबरोबर बोलत बोलत जात असतां, माझ्याजवळ असलेली रत्नमहालाची चावी मात्र कुठं हरवली. मी माझ्या नाटकी वेषानं तिकडे गेलों होतों, हें एका अर्थी ठीकच झालं म्हटलं पाहिजे. कारण त्याचमुळं मला अद्याप कुणीही ओळखूं शकला नाहीं, व पोलिसबरोबर बोलणारा इसम मीच, हेंही कुणाच्याही ध्यानीं येण्यासारखं नाहीं."

बोलतां बोलतां मधुकराच्या सर्वांगास दरदरून घाम सुटला आणि त्याचे डोळे आरक्त झाले. बोलण्याच्या आवेशाच्या भरांत तो त्या खोलींत येरझारा घालूं लागला.

"हें कृत्य कोणीं केलं असावं अशी तुमची समजूत आहे?" नलिनीनें विचारलें.

"नाहीं," मधुकर थोडा वेळ विचार करून म्हणाला, "मी कुणाचा कसा बरं संशय घेऊं? सरला जरी माझी बहीण होती, तरी तिचा संबंध येणाऱ्या इतर माणसांची मला फारच थोडी माहिती आहे. मी जेव्हां जेव्हां म्हणून तिला भेटण्यासाठीं जात असें त्या त्या वेळीं फक्त आमच्या अशाच मौजेच्या गप्पा चालत असत. पण ज्या अर्थी तिनं आपली सर्व मिळकत मलाच दिली आहे, त्या अर्थी तिचा बळी घेणाऱ्या दुष्टाचा शोध करण्याचा प्रयत्न मला केलाच पाहिजे. नलू, मला वाटतं, दांडेकर मास्तरांनाही माझाच संशय येत असावा. त्याला माझाच संशय कां येतो तें मला कांहीं सांगतां येत नाहीं. अर्थात् मीं त्या रात्रीं रत्नमहालांत गेलों होतों, वगैरे कांहींच हकीकत त्याला माहित नसावीशी दिसते. त्यानं ह्या खुनाचा तपास करण्याकरतां रामसिंगाला माझ्याकडे आणिलं होतं व माझ्यावर त्याचा संशय असल्यास तो दूर व्हावा, या हेतूनं मला रामसिंगाला ह्या तपासाच्या कामावर नेमावं लागलं."

"अरेरे! आपण केवढी बरं चूक केलीत ही?" नलिनी घाबऱ्या स्वरानें म्हणाली, "रामसिंग दुष्ट अंतःकरणाचा दिसतो."

" होय; हा मूर्खपणा जरी मीं केला तरी तो माझ्याच फायद्याकरतां आहे, म्हणूनच केला. रामसिंगाची मला मुळींच भीति वाटत नाहीं. जरी कदाचित् मी त्या रात्रीं बंगल्यावर गेलों होतों, असं त्याला आढळून आलं, तरी मीं त्याचा हात चांगला दाबतांच तो कांहीं एक बोलायचा नाहीं. कारण तो फक्त पैशाचा भुकेलेला असावा असं मला आजच्या त्याच्या वर्तनावरून आढळून आलं. त्याला जर कांहींच उमगलं नाहीं, तर माझ्या मागची पीडाच गेली. पण मला काय वाटतं तें त्या मास्तरांचं ! "

"आपण त्या मास्तराला कसलाच पत्ता लागूं देतां नये. रामसिंगाला शोध लावूं दे. जर त्याला खरी गोष्ट समजली तर ठीकच होईल. मग आपल्याला संशयानं झुरायला नको. पण त्या खंजिरासंबंधानं काय? तो तिथं कसा आला तें आपण मला सांगितलं नाहीं ! "

"तो माझा आहे. त्या दिवशीं मीं तो तुला दाखवला, व नंतर सरलेला जेव्हां भेटायला गेलों, त्या वेळीं तिला दाखवण्याकरतां तो नेला. पण फिरून येते वेळीं मी तो तिथंच विसरून आलों. मला वाटतं, तिनंच येते वेळीं रत्नमहालांत तो आणला असावा. कां तें परमेश्वर जाणे!"

" कांहीं हरकत नाहीं. आपण निर्दोष आहांत. आपला निरपराधीपणा मी सिद्ध करीन. आपण या कामावर रामसिंगाला नेमलंच आहे. मीही कमलाकरांच्या मदतीनं माझ्या हातून होईल तें करीन. "



## प्रकरण तेरावें

# शोध

अनेक प्रकारचे उद्योगधंदे करून शेवटीं एकांतही यश न मिळवितां रामसिंगानें आजपर्यंत दिवस काढले होते. शेवटीं गिरगांवांत एक लहानशी खोली घेऊन तिच्या मानानें बऱ्याच मोठ्या आकाराची पाटी त्यानें दारावर लाविली होती. मोठ्या अक्षरांत त्या पाटीवर "रामसिंग डिटेक्टिव" हीं अक्षरें लिहिलीं होतीं. दांडेकर मास्तर हें त्याचें पहिलें गिऱ्हाईक होय.

सरलेची सर्व मिळकत मधुकराला मिळाल्यामुळें साहजिकच त्याला मधुकराचा संशय आला, व त्या दिशेनें शोध करण्यास त्यानें प्रारंभ केला. मधुकर ज्या नाटककंपनींत काम करीत असे, त्या कंपनीचीं नाटकें प्रथम पाहण्याचा त्यानें बेत केला. आतांपर्यंत त्यानें त्या कंपनीचीं दोनतीन नाटकें पाहिलीं होतीं. मधुकर करीत असलेल्या भूमिका तो विशेष लक्षपूर्वक पाहत असे. पण अद्याप त्याला महत्त्वाचा असा कांहींच शोध लागला नव्हता.

आज कंपनीचा नवा खेळ असल्यामुळें रामसिंग तेथें उपस्थित झाला होता.

खेळास सुरवात होऊन एक अंक होऊन गेला. त्या अंकांत रामसिंगास विशेष आकर्षक असें कांहींच वाटलें नाहीं. तो अंक जवळजवळ कंटाळवाणाच झाला. मधुकर दोन तीन वेळां रंगभूमीवर येऊनही गेला. परंतु रामसिंगाला हवें तें मिळेना. तेव्हां आतां मात्र तो निराश होऊन,

आपल्या चाललेल्या क्रमांत खंड पाडण्याचा विचार त्याच्या मनांत डोकावूं लागला. परंतु दुसऱ्या अंकांत मात्र त्याला विशेष चित्ताकर्षक भाग आहे असें वाटूं लागलें. त्या अंकांतील देखावेही मनोवेधक होते. त्या अंकाच्या शेवटीं मात्र रामसिंगास पाहिजे होतें तें एकदम मिळालें. खुनाच्या रात्रीं पोलिसाबरोबर बोलत जाणाऱ्या मनुष्याच्या पोषखासारखाच पोषाख त्या वेळीं मधुकराच्या अंगावर होता. पोलिसाला झुलवीत नेणाऱ्या माणसाचें वर्णन रामसिंगानें वर्तमानपत्रांत वाचलें होतें. त्यामुळें त्याच्या व चालू नाटकांतील मधुकराच्या वेषांत बरेंच साम्य आहे, असें त्याला आढळून आलें इतकेंच नव्हे, तर त्याच्याप्रमाणें या वेळीं मधुकरालाही हनुवटीवर लहानच व टोंकदार दाढी होती, हें विलक्षण साम्य पाहतांच रामसिंगाच्या डोक्यांत एकदम प्रकाश पडला. जर रामसिंग कसलाही हेतु मनांत न धरतां नुसतें नाटक पाहण्याच्याच निमित्तानें आला असता, तर त्याच्या ध्यानांत वरील गोष्ट केव्हांही आली नसती. परंतु तो त्या विशिष्ट हेतूनेंच नाटक पाहण्याकरतां आला असल्यामुळें, त्या रात्रीं पोलिसाबरोबर बोलत राहणारा मनुष्य आणि त्याच्या डोळ्यांसमोर रंगभूमीवर असलेला मधुकर ही एकच व्यक्ति आहे, अशी त्याची पूर्ण खात्री झाली. रामसिंगानें दुसऱ्याच दिवशीं संध्याकाळीं दांडेकर मास्तरांची भेट घेतली.

दांडेकर मास्तर व रामसिंग यांचें भेटण्याचें ठराविक ठिकाण म्हणजे एक हॉटेल होतें. खुनाच्या बाबतींत रामसिंगानें नवीन शोध काय लाविले आहेत हें कळण्यास ते अत्यंत उत्कंठित होत असत. दर दिवशीं ठराविक वेळीं ते त्या हॉटेलांत चहा घेण्यासाठीं जात व रामसिंग तेथें त्यांना भेटत असे. आज आल्यावरोबर रामसिंगानें मधुकराविषयीं सर्व माहिती मास्तरांना सांगितली.

"मग त्या रात्रीं पोलिसबरोबर बोलत राहणारा माणूस मधुकरच होता, यांत शंका नाहीं." आपलेंच म्हणणें खरें करण्याच्या उद्देशानें मास्तर म्हणाले, "याविषयीं तुमचा काय तर्क आहे ?"

" होय. मलासुद्धा असंच वाटतं. खरं कारण त्या मनुष्याच्या पोषाखाचं वर्णन व नव्या खेळाच्या दुसऱ्या अंकांतील मधुकरचा वेष हीं सर्वथैव जुळतात; पण त्या रात्रीं पोलिसाबरोबर बोलणारा तो मधुकरच होता कीं काय, ही अद्याप शंका आहे. आणि या शंकेच्या निवारणार्थ मी आज इथं त्यांच्याच कंपनींतल्या एका माणसाला बोलावलं आहे– हा पाहा तो आलाच !"

आंत आलेला तरुण दिसण्यांत वराच इष्कबाज, व डौली असा दिसत होता. तो, मधुकर ज्या नाटककंपनींत होता तींत नांव व द्रव्य हीं दोन्ही कमावण्याकरतां दाखल झाला होता. परंतु त्यापैकीं एकावरही त्यानें अजूनपर्यंत स्वामित्त्व गाजविलें नव्हतें, व त्याच्या सदा सुस्त दिसणाऱ्या चेहऱ्यावरून व धिम्या स्वभावामुळें पुढेंही त्यानें नांवलौकिक केला असता कीं नाहीं, ही शंकाच होती.

आंत येतांच त्या नवागत तरुणानें रामसिंगाशीं प्रेमानें हस्तांदोलन केलें व ताबडतोब गंभीर मुद्रा धारण करून व लटकेंच थोडेंसें स्मित करीत समोरच बसलेल्या मास्तरसाहेबांसही नमस्कार केला. आणि एवढा औपचारिक विधि आटोपल्यावर जवळच असलेली खुर्ची घेऊन स्वारी रामसिंगाच्या शेजारीं विराजमान झाली.

"गोकूळ, तुम्हांला बरंच काम पडत असेल, नाहीं?" त्याच्याकरितां आणखी कांहीं खाद्येपय मागवून, बोलावयास सुरवात करण्याच्या हेतूनें रामसिगानें विचारलें.

" होय तर. " गोकुळानें उत्तर केलें, " काम फार पडतं खरं. पण पहिल्या प्रतीचं काम मिळेल तरच या श्रमांचं चीज. सध्या मी दुय्यम नोकर म्हणून आहें. "

" पण तुम्हांला इथं पहिल्या प्रतीचं काम मिळतं, असं मी ऐकत होतों. " रामसिंगानें फिरून प्रश्न केला.

"छे हो! उगाच कोणी तरी गप्प दिली असेल,झालं! ज्या वेळीं मधुकरराव गैरहजर अगर आजारी पडतील, त्याच वेळीं फक्त मला त्यांचं काम

करायला मिळतं. पण असा प्रसंग क्वचित्, जवळ जवळ मुळींच नाहीं म्हटला तरी चालेल. फक्त एकदाच तशी वेळ आली होती." रामसिंगानें कोणत्या हेतूनें प्रश्न केला हें न समजल्यामुळें गोकूळानें सांगण्यास सुरवात केली, "पण–पण माझं दुर्दैव त्या वेळीं आड आलं, त्याला काय करणार? तो आलेला योग मीं गमावला."

"खरं कीं काय?" रामसिंगानें एकदम विचारलें, "तो कसा काय?"

"तो दिवस कोणता, तें कांहीं मला आतां आठवत नाहीं." गोकुळानें सांगण्यास सुरवात केली, "पण त्या दिवशीं मधुकररावांना बरं वाटत नसल्यामुळं त्यांचं काम आमच्या मॅनेजरनं माझ्यावर सोंपवलं. मॅनेजरचे शब्द ऐकतांच मला इतका आनंद झाला, कीं मीं त्या भरांत परमेश्वराला शतशः धन्यवाद दिले. पण दैव बलवत्तरच पडलं! त्या दिवशीं आमचा नवा खेळ लागला असल्यामुळं मला काम करायला विशेषच हुरूप येऊन पडदा उघडून स्टेजवर केव्हां एकदा जाईन असं झालं होतं. पहिल्या अंकांत मीं कामही केलं व तें सुरेख वठलं असं माझे इतर नटमित्र मला सांगत होते. पण पहिल्याच अंकांतलं माझं काम संपतं न संपतं तोंच एकाएकीं मला ताप भरून आला. पुढं यायची माझी सगळी आशा नष्ट झाली. मी आजारी पडतांच मॅनेजरनं त्याच क्षणीं मोटर धाडून मधुकररावांना धरून आणवलं. ते घरीं न भेटल्यामुळं मीच त्यांचं काम करणार, अशी मी शेवटपर्यंत आशा बाळगली. पण कर्मधर्मसंयोगानं म्हणा, किंवा आमच्या दुर्दैवानं म्हणा, ते घरींच होते."

"पुढं?" गोकुळानें क्षणभर घेतलेली विश्रांति सहन न होऊन रामसिंगानें विचारलें.

"पण तोही आजारीच होता का?" मास्तर मध्येंच बोलले.

"नाहीं. त्यांनीं आपण आजारी असल्याचं आम्हांला सांगितलं खरं, पण त्यांच्या चेहऱ्यावरून तरी ते कांहीं आजारी दिसत नव्हते. इतकंच नव्हे, तर बोलावतांक्षणींच त्यांनीं थिएटरांत येऊन आपलं

कामही केलं. त्या दिवसासारखं उत्तम काम त्यांच्या हातून केव्हांच झालं नाहीं म्हणतात. "

" दुसरा अंक केव्हां सुरू होतो ? "

" जवळ जवळ नऊ वाजायच्या सुमाराला.—"

"आणि त्याच वेळीं मधुकर थिएटरांत आले ?"

" नाहीं, दुसरा अंक सुरू होण्यापूर्वी अर्धा तास म्हणजे अजमासें साडेआठांच्या सुमाराला ते नाटकगृहांत आले. " गोकुळ चहाचा घोट घेत म्हणाला.

" तेव्हां त्या दिवशीं थिएटरांत येण्यापूर्वी आजाराच्या निमित्तानं ते घरीं मोकळेच होते तर ? "

" घरीं होते किंवा कुठं बाहेर होते तें कांहीं मला सांगतां येणार नाहीं; पण तोंपर्यंत ते थिएटरांत आले नव्हते, इतकं मात्र खरं. " गोकुळ म्हणाला.

" पण हें कोणत्या दिवशीं घडलं, तें मला नक्की सांगाल का ? " दांडेकरांनीं एकदम मध्येंच प्रश्न केला.

"आतां तो दिवस कोणता असावा तें कांहीं माझ्या पक्कं ध्यानांत नाहीं. तरी—" गोकुळ डोकें खाजवीत म्हणाला, "हं, आतां साधारण आठवतं. मला वाटतं, त्या दिवशीं जुलैची २४ तारीख असावी. होय. बरोबर तोच दिवस अगदीं."

गोकुळानें सांगितलेली तारीख ऐकतांच दांडेकर मास्तर व रामसिंग यांनीं एका विशिष्ट नजरेनें व खुणेनें एकमेकांकडे पाहिलें. परंतु गोकुळ खाण्यांत गुंतला असल्यामुळें त्याला त्यांची झालेली नजरानजर समजली नाहीं. त्यानंतर मधुकरासंबंधानें अगर रत्नमहालांतील खुनासंबंधानें विशेष संभाषण असें कांहींच झालें नाहीं. थोडया वेळानें गोकुळ तेथून निघून गेला.

"आतां तरी तुम्हांला काय वाटतं ?" गोकुळ निघून गेल्यानंतर दांडेकरांनीं रामसिंगास प्रश्न केला.

"काय वाटतं ? त्या रात्रीं आपलं काम करायला मधुकर गेला नव्हता हें एक; दुसरं, पोलिस हवालदाराला झुलवीत झुलवीत रत्न-

महालापासून दूर नेणाऱ्या इसमाच्या अंगावरील वस्त्रांप्रमाणंच त्याच्या नव्या खेळांत त्याचीं वस्त्रं असतात. इतकंच नव्हे, तर तशी टोंकदार दाढीही तो लावतो. शिवाय दुसऱ्या अंकांत राजाचा खून करण्याकरतां त्याच्यापाशीं एक रत्नजडित असा खंजीर असतो, त्याचाही त्यानं कदाचित् उपयोग केला असावा."

"अहो, केला असावा काय ? केलाच मुळीं असं म्हणा !" मास्तर आपली मूठ जोरानें पुढ्यांतील मेजावर आपटून त्वेषानें म्हणाले, "कारण तो खून खंजिरासारख्या एका तीक्ष्ण शस्त्रानंच करण्यांत आलेला आहे, असं चौकशीच्या वेळीं डॉक्टरनं प्रतिपादन केलेलं आहे. मधुकराजवळ तसला खंजीर असतो, आणि संध्याकाळचे सहा आणि रात्रीचे नऊ या दरम्यान तो थिएटरांत हजर नव्हता, हें आपणांस नुक्तंच गोकुळाकडून समजलं. यावरून तो खून मधुकरानंच केला, हें सहज अनुमान करतां येण्याजोगं आहे. याशिवाय आणखी एक बळकट पुरावा पाहिजे असेल, तर तो खून सहा आणि नऊ या दरम्यान झाला, असं डॉक्टरनं मत दिलेलं आहे, हाच होय. तसंच, गजाननरावांची व त्याची चांगली ओळख असल्यामुळं रत्नमहालाची किल्ली त्यानं आगाऊ घेऊन ठेवली असावी हें तिसरं प्रमाण."

" पण ती किल्ली आपणापासून कधींच गेलेली नाहीं, अशी चौकशीच्या वेळीं गजाननरावांनीं शपथ घेतली होती, त्याचं काय ? "

" ए: ! अशा खोट्या शपथा पाहिजे तेव्हां वाटेल तितक्या घेतां येतात. !"

" तें खरं," रामसिंग आपल्या जाग्यावरून उठून म्हणाला, " पण ज्या अर्थीं मधुकरानं आपल्या पदरचे पैसे देऊन खऱ्या खुनी इसमाचा शोध लावायचं काम माझ्यावर सोंपवलं आहे, त्या अर्थीं त्याला गोत्यांत आणण्याचं कर्म मी कधींही करणार नाहीं. जर मीं त्याला खरी हकीकत कळवली तर तो वाटेल तितके पैसे खर्च करून माझं तोंड बंद केल्याशिवाय राहणार नाहीं."

"नाहीं, नाहीं. असं केव्हांही होतां कामा नये." मास्तर ठाम निश्चय दर्शवून म्हणाले, " जर मधुकर खरा अपराधी आहे तर त्याला शिक्षा झालीच पाहिजे."

" अं हं, तुम्ही सर्व कांहीं आतां माझ्यावर सोंपवा. यापासून मला जितके पैसे उकळतां येतील तितके मी उकळणार." रामसिंगानें निश्चयी मुद्रेनें उत्तर दिलें.

अर्थात् रामसिंगाच्या इच्छेविरुद्ध जाण्याचें धैर्य मास्तरांच्या अंगीं नव्हतें. त्यांनीं विषय बदलण्याच्या हेतूनें एकदम दुसराच प्रश्न केला,

" पण तुम्ही ही जी इतकी माहिती मिळवलीत त्यासाठीं पैसे कुठून आणलेत ?"

" मधुकराच्या सॉलिसिटरपासून. मला या कामांत अंदाजें लागतील तितके पैसे द्यायला त्यानं कादर याला कळवलं आहे. मीं तावडतोब कादरकडे जाऊन त्याच्यापासून पन्नास रुपये मिळवले. सुरवातीस एवढे पैसे पुरेत."

" ठीक, आतां पुढं तुम्ही काय करणार ?"

" मी आतां मधुकराच्या घरवाल्याला भेटून त्याला यासंबंधानं कांहीं माहिती आहे कीं काय याचा तपास काढणार."

"मला वाटतं, तुम्हीं असं न करतां मी सांगतों तसं कराल तर बरं होईल." मास्तर थोडा वेळ थांबून विचार करून म्हणाले, " त्या घरवाल्याची दूरची एक नातलग सीता म्हणून आहे, तिची व माझी चांगली ओळख आहे. तेव्हां तुम्हीं घरवाल्याजवळ कांहीं एक चौकशी न करतां तिलाच सर्व कांहीं विचारा. ती बहुत करून तिथंच असेल; शिवाय रत्नमहालाची मालकीण रमाबाई हिची ती Companion आहे. त्यांच्या घरच्या बहुतेक हकीकती तिला माहित असतात."
मास्तरांनीं दिलेल्या माहितीचा उपयोग करण्यासाठीं दुसऱ्या दिवशीं दोन प्रहरीं तीन वाजण्याच्या सुमारास तो मधुकराच्या घराजवळ गेला. मधुकराला भेटण्याची त्याची मुळींच इच्छा नव्हती. परंतु त्याच्या घरवाल्याची अगर त्याजकडे मधून मधून दोनप्रहरीं येणाऱ्या सीतेची व

त्याची कोणाशींच ओळख नसल्यामुळें, त्याला प्रथम मधुकराच्याच चौक-शीस जाणें योग्य वाटलें. मधुकराच्या खोलीजवळ जातांच, त्याचा घर-वाला, कोणी मधुकराची चौकशी करण्यास आला आहे असें पाहून अर्थातच पुढें आला.

" ते माटुंग्याच्या बाजूस गेले आहेत." रामसिंगाच्या प्रश्नास घर-वाल्यानें उत्तर दिलें, "थोडक्यासाठीं तुमची व त्याची चुकामूक झाली; आपलं नांव रामसिंग ना ? "

" हो " किंचित हंसून रामसिंग म्हणाला, " पण आपणाला कसं कळलं मझं नांव ? "

"ए: ! त्यांत एवढं तें कठीण काय ?" घरवाला मोठया ऐटीनें आपली मान तुकवून म्हणाला, "आमच्या सीताबाईची व दांडेकर मास्तरांची चांगलीच ओळख आहे. अहो, नुसती ओळखच नव्हे तर त्याहूनही ते पुढं गेलेले आहेत. लवकरच ते तिच्याशीं लग्नही करणार आहेत. ते मास्तर तुमचे मित्र असूनही तुमचं नाव मला कळू नये ? "

" बरोबर आहे आपलं म्हणणं. दांडेकर मास्तर माझे अगदीं परम स्नेही आहेत व सीताबाईविषयींही मला त्यांनीं सांगितलं."

" आमच्या सीताबाईला एकदाचा चांगला नवरा मिळाला म्हणजे आम्हीं तिला एवढं वाढवल्याचं सार्थक झालं; खरं कीं नाहीं ? बाकी पाहूं गेल्यास तिच्यासारखी सुस्वभावी व चांगली स्त्री मिळायची नाहीं हो ! "

" यांत काय संशय ? " कसंही करून आपणास सीताबाईशीं बोला-वयास मिळावें या हेतूनें रामसिंग घरवाल्याची खुशामत करण्याच्या हेतूनें बोलूं लागला, " शिवाय मास्तरांची पत्नी झाल्यानंतर मास्तरीण-बाई ही पदवी आपोआपच त्यांना मिळणार आहे."

" मास्तराविषयीं आपणांला चांगलीच माहिती आहे का ? "

" मी तर त्यांचा जीवश्चकंठश्च स्नेही."

" अरे वा ! मग तुम्हीही आमचेच झालां तर," रामसिंगाच्या गोड भाषणाला भुलून आनंदानें तो घरवाला म्हणाला, "पण तुम्ही असे

बाहेर उभे कां ? असे आंत येऊन बसा ना ? थोडंसं चहापाणी घेऊन जा. सीता सध्या इथंच आहे. ती पाहील चहाचं !

" आपण आग्रहच करतां त्या अर्थी मला आलंच पाहिजे. " रामसिंगानें उत्तर दिलें.

अशा रीतीनें स्वतःच्या अटकळीपेक्षां किती तरी लवकर रामसिंगाचा त्या घरांत शिरकाव झाला. त्याला दिवाणखान्यांत बसवून तो घरवाला सीतबाईस–नव्हे मास्तरसाहेबांच्या भावि वधूस चहा करण्याविषयीं सांगण्यास आंत गेला.

थोड्याच वेळांत एका हातांत चहाचा पेला व दुसऱ्या हातांत कांहीं फराळाचे पदार्थ ठेविलेली बशी घेऊन सीतेनें प्रवेश केला.

आपणांस भेटावयास आल्याबद्दल प्रथम आनंद प्रदर्शित करून तिनें चहा व फराळाचें साहित्य रामसिंगापुढें ठेविलें. प्रथम इकडचीं तिकडचीं औपचारिक प्रश्नोत्तरें झाल्यावर तिनें रामसिंगापाशीं मास्तराविषयीं चौकशी करण्यास सुरवात केली. जें हवें होतें तें आयतेंच पुढें चालून आल्यामुळें रामसिंगाला आनंद झाला.

"त्यांची सांपत्तिक स्थिति कशी काय आहे हो ?" सीतेनें प्रश्न केला.

" सध्या तरी कांहीं फारशी चांगली नाहीं, " रामसिंग म्हणाला, " पण कांहीं दिवसांनीं, मला वाटतं, त्यांची गणना मुंबईच्या बड्या लोकांत होईल. निदान कांहीं हजारांला तरी भीति नाहीं. "

" अगदीं खरं ना हें पण ? " आपल्या मनांत मांडे खात थोडीशी लडिवाळपणानें व खुशींत येऊन सीतेनें प्रश्न केला, " मी मग किती तरी सुखी होईन, नाहीं हो ? मग लग्न झाल्यावर आम्ही एका मोठ्या जागेंत राहायला जाऊं. त्या रत्नमहालांत राहण्याचा मला तर आतां मेला अगदीं कंटाळा आला आहे बघा. तसा कांहीं मला त्रास नाहीं हो ! तिकडचीं माणसं किती तरी चांगली आहेत. पण आतां नोकरी तरी मेली किती करायची !

" तुम्ही रमाबाईकडेच असतां, नव्हे ? " रामसिंगानें विचारलें.

" होय. पण मी जरी तिकडे नोकर म्हणून आहें तरी ती मला आपल्या बहिणीसारखी वागवते. " सीतेनें उत्तर दिलें, " आपल्या सर्व कांहीं गोष्टी ती मला कळवते. मग त्या कितीही गुप्त असेनात ! "

" म्हणजे त्यांचंही कांहीं गुह्य आहे कीं काय ? "

सीतेनें एकदम आपली जीभ चावली. आपल्या नकळत आपल्या तोंडून भलतेच शब्द बाहेर पडले हें पाहून ती अत्यंत खजील झाली. रामसिंगासारख्या माणसाला त्या गोष्टी कळाव्या हें तिला न आवडून ती म्हणाली,

" असतील. पण मी त्या कधींही बाहेर फोडणार नाहीं, समजलं का ? आणखी ती जें कांहीं मला करायला सांगते तें मी पूर्ण विश्वासानं करतें. "

रामसिंगाची निराशा झाली. मूर्खपणानें रमाबाईच्या कांहीं गोष्टी ती आपणांस कळवील असें त्याला प्रथम वाटलें होतें. परंतु ती एकदम स्तब्ध झाली. रमाबाईसारख्या अभिमानी स्त्रीनें हिला काय कामें करावयास सांगितली असावींत याची त्याला कल्पना होईना. तथापि तें तिला विचारण्याचा हा समय नव्हता. कारण ती पूर्ण सावध असल्याकारणानें तिनें रामसिंगाला त्या बाबतींत कसलाही थांग लागूं दिला नसता. त्यामुळें त्यानें आपल्या भाषणाचा ओघ एकदम दुसरीकडेच वळविला.

" खुनानंतर तुम्हांला रत्नमहालांत राहायला आवडतं का ? " त्यानें प्रश्न केला.

" खुनाची गोष्ट अगदीं काढूं नका. " सीताबाई आपलें अंग थरारून म्हणाली, " त्या गोष्टीची आठवण झाली कीं माझ्या छातींत धडधडायला लागतं. शिवाय अत्यंत आश्चर्य म्हणजे तो खून कोणीं केला हें कुणालाच कळत नाहीं."

" तुम्हालासुद्धा ? "

" अर्थात्‌च." सीता खात्रीच्या स्वरानें म्हणाली, " त्या वेळीं मी रमाबाईबरोबर चौपाटीवर असल्यामुळं रत्नमहालांतील घडामोडी मला कळणं शक्य नव्हतं."

" तिचे इतर नौकरही तिथंच होते ? " रामसिंगानें विचारलें.

" तिचे सर्व नोकरलोक चांगले आहेत. त्यांचा संशय घेण्याचं कारण नाहीं. तो गोविंदा, तिचा आचारी–तर मोठा मजेदार प्राणी आहे. त्या दिवशीं तर त्यानं मोठी गंमतच उडवली.

" कोणती ती ? " कांहीं तरी असेंच असेल अशा समजुतीनें राम-सिंगानें सहज विचारलें. सीताबाईनें त्या दिवशीं रत्नमहालांत घडलेली रत्नजडित खंजिराची हकीकत सांगितली.

" तो खंजीर त्याला स्वयंपाकघरांतील कोनाड्यांत सांपडला. मोठी गंमतच केली त्यानं ! त्या मूर्खाला त्यावरचे खडे खरे वाटले ! पण रमाबाईनं तेव्हां त्याला ते खडे खोटे असून तो खंजीर आपण आपल्या मुलीला खेळायला घेतला होता असं सांगितलं, तेव्हां त्याचे डोळे उघडले."

" पण रमाबाईनीं तो विकत घेतला ही गोष्ट खरी ?"

" नाहीं. मला तर ती गोष्ट खोटी व बनावट वाटते. मग काय असेल तें असो. "

रामसिंगानें त्या खंजिराचें वर्णन विचारतांच सीतेनें तें सरळपणानें सांगितलें. त्यानंतर विशेष कांहीं घडलें नाहीं. चहापान होऊन रामसिंग जावयास उठला. परंतु जाते वेळीं, तो खंजीर मधुकराचाच असून त्यानेंच खून केल्यानंतर तो कोनाड्यांत दडवून ठेवला याची त्यानें आपल्या मनांत खूणगांठ बांधली.



प्रकरण १४ वें

# कमळाकराची तयारी

" या ! मधुकरराव, या ! मला नव्हतं वाटलं आपण साहेबाप्रमाणं वक्तशीर असाल असं."

"पण आपण कां बरं इथं बोलावलंत ? तें जाणण्याच्या जिज्ञासेनंच मला इतक्या लवकर इथं आणलं.

कमळाकर व मधुकर या दोघांमध्यें वरील प्रश्नोत्तरें झालीं. मधुकर एके दिवशीं आपल्या घरीं असतांना कमळाकराचें एक पत्र त्याला मिळालें. त्यांत त्यानें मधुकराला कांहीं कामाकरितां म्हणून लोणावळ्यास 'शांतिगृहांत' बोलाविलें होतें. कमळाकरानें कोणत्या कामासाठीं बोलाविलें असावें, याचा तर्क मधुकराला होईना. परंतु कांहीं तरी तसल्याच महत्त्वाच्या कामाकरितां त्यानें आपणांस बोलाविलें असावें म्हणून त्यानें तिकडे जाण्यांत बिलकुल दिरंगाई केली नाहीं.

" दुसरं कशासाठीं बोलावणार ? सध्या मुंबईच्या वातावरणांत दुमदुमत असणाऱ्या त्या एकाच गोष्टीपुरता केवळ आपला संबंध या वेळीं आहे. पुढं दुसऱ्या गोष्टीचा संबंध येईल ती गोष्ट वेगळी. पण आपण आपला सध्यापुरता विचार करूंया." कमळाकर मधुकराला बसावयास खुर्ची देत व आपणही जवळच एका खुर्चीवर बसून म्हणाला, " तुम्ही कधीं तिच्या नवऱ्याला—किनखाप्यांना पाहिलं होतं का ? "

" छे ! कधींच नाहीं."

" ते व्यापारी होते व नेहमी दौऱ्यावर असत असं मीं ऐकलं होतं. त्यांचा दौरा तरी कुठल्या बाजूस असे हें तरी माहित आहे का ? "

" नाहीं व तें विचारण्याचीही इच्छा कधीं मला झाली नाहीं. पण व्यापाराच्या निमित्तानं त्यांना केव्हां केव्हां महिनेच्या महिने बाहेर घालवावे लागत व त्यामुळं विचाऱ्या सरलेला मात्र एकांतांत बसून दिवस घालवण्याची पाळी येत असे, हें मात्र खरं."

" तिला कांहीं मूलबाळ होतं का ? "

"नाहीं. तिचं लग्न होऊन पांचसहा वर्षं झाली होतीं, तरी तिला मूल झालं नाहीं. आणि खरं सांगायचं, म्हणजे सरलाही आपल्या नवऱ्याविषयीं अभिमानानं अगर विशेष कळकळीनं बोलत असल्याचं आढळून येत नव्हतं. कारण आपला नवरा आपणापासून कांहीं तरी लपवून ठेवीत असावा, असा तिला संशय येत होता, नव्हे,—तिची जवळ जवळ तशी खात्रीच होती. "

कमळाकरानें आपल्या सिगारेटकेसमधून एक सिगारेट काढून मधुकरास दिली व दुसरी आपण ओढूं लागला. हवेंत धुराचे फवारे सोडीत असतांना त्याच्या मनांत कोणते तरी विचार चालले असावेत असें दिसलें.

" हो. माझाच तर्क बरोबर असावा, यांत शंका नाहीं." एक लांबच लांब दाट असा धुराचा लोट हवेंत सोडून तो थोड्या वेळानें म्हणाला, " ह्या किनखाप्यांसंबंधानं कांहीं तरी गूढ असावं असं मला वाटतं बुवा ! ते ज्या अर्थी आपल्या पत्नीला आपले हितसंबंध कळवीत नसत, तिजपासून कांहीं तरी चोरून ठेवण्याचा त्यांचा यत्न असे, त्याअर्थी ते मोठे विलक्षण मागूस असावेत यांत शंका नाहीं. तुला नाहीं असं वाटत ? कारण मनुष्य कोणत्याही धंद्यांत पडणारा असला, तरी लग्नानंतर आपल्या पत्नीला एकटंच मागं ठेवून कैक महिनेच्या महिने देशांतरीं फिरत राहील असं मला तरी वाटत नाहीं. शिवाय आज सरलेचा खून होऊन इतके दिवस होत आले, तरी ते तिची चौकशी करायलासुद्धा इथं आले नाहींत. त्यांना अंतःकरण आहे कीं नाहीं हेंच मला समजत नाहीं ! "

"आपणां दोघांशिवाय इथं आतां कुणीही नाहीं." कमळाकर विषय बदलून म्हणाला, "तेव्हां तुम्ही आतां अगदीं स्पष्टपणें व मनमोकळे-पणानं बोलायला सुरवात करा."

"कशाविषयीं?"

"तुमची मला माहिती—"

"माझीही तुमच्या बाबतींत तीच इच्छा आहे." मधुकर कमळा-करास पुरतें बोलूं न देतां मध्येंच म्हणाला.

"उं:, त्यांत कांहींच नाहीं." कमळाकर पुन्हा एकदा धुराचा मोठा फवारा वातावरणांत सोडून म्हणाला, "नलिनीच्या सांगण्यावरून तुम्हाला मदत करण्यासाठीं मी इथं आलों आहें."

"म्हणजे! मला मदत? ती कसली? तुमचं बोलणं अद्यापि माझ्या लक्षांत आलं नाहीं."

"कळेल. लवकरच कळेल. शरयू माझी वाग्दत्त वधू आहे हें तुम्हांला माहित असेलच आणि आपल्या नलिनीची ती जीवश्चकंठश्च मैत्रिण आहे. आलं का आतां लक्षांत सर्व? तुम्हाला ग्रासूं पाहणाऱ्या संकटरूपी राहुकेतूपासून आपलं रक्षण करण्याला आम्हांला बाईसाहे-बांची व नलिनीची आज्ञा झाली आहे."

कमळाकराचें बोलणें ऐकून मधुकर तर अगदीं थक्क झाला.

"तुम्ही माझं रक्षण करूं म्हणतां तें कोणत्या बाबतींत? कोणत्या राहुकेतूनं मला ग्रासलं आहे?" त्यानें थोडया वेळानें विचारलें.

"आतां आपण मित्राच्या नात्यानं बांधले गेलों आहोंत, तेव्हां एक-वचनच वापरतों, बरं का?" कमळाकर म्हणाला, "तुझ्याविषयीं सर्व कांहीं मला नलिनीनं सांगितलं आहे. तुझ्याभोंवतीं विणल्या गेलेल्या जाळ्यांतून बाहेर काढण्यास तिला कुणा तरी जिव्हाळ्याच्या माण-साची मदत हवी झाली. मग सांग पाहूं, माझी मदत तिनं घेतली ही तिची चूक आहे का?"

"काय!" आश्चर्याचा झटका आल्यामुळें आपल्या जाग्यावरून उठून मधुकर म्हणाला, "नलिनीनं तुम्हांला—!"

" सर्व कांहीं सांगितलं. " कमळाकरानें त्याचें वाक्य तितक्याच शांत वृत्तीनें पुरें केलें. "माझ्या शरयूची अगदीं जिवाभावाची मैत्रिण ना ती? मग तिचं हित तेंच आम्हां सर्वांचं हित नव्हे का? मीं विचारल्या-वरून तिनं कांहीं एक लपवून न ठेवतां सर्व कांहीं मला सांगितलं. तूं त्या रात्रीं रत्नमहालांत कसा गेलास, तसंच स्वयंपाक्याला मिळालेला तो रत्नजडित खंजीर वगैरे सर्व माहिती मला तिनं दिली, पण तेवढयावरूनच भागण्यासारखं नाहीं. तिच्या हकीकतींतून राहून गेलेले कांहीं भाग तूं मला सांगितले पाहिजेस."

ही हकीकत ऐकून मधुकरास बरें वाटलें नाहीं. कमळाकरासारख्या त्रयस्थ माणसानें आपल्या भानगडींत पडावें हें त्याला रुचलें नाहीं. परंतु कमळाकराचा तो प्रेमळ, कपटहीन निस्पृह व कळकळीचा असा चेहरा पाहतांच त्याच्या मनांतील हे विचार पार नाहींसे झाले. कृतज्ञतेच्या भावनेनें त्यानें कमळाकराचे दोन्ही हात आपल्या हातीं घेऊन म्हटलें, " खरं आहे. कमळाकर, तुझी मदत घेण्याशिवाय मला आतां गत्यंतर नाहीं. पण–पण हें खुनाचं गूढ उकलण्याकरतां मीं एका रहस्यभेदकाची नेमणूक यापूर्वींच केली आहे."

" आणि तें मला माहित आहे. मधुकर, तुझ्या त्या गुप्तपोलिसा-पेक्षांही मी तुला निरपेक्ष व मनापासून मदत करीन. मात्र तूं मजवर पूर्ण विश्वास ठेवून मजपासून कांहींही चोरून ठेवतां कामा नये."

"पण आतां मला तुला विशेष असं कांहींच सांगण्यासारखं राहिलेलं नाहीं; कारण तें काम नलिनीनं पूर्वींच केलं आहे."

" एँ ! बायकांच्या आणि पुरुषांच्या सांगण्यांत किती तरी फरक असतो. हकीकत सांगते वेळीं नलिनी इतके हुंदके देत होती कीं, तिच्या शब्दांचा मला नीटसा बोध झाला नाहीं. तेव्हां माझ्यावर विश्वास ठेवून जें कांहीं घडलं असेल तें सरळ मनानं सांगून टाक. ईश्वर तुला यांतून खात्रीनं सोडवील."

" पण–पण मजवर असला कांहीं तरी गहजब होईल असं तुला वाटतं का ? "

" ऐकलेल्या हकीकतीवरून तरी मला तसं वाटतं खरं. "

" पण मी alibi दाखवली तरी ? "

" शाबास ! तीच कशी दाखवशील, ती सांग पाहूं."

" ती अशी. त्या रात्रीं नऊ वाजेपर्यंत मी माझ्या खोलींत झोंपूनच होतों. आणि त्यानंतर मी थिएटरांत गेलों. तिचा खून झाला तो आठ आणि नऊ या दरम्यान झाला असल्यामुळं मी तिथं नव्हतों हें सिद्ध होणार नाहीं का ? "

" तें खरं. " कमळाकर म्हणाला, " पण त्यांनंतर तूं रत्नमहालांत गेला होतास; तसंच तिच्या मृत्यूमुळं तिच्या दौलतीचा तुझ्याकडे येणारा वारसा, शिवाय नाटकांत तूं वापरतोस तो तुझा खंजीर, इत्यादि पुरावे तुझ्याविरुद्ध जाणार नाहींत का ?"

" पण–पण कमळाकर, मी अगदीं शपथपूर्वक सांगतों कीं, तिला रत्नमहालांत मीं प्रथम पाहिली ती प्रेतवत स्थितींत पाहिली."

" मग त्याच वेळीं तूं ही वर्दी पोलिसांत कां दिली नाहींस ? "

" कारण तो देखावा पाहतांच माझी मति अगदीं गुंग होऊन काय करावं तें मला सुचेना. " मधुकरानें त्रासून उत्तर दिलें.

" इथंच चुकलं. " कमळाकर मान हालवून म्हणाला, " जर त्याच वेळीं तूं पोलिसाला बोलावून आपण रत्नमहालांत कां व कसे आलों, आल्यानंतर तो प्रकार कसा दृष्टीस पडला वगैरे हकीकत स्पष्टपणें कळवली असतीस तर आज तुला कसलीच भीति नव्हती."

" पण हा कोण या वेळीं आम्हांला त्रास द्यायला आला बुवा ! " दरवाजा बाहेर कोणी तरी ठोकलेला ऐकून कमलाकर ओरडला.

"कोणी तरी बाहेर आलं असेल. " असें म्हणून मधुकरानें बाहेर जाऊन दरवाजा उघडला. दरवाजांतच रामसिंगाला पाहून त्या दोघांनाही अत्यंत आश्चर्य वाटलें.

" कोण ? रामसिंग ! " असा आश्चर्योद्गार दोघांच्याही तोंडून एकदम बाहेर आला.

थोड्याच वेळांत रामसिंगाची स्वारी कमळाकर होता त्या जागेपाशीं येऊन थडकली. त्यानें त्या वेळीं पूर्ण साहेबी थाटाचा पोशाख केला असून त्याच्या तोंडांत एक भला थोरला चिरूट जळत होता. आंत येतांच मधुकर व कमळाकर या दोघांना तेथें असल्याचें पाहून त्यानें अत्यंत आश्चर्य दर्शविलें.

"काय! तुम्हीही इथंच आहांत का?" तो साश्चर्य म्हणाला, "तुम्हीं या वेळीं इथं असाल अशी माझी मुळींच कल्पना नव्हती. खरोखर विलक्षण योगायोग आहे हा! मी सहज ही जागा तपासण्याकरतां आलों होतों. काय हो कमळाकर, तुम्ही इथं कसे?" कमळाकराकडे वळून त्यानें विचारलें.

"अंऽअं!! तुम्हांला माझं नावंही ठाऊक आहे!" कमळाकरानें दचकून विचारलें.

"उं:, त्यांत एवढं आश्चर्य तें कोणतं? एकदा मी मास्तरांच्या घरीं असतांना तुम्हीं कुणा मुलीबरोबर बोलत त्यांच्या दारावरून चालला होतां, त्या वेळीं मला त्यांनीं सांगितलेलं तुमचं नांव माझ्या ध्यानांत आहे."

"हो. हेंही खरंच. एकूण तुम्ही मला ओळखतां तर! alright. मी इथं कां आलों तें सांगतों. ह्या गुन्ह्याचा तपास लावायचं काम मीं हातीं घेतलं आहे, म्हणून मी त्याच कामाकरतां याला इथं घेऊन आलों आहें."

रामसिंगाची मुद्रा जरा त्रासिक दिसूं लागली, व त्यानें प्रश्नसूचक दृष्टीनें मधुकराकडे पाहिलें.

"पण तुम्हीं हें काम माझ्याकडे सोंपवलं आहे, मधुकरराव." तो थोड्या वेळानें थोड्याशा कुत्सित शब्दांत म्हणाला.

"मग, नाहीं कोण म्हणतो?" मधुकराला बोलण्यास अवसर न देतां त्याच्या आधींच कमळाकरानें सुरवात केली, "त्यानं तुम्हांला नेमलं आहे यांत किमपिही शंका नाहीं. पण तुमच्यांत व माझ्यांत एवढाच

फरक आहे कीं, तुम्ही हें काम पैशामुळं करीत आहां, पण मी तेंच काम हौसेनं करीत आहें."

" पण—कोणाच्याही मदतीशिवाय काम करायचा माझा निश्चय आहे." रामसिंग जरा घुश्शांतच म्हणाला.

" मग तो अढळच ठेवा. तुमच्या निश्चयाच्या आड यायची माझी मुळींच इच्छा नाहीं. तुमचा समज थोडा चुकीचा झाला. आम्हीही आमच्या इच्छेप्रमाणं नव्या धर्तीवर व अगदीं स्वतंत्र रीतीनं कामाला लागणार आहोंत. यावर तुमची कांहीं सूचना ?"

रामसिंग तरी यावर काय बोलणार ? मनांतला राग आंतल्या आंतच जिरविण्याखेरीज त्याला गत्यंतरच नव्हतें. तो मुकाट्यानें मधुकराकडे वळून म्हणाला,

" रावसाहेब, केलेल्या कामाचा तपशील आतां तुमच्याजवळ द्यावा अशी तुमची इच्छा आहे का ?"

" होय. माझी तयारी आहे." मधुकरानें उत्तर दिलें. रामसिंगाची खवळलेली वृत्ति पाहून त्याला मनापासून संतोष होत होता.

" पण तुमच्या एकट्यापाशींच तो सांगण्याची माझी इच्छा आहे."

मधुकरानें कमळाकराकडे पाहिलें.त्यानेंही कुचेष्टेनें आपले खांदे उडविले.

" वहोत अच्छा !" त्यानें मधुकराच्या मूक प्रश्नास उत्तर दिलें, " तुमचं चालूं द्या, तोंपर्यंत मी आपला बागेंत जरा फेरफटका करून येतों." तो बाहेर पडतांच रामसिंगानें आपले ओंठ कडकडून चावले.

" हं रामसिंग, करा सुरवात आतां."

" तुमचा मजवर विश्वास नाहीं का ?" रामसिंगानें बोलण्यास सुरवात केली. तो या वेळीं मधुकराकडे कुढ्या नजरेनें पाहत होता.

" तो कसा ?" मधुकरानें विचारलें.

" तुम्हांला कदाचित् तसं वाटत असेल." रामसिंगानें सांगण्यास सुरवात केली, " पण सध्या तुम्ही कोणत्या संकटांत आहांत, हें तुम्हाला माहित आहे का ? मास्तरसाहेबांची काकदृष्टि तुम्हांला मिळालेल्या पैशांवर खिळलेली आहे. तुम्हांला ती मिळालेली त्यांच्यानं

पाहवत नाहीं. म्हणून कांहींना कांहीं तरी कुरापत काढून तो तुमच्यावर खटला करूं पाहत आहे."

"तसं करणं त्याला अशक्य होईल. कां बरं? तुम्हांला तो त्या बाबतींत त्रास देतो का?"

"तो मला स्वतःला मदत करायला सांगत आहे." रामसिंगानें घुम्या आवाजांत उत्तर दिलें, "पण ज्या अर्थी मी तुमचा नोकर आहें, त्या अर्थी मी तुमच्याच बाजूनं नेहमीं राहणार. तुमच्यापाशीं जितका पैसा आहे तितका त्याजपाशीं नाहीं."

"ठीक." मधुकरानें उडत उडतच उत्तर दिलें. "पुढं?"

"त्याला आपल्याविरुद्ध पुराव्याच्या बऱ्याच गोष्टी माहित आहेत." रामसिंग थोडा वेळ थांबून आपल्या बोलण्याचा मधुकराच्या चेहऱ्यावर काय परिणाम होतो हें पाहूं लागला. थोडया वेळानें त्यानें विचारलें,

"त्या रात्रीं पोलिसशिपायाबरोबर बोलत उभे राहणारे तुम्हींच नाहीं का? बंगल्याच्या मुख्य दरवाजाची किल्लीही तुमच्यापाशींच होती."

"हें तुम्ही कशावरून म्हणतां?" मधुकरानें शांतपणानें विचारलें.

"प्रत्यक्ष पुराव्याशिवाय मी हें कांहीं बोलत नाहीं." असें म्हणून रामसिंगानें आपणास असलेली सर्व माहिती मधुकराला सांगितली.

"त्या मास्तराला हें सर्व माहित झालं?" मधुकरानें थोडया वेळानें प्रश्न केला.

"होय. या सर्व गोष्टी माहित झाल्यापासून मास्तरसाहेबांची स्वारी ही बातमी पोलिसांत देण्याकरतां अत्यंत उतावीळ झालेली आहे; पण त्यांना मीं अजूनपर्यंत समजूत घालून थोपवून धरलेलं आहे."

"या बाबतींत तुमचं काय मत आहे, रामसिंग?" थोडया वेळानें तो म्हणाला.

"खुनासारखं निर्दय कृत्य तुमच्या हातून घडलेलं असेल असं मला वाटत नाहीं."

"तुम्ही म्हणतां तें बरोबर आहे." आपल्या मुद्रेवर उसनें हास्य आणून मधुकर म्हणाला, "तुमच्या कल्पनेप्रमाणं मी खरोखर निरपराधी आहें. कारण तिचा खून नवांपूर्वी झाला असं डॉक्टर सांगतात."

"होय. डॉक्टराचं तसं म्हणणं आहे खरं."

"आतां तुम्हीं जर माझ्या घरवाल्याला जाऊन विचाराल, तर तुम्हाला मी आपल्या घरीं नऊ वाजून जाईपर्यंत झोंपून होतों असं समजून येईल. पण त्यानंतर थिएटरांतील एक नोकरच मला थिएटरांत बोलावण्याकरतां आला. माझा हस्तक एकाएकीं आजारी पडल्यामुळं तें काम करायला ताबडतोब येण्याविषयीं मॅनेजरनं मला विनंती केली होती. त्या माणसाबरोबरच मी नाटकगृहांत गेलों."

"होय, तें मला माहित आहे. पण त्यानंतर तुम्ही तिकडे गेलां होतां ?"

"होय, नलिनी बंगल्यांत माझी वाट पाहत असेल, या समजुतीनं मी बंगल्यांत गेलों; पण तो भयंकर प्रकार नजरेस पडतांच, तिचा खून मींच केला या आरोपावरून कदाचित् मला पकडतील, या भीतीनं मी तसाच बाहेर पडलों. तो खंजीर तिथं कसा आला याचं तुम्हांला आश्चर्य वाटत असेल. त्या खंजीराची हकीकत अशीः—सरलेचा खून होण्यापूर्वीं कांहीं दिवस मी तिला भेटायला गेलों असतां तो खंजीर तिला दाखवण्याकरतां म्हणून मीं बरोबर नेला होता. पण येते वेळीं घाईनं निघाल्यामुळं तो तिच्याकडेच विसरून राहिला. तेव्हां खुनाच्या रात्रीं ती जेव्हां रत्नमहालांत गेली, तेव्हां कांहीं तरी कारणाकरतां तिनं तो खंजीर बरोबर घेतला असावा."

"खरोखरच, आपल्या या हकीकतीवरून आपण पूर्ण निरपराधी आहां अशी कुणाचीही सहज खात्री पटेल." रामसिंग म्हणाला.

नंतर रामसिंगानें मधुकराला कमळाकरानें विचारले होते तसे बरेच प्रश्न विचारले; परंतु त्यापासून कांहींच फायदा न होतां तो अधिक गोंधळांत मात्र पडला. मधुकरानेंही त्याला खुनी इसम स्त्री असावी असें कमळाकराचें मत सांगितलें.

" छे, हें शक्यच नाहीं." रामसिंग म्हणाला, " इतकी छाती कुणा स्त्रीची होणं शक्य नाहीं. तरीही मला यावर विचार केला पाहिजे. कारण रमाबाईचाही इथं थोडाबहुत संबंध आहे."

" काय म्हणतां ? तिचा संबंध ! " मधुकरानें आश्चर्यानें परंतु त्याच वेळीं कोपयुक्त होऊन विचारलें.

" होय. त्यांचा इथं कांहीं तरी संबंध असला पाहिजे. खून झाला त्या रात्रीं गात असणाऱ्याचा आवाज त्यांच्या आवाजासारखाच असून चाललेलं पदही तिच्या आवडीचंच होतं—"

" तुमचे आपले कांहीं तरीच तर्क, रामसिंग ! " रामसिंगाचीं विधानें न आवडून मधुकर एकदम ओरडला.

" रामसिंग म्हणतात तेंच बरोबर आहे व माझ्याच मोटरींतून ती आपल्या घरीं पळाली." कमलाकर एकदम खोलींत घुसून म्हणाला, " खून स्त्रीच्याच हातून झाला यांत आतां शंका नाहीं व ती रमाबाईच होय."

" अगदीं अशक्य ! " मधुकर ओरडून म्हणाला, " तुम्हीं काय बोलतां याचा विचार केला आहे का ? या गोष्टीवर माझा मुळींच विश्वास बसणार नाहीं."

" कसं बरं अशक्य ? " कमळाकरानें म्हटलें, " रमाबाईसारख्या स्त्रीला सरलेसारखी नाजुक तरुणी जगांतून उठवायला अवकाश का लागणार आहे ? "

" पण बिचाऱ्या निरपराध सरलेची हत्या करायचं तिला कारण काय ? "

" सर्पाला दंश करायला यत्किंचित कारणही पुरेसं होतं. येनकेन प्रकारेण तो आरोप तुझ्यावर ढकलून तुझा आणि नलिनीचा विवाह रद्द व्हावा हेंच ! "

" ऊं: ! अगदींच भरमसाट कल्पना ! एवढ्याकरतां तिनं सरलेचा खून कां करावा ? शिवाय रमाबाई त्या वेळीं चौपाटीवर होती ना ? "

" मग नाहीं कोण म्हणतो ? ती चौपाटीवर गेली, ती माझ्याच मोटरमधून. "

" पण तुमची मोटर ठाणें स्टेशनजवळ मिळाली." रामसिंग म्हणाला.

"त्यांतच तर गंमत आहे. नाहीं तरी रमाबाईसुद्धा मोठी हुषार व चाणाक्ष स्त्री आहे खरी ! ठाण्याहून शेवटची गाडी बरोबर १२ ची आहे. मधुकरानं तो बंगला ११ च्या सुमारला सोडला. तो परत येणार नाहीं अशी खात्री होतांच ती बाहेर पडली. पण तिला ती शेवटची गाडी साधायची होती; मधुकरामुळं तिची खोटी झाली. रस्त्यावर येतांच तिला दूर माझी मोटर दिसली. त्यांतून ती लोकांना चकवण्याकरतां ठाण्याला गेली व तिथून घरीं गेली. तिला मोटर चांगली हाकतां येते, हें मला माहित आहे. "



## प्रकरण १५ वें

# दांडेकरांचें प्रियाराधन !

सरलेची मिळकत आपणास मिळणार या आशेच्या जोरावर दांडेकर मास्तरांनीं हवेंत सुखाचे किती तरी मनोरे बांधले होते ! पण मधुकर सरलेचा वारस झाला हें कळल्यावर ते सर्व धडाडून खालीं कोसळले. दांडेकरांना त्या दिवसापासून एकच चिंता लागून राहिली होती. मधुकराचा सूड आपणास कसा उगवतां येईल याचा ते विचार करीत होते. आजही आपल्या खोलींत ते विचार करीत बसले असतां आंत सीता आली.

सीता ही एका गरीब ब्राह्मण घराण्यांतील मुलगी असून रमाबाईकडे ती लहान मुलांना संभाळण्याचें काम करी.

" मी आपल्या विचाराच्या आड आलें म्हणून आपल्याला राग नाहीं ना आला ? " आंत येतां येतां तिनें दांडेकर मास्तरांस विचारलें.

" छे ! छे ! छे ! असं मुळींच नाहीं. "

सीता आपल्या खोलींत ! आपण स्वप्नांत तर नाहीं ना, असा त्यांना भास झाला. तोंडावर हास्य झळकवीत ते म्हणाले, " आज कुठं गरीबाघरीं धूळ झाडण्याचं आठवलं ? "

" इश्श ! बायकांना कामापुरतं असं हरभऱ्याच्या झाडावर चढवा-यची मेली पुरुषांची रीतच असते. "

परंतु आमच्या मास्तरांना सीतेच्या आगमनामुळें जणूं हर्षाचा झट-काच आल्यामुळें त्यांना तिचें वाक्य पुरतेपणीं ऐकूं आलें कीं नाहीं

कोणास ठाउक ! सीता आंत येतांच त्यांची अत्यंत धांदल उडाली. तिला किंचितही त्रास होऊं नये म्हणून त्यांनीं तेथेंच जरा दूर असलेली खुर्ची एकदम पुढें ओढून तिला बसावयास दिली. ती खुर्चीवर बसतांच मास्तरांनीं जरा धांवतच जाऊन, तिला कदाचित् उष्म्यामुळें त्रास होईल म्हणून त्या खोलीला असणाऱ्या दोन खिडक्या झटपट उघडून टाकल्या व आपल्या मेजाचा खण उघडून त्यांतून, नुक्ताच विकत घेतलेला एक सुरेखसा घडीचा पंखा वारा घेण्यासाठीं तिच्या हातांत दिला. अशा रीतीनें सीतेची बाहेरील सुखसोयींची व्यवस्था लागल्यावर ते तिच्याजवळ येऊन थोडे हसंतच म्हणाले,

"आलों हं ! फक्कडसा चहा बनवून घेऊन येतों." असें म्हणून ते धांवतच आंतल्या खोलींत गेले.

आपल्या सुखासाठीं एवढी त्यांची खटपट पाहून सीतेलाही एक प्रकारें आनंदच झाला, व तिला थोडासा अभिमानही वाटला.

" खरोखर, आज तुझ्या येण्यानं माझ्या घराला किती शोभा आली आहे, याची तुला बिलकुल कल्पना करतां येणार नाहीं." ते हंसत हंसत सीतेकडे पाहत म्हणाले.

"होय, मलाही दिसते खरी !" ती थट्टेच्या स्वरानें म्हणाली, "पण–पण मला वाटतं, आणखी कांहीं दिवसांनीं या घराला याहीपेक्षां अधिक शोभा येईल, नाहीं ? "

" कुणी सांगावं ! कदाचित् येईलही, कदाचित् येणारही नाहीं ! लक्ष्मी कुणावर केव्हां कृपा करील याचा कांहीं नेम नसतो. पण यदाकदाचित् मी जर श्रीमंत झालों, तर काय करीन माहित आहे का ?"

" काय ? हं, समजलें. एखादी फटाकडी तरुणी आणून तिच्याबरोबर मोठ्या मजेनं संसार थाटाल. होय ना ! " बाहेरून हंसतच, पण मास्तर काय उत्तर देतील याची मनांत भीति वाटून सीता म्हणाली, "बहुतेक पुरुषांचं असंच असतं."

" पण–पण आमच्यासारख्यांना मुलगी देतो कोण ? " सीतेच्या मनांत काय असावें हें जाणण्याकरितां मास्तरांनीं भीतभीतच विचारलें.

" कां बरं ? आपल्यासारख्यांना मुलगी मिळण्याची पंचाईत! अगदींच अशक्य."

" खरंच का तुला असं वाटतं ? " सीता कदाचित् स्वतःविषयीं म्हणत असावी असें वाटल्यामुळें चेहरा खुलवून मास्तर म्हणाले, " मी कांहीं अगदीं तरणाबांड नाहीं; शिवाय माझी गरिबीची स्थिति, व मोठेपणाच्या नांवानं पूज्य अशी स्थिति—"

" पण शिक्षक ही सुद्धा मानाचीच पदवी नाहीं का ? शिवाय आपण चांगल्या कुळांतील आहां हें कांहीं थोडं नाहीं."

" होय, खरं आहे. " मास्तर खिन्न अंतःकरणानें म्हणाले, "पण नुसतं उच्च शील काय जाळायचं आहे! हातांत पैसे नाहींत, तर कुळाला विचारतो कोण ? मी श्रीमंत असतों तर—!"

पण सीतेच्या मनांत काय होतें हें तिच्या चेहऱ्यावरून व हालचाल करणाऱ्या डोळ्यांवरून मास्तरांनीं जाणलें. तिच्या मूकवृत्तीवरूनही त्यांनीं जसें तिचें हृद्गत जाणलें होतें, तसेंच मास्तराचें मनही चाणाक्ष सीतेनें ताबडतोब ओळखलें.

मास्तर झटकन् पुढें झाले व तिचा हात आपल्या हातांत घेऊन म्हणाले, "सीते, खरं सांग, तुझं मजवर प्रेम आहे का ?"

" इश्य! हें काय असलं भलतंच विचारणं ?" सीतेनें लाजूनच उत्तरार्थी प्रश्न केला. तिचा हात अद्याप मास्तरांच्याच हातांत होता. "पण तुमची स्थिति–" पुढें बोलण्यास तिला धीर न झाल्यामुळें ती नुसती मास्तराकडे पाहूं लागली.

" होय, सीते, माझी स्थिति गरीबीची आहे. " मास्तरांनीं वाक्य पुरें केलें. परंतु याच वेळीं एक विचार त्यांच्या मनांत आल्यामुळें त्यांना विशेष आनंद झाल्यासारखें दिसलें. ते पुढें म्हणाले, " सीते, तुझी इच्छा असेल तर मला श्रीमंत होतां येईल."

" म्हणजे! आपल्या बोलण्याचा अर्थ मीं नाहीं समजलें."

" सीते, खरं सांग, पैसे मिळवण्यासाठीं मी सांगेन तें तूं ऐकशील का ? "

" आपल्या मनांत आहे तरी काय ? " तिनें घाबरून विचारलें.

" माझं म्हणणं एवढेंच कीं, तूं जर मनांत आणलंस तर मी कदाचित् कैक हजारांचा मालक होईन."

" माझ्या हातून विशेष तें काय होणार ?" तिनें मास्तरांना उत्तर दिलें.

मास्तर आपली जागा सोडून येरझारा घालूं लागले. फिरतां फिरतां कांहीं वेळानें त्यांनीं विचारलें,

" रत्नमहालांतील खून तुला आठवत असेलच ! "

"हो." अस्पष्ट आवाजांत सीता म्हणाली.

" मग ऐक तर. जिचा खून झाला ती माझी आतेबहीण. तिनं माझ्या नांवं वार्षिक दहा हजारांची मिळत करून ठेवली होती. पण ह्या मधुकरानं कांहीं ना कांहीं प्रकारें तिचं मन वळवलं व जी मिळकत वास्तविक मला मिळायची ती सर्व आपल्या नांवानं करून घेतली. तेव्हांपासून मी मधुकराचा अत्यंत द्वेष करतों. पण आतां कांहीं झालं, तरी सर्व मिळकत मला एकटयालाच मिळणं शक्य नाहीं. तेव्हां त्यांतली अर्धी तरी मला मिळालीच पाहिजे. नीट ऐक.—बऱ्याच कारणांमुळं हा खून त्या मधुकरानंच केला आहे अशी माझी खात्री झाली आहे.—थांब, अशी दचकूं नको—मीं त्याचीं कृत्यं चवाठयावर आणूं नये, अशी मधुकराची इच्छा असली, तर त्यानं मला आपल्या मिळकतींतून वार्षिक पांच हजार रुपये करारनाम्यानं लिहून द्यावे, असा प्रयत्न मी करणार आहें व तो खून त्यानंच केला हें सिद्ध करायला जर तूं मला मदत करशील तर माझा बेत उत्तम रीतीनं तडीला जाऊन मग तूं व मी लग्न करून मोठ्या थाटानं राहूं. बोल, आहे कबुली ? "

सीतेला मास्तरांचें म्हणणें बहुतांशीं पटलें असावें असें तिच्या चेहऱ्यावरून दिसूं लागलें. मास्तरांना जर वार्षिक पांच हजार मिळत असले, तर तेवढया रकमेंत आम्हां दोघांनाही जन्मभर किती तरी सुखांत राहतां येईल.पैशांच्या कल्पनेनें तिला किती तरी हर्ष झाला होता.

" मी बाई यांत मदत ती कसली देणार ? " तिनें मास्तरांना विचारलें.

" सहज देतां येईल. तूं खटल्याची हकीकत वर्तमानपत्रांतून वाचली आहेस ? "

" होय. पण त्यांत मधुकराचं नांवसुद्धा नव्हतं. "

" ऐकून घे. त्या रात्रीं पोलिसहवालदाराबरोबर बोलत राहणारा तरुण गृहस्थ मधुकरच होता. तो ज्या वेळीं रत्नमहालांतून बाहेर पडला त्या वेळीं सरलेचं प्रेत रत्नमहालांतील सफेत दिवाणखान्यांत पडलेलं असून पोलिसाला मधुकराचा कोणत्याही प्रकारें संशय होऊं नये म्हणून बंगल्यांत एक बाई गात होती. त्या बाईचा आवाज जवळजवळ रमाबाईच्या आवाजासारखाच असून ती जें गाणं गात होती, तेंही रमाबाईंच्याच आवडीचं होतं. "

तरीही सीतेच्या डोक्यांत नीटसा प्रकाश पडेना. " पुढं ? " तिनें सहज म्हणून मास्तरांना विचारलें.

" पुढंऽऽ ! " मास्तरांनीं पुन्हा तेच शब्द उतावळीपणें उच्चारले. " मीं इतकं सांगितलं तरी त्याचा परिणाम तुझ्या मनावर कांहींच का झाला नाहीं ? मीं सांगितलं तें तुला समजलं का ? "

" हो. "

" रमाबाई त्या वेळीं चौपाटीवर होती असं म्हणतात. पण त्या पुराव्याची मला गरज नाहीं. रमाबाईकरतां आपण कांहीं तरी केलं असून तें आपण कुणाला सांगून तिचा विश्वासघात करणार नाहीं, असं जें तूं रामसिंगाजवळ बोललीस तें काय, तें मला समजलं पाहिजे. तिच्याकरतां तूं काय बरं केलंस ?"

" रमाबाई त्या दिवशीं, " सीता म्हणाली, " रत्नमहालात आली होती. "

"आतां सर्व हकीकत सांग पाहूं; " अधीर स्वरांत मास्तर म्हणाले.

सीतेनेंही मग विशेष आढेवेढे न घेतां बोलण्यास सुरवात केली.

"आम्ही जेव्हां चौपाटीवरील बंगल्यांत होतों, तेव्हां रमाबाईच्या मनाला कसला तरी त्रास होतो आहे असं मीं तिच्या चर्चेवरून जाणलं. दिवसेंदिवस हीं तिची स्थिति वाढतच चालली, त्यामुळं त

अतिशय चिडखोर बनून आम्हां सर्व नोकरलोकांना फार त्रास देऊं लागली. विशेषतः ती आपल्या नवऱ्याबरोबर फारच भांडूं लागली."

" चोविसाव्या तारखेला म्हणजे खून झाला त्या दिवशीं गजानन-रावांना एक पत्र आलं, त्या पत्रांत कांहीं तरी तसंच चमत्कारिक असावं असं वाटतं; कारण तें पत्र वाचतांच त्यांची मुद्रा एकदम कावरीबावरी होऊन त्यांचा चेहरा अगदीं फिक्कट झाला. पत्र वाचून होतांच तें त्यांनीं आपल्या खिशांत कोंबलं. त्या वेळीं रमाबाईही खोलींतच असल्यामुळं त्यांच्या काकदृष्टीला गजाननरावांची ती स्थिति आल्यावांचून राहिली नाहीं. पण ती त्या वेळीं मात्र कांहीं एक बोलली नाहीं. पण मी खोलीं-तून बाहेर पडतांच मात्र त्यांची त्या पत्रावरून बरीच बोलाचाली झाली असावी असं वाटतं; कारण त्यानंतर सर्व दिवस रमाबाई रागांतच होत्या व गजाननराव आपणास बरं वाटत नसल्याचं सांगून त्या दिवशीं सर्व दिवस ते आपल्या खोलींतच झोंपून राहिले होते. जवळजवळ संबंध दिवस रमाबाई त्यांच्याच खोलींत बसून होती. सहा वाजण्याच्या सुमारास ती त्यांच्या खोलींतून बाहेर आली व बाहेरच गजाननरावांचा नोकर बसला होता, त्याला तिनं, गजाननराव आजारी असल्यामुळं त्याला कुणीही त्रास देतां कामा नये असं बजावून तिकडून घालवून दिलं. नंतर ती मजजवळ आली व तिनं आपलं लुगडं मला नेसायला सांगितलं. कांहीं अत्यंत जरू-रीच्या कामाकरतां बाहेर जायचं असल्यामुळं आपण फिरून येईपर्यंत दिवाणखान्यांत बसून राहण्याची तिनं मला ताकीद दिली. त्याच वेळीं आपण बाहेर गेलों आहों हें कुणालाही समजतां कामा नये, असंही तिनं मला बजावून ठेवलं. रमाबाईच्या भावाची व्यापारी पेढी असून त्यांत गजाननराव भागीदार आहेत. पण त्यांचं सर्व काम रमाबाईच पाहते. त्या कामाप्रीत्यर्थ पुष्कळ वेळां ती आपल्या बंधूला भेटायला जात असते. त्याचप्रमाणं ती त्या दिवशींही बाहेर पडली असावी असं मला वाटलं. तसंच तिनं आपलीं वस्त्रं मला नेसायला दिलीं, त्या अर्थीं गडी माणसांनीं व गजाननरावानींही मलाच रमाबाई समजावं असा तिचा हेतु असावा. आणि त्यावरूनच आपल्या नवऱ्याच्या

नकळतच ती तिकडे जात असावी असा मीं तर्क केला. मी कुणालाही ती हकीकत कळवूं नये म्हणून तिनं मला त्या वेळीं पुष्कळ पैसेही दिले. 'मला चाकरमाणसं ओळखणार नाहींत, पण जर गजाननरावांनीं हाक मारली, तर काय करणार ?' ही माझी शंका मीं तिच्या कानीं घातली; पण 'आपण त्यांना झोपेचं औषध दिलं असून त्यामुळं ते लौकर जागे होणार नाहींत, असं सांगून तिनं माझी भीति दूर केली. त्या दिवशीं तिनं सर्व गड्यांना लौकर रजा दिली; त्यामुळं मला कसला त्रास राहिला नाहीं. मी रमाबाईची वस्त्रं नेसून दिवाणखान्यांत डोळ्यांसमोर पुस्तक धरून बसलें व ती सहांच्या सुमारास बाहेर पडली."

"ती परत आली, त्या वेळीं किती वाजले होते ?"

"तरी त्या वेळीं मध्यरात्र टळून गेली असावी."

"त्या वेळीं ती त्रासल्यासारखी दिसत होती का ?"

"मुळींच नाहीं. आल्यावर तिनं आपल्यामागं कांहीं घडलं नाहीं अशी मजकडून खात्री करून घेतली व नंतर मला झोंपायला जायला सांगितलं. ती मात्र ताबडतोब झोंपली नाहीं. कसले तरी कामाचे कागद पाहत बसली होती."

"पण तुला कसलाच संशय आला नाहीं ?"

"यत्किंचितही नाहीं." सीतेनें अगदीं निश्चयात्मक स्वरानें उत्तर दिलें, "रत्नमहालांत त्या रात्रीं म्हटलेलें गाणें तिच्या आवडीचें असून तें म्हणणाऱ्याचा आवाजही तिच्या आवाजासारखाच होता हें आपल्या-कडून कळेपर्यंत मला कोणताच संशय आला नाहीं.

"अस्सं !" दांडेकर मास्तर विचार करीत म्हणाले, "तें कांहीं असो. पण त्या रात्रीं रमाबाई रत्नमहालांत आली होती हें खास. पण काय ग, तिला मोटर हाकतां येते काय ?

"होय. एकदा तिला मोटर हाकतांना मीं पाहिलं होतं."

"मग तर निःसंशय तीच ती. कमळाकराच्या मोटरींत बसून नंतर ती ठाणें स्टेशनवर गेली व तिथून शेवटच्या गाडीनं घरीं गेली. कम-

ळाकराचीही कल्पना अशीच आहे असं रामसिंग म्हणत होता. सर-लेचा खून कुणा स्त्रीनंच केला, असं कमळाकरचं मत आहे. ह्या तुझ्या पुराव्यानिशीं आपण रमाबाईला कचाटींत धरूं या. ”

“पण तुम्ही आतां काय करणार ?” थोड्या वेळानें सीतेनें विचारलें.

“ करणार काय ?” मास्तर हंसत हंसत म्हणाले, “ आतां मधु-कराकडून वार्षिक पांच हजार ठरवून घेणार, व त्यानें नाकबूल केलंच तर त्याला व रमाबाईंना पोलिसांत गुदरणार. तुझ्या साक्षीमुळं तिला फांशीची शिक्षा व त्याला जन्मठेप मिळालीच पाहिजे ! ”



## प्रकरण १६ वें

# कॉफीचा डाग

खुनासंबंधीं कांहीं महत्त्वाचे धागे लोणावळ्यासच राहिल्यानें लागतील असें वाटून कमळाकरानें शांतिगृहांतच राहण्याचें ठरविलें होतें. बरेच दिवस भाडेकरू मिळत नसल्यामुळें शांतिगृहाच्या मालकानेंही मोठ्या आनंदानें कमळाकरास ती जागा भाड्यानें दिली होती.

आज शांतिगृहाच्या दिवाणखान्यांत विचार करीत तो बसला होता. आदल्या दिवशीं सकाळीं सरोजिनीबाई व शरयू लोणावळ्यास येऊन त्याच दिवशीं संध्याकाळीं पुन्हा मुंबईस परतली होती. सरोजिनीबाईंनीं आणलेल्या माहितीनें कमलाकर आश्चर्यसागरांत बुडून गेला होता. दोन दिवसांपूर्वीं सरोजिनीबाई आपल्या खोलींत कादंबरी वाचीत असतां इतकीं वर्षें परागंदा असलेला तिचा पति आत्मारामपंत याची आकृति तिनें खिडकीच्याबाहेर उभी असलेली पाहिली होती व त्या वेळीं सरोजिनीबाई घाबरून मोठ्यानें ओरडल्यामुळें आत्मारामपंत पुन्हा अदृश्य झाला होता. आत्मारामपंताला पाहिल्यापासून सरोजिनीबाईंची मनःस्थिति ताळ्यावर नव्हती.

आणि याच गोष्टीचा विचार कमळाकर या वेळीं करीत होता. इतक्यांत दुरून मधुकराची स्वारी येतांना त्याच्या दृष्टीस पडली. मधुकराला पाहतांच कमळाकर उठून बाहेर आला व तो जवळ येतांक्षणीं म्हणाला, " कांहीं विशेष बातमी ? "

" तीच सांगायला मी इथं आलों आहें, " असें म्हणून मधुकरानें आपल्या कोटाच्या खिशांतून एक कागदाचा चिटोरा बाहेर

काढला. त्यावर फक्त एकच ओळ लिहिलेली होती. " जर तुला माझी मिळकत मिळाली तर ज्या जागीं कॉफीचा डाग पडलेला असेल त्या जागेखालीं नीट निरखून पाहायला विसरूं नकोस. " हीच ती ओळ होती. कमलाकरानें ती ओळ एकदोनदा—अनेकदा वाचली; परंतु त्यापासून त्याला विशेष असा बोध होईना. "मधुकर, हें काय आहे ? " त्यानें थोडया वेळानें प्रश्न केला.

" हा कागद मला आज सकाळींच सॉलिसिटर कादर यांजकडून मिळाला. मजकूर सरलेच्या हस्ताक्षरांतील आहे," मधुकरानें शांतपणें उत्तर दिलें, " तुकडा पाकिटांत बंद केलेला असून, त्यावर माझं नांव होतं. या सूचनेचा अर्थ काय असावा हेंच माझ्या ध्यानांत येत नाहीं. "

" पण मला या सूचनेचा अर्थ चांगला समजला आहे. आपला खून होणार याची सरलेला पूर्वी माहिती होती. " मधुकराच्या विस्मयचकित मुद्रेकडे नजर न देतां कमळाकर पुढें म्हणाला, " नाहीं तरी ही चिठी तुला तिनं लिहिली नसती. आतां प्रथम या घरांत कॉफीचा डाग कुठं पडलेला आहे कीं काय हें प्रथम पाहिलं पाहिजे."

" एकूण आपला खून होणार असं तिला वाटत असल्यामुळं आपल्या गतायुष्यावर कांहीं तरी उजेड पाडतील असे कांहीं कागदपत्र अगदीं गुप्त अशा जागीं तिनं लपवून ठेवले असावेत असंच तुझं म्हणणं आहे ना ? "

" अरे, नुसतं म्हणणंच नाहीं, तर तशी पूर्ण खात्री आहे." कमळाकर म्हणाला, "चल, उठ अगोदर; आतां लागलंच पाहिजे शोधाला !"

मधुकर न उठतांच म्हणाला, "व्यर्थ भरमसाट शोध करीत बसण्यापेक्षां आधीं तसा डाग कुठं असूं शकेल, याचा विचार आपण केला पाहिजे. कॉफीचा डाग असूं शकेल अशी सर्वांत महत्त्वाची जागा म्हणजे 'टेबलक्लॉथ'—"

" हो ! पांढऱ्या कापडावर तसा डाग असूं शकतो; पण अशा ठिकाणीं तिनं ते कागद लपवले असतील असं मला कांहीं वाटत नाहीं. सर्व कपडे मीं यापूर्वीच उलथून पाहिले आहेत. पण त्यापासून

माझा कांहींच फायदा झाला नाहीं. अरे ! पण वेडयासारखा असा त्या छताकडे काय पाहत राहिला आहेस ? त्या ठिकाणीं कांहीं कॉफीचा डाग असणं शक्य नाहीं." कमळाकरानें थट्टेच्या स्वरानें म्हटलें.

" तिथं नसेल, पण एखाद्या भिंतीवर असणं शक्य आहे." मधुकरानें गंभीर स्वरांत उत्तर दिलें.

"कॉफीनं भरलेला प्याला तिच्या नवऱ्यानें तिच्या डोक्यावर फेकला असला, तर कदाचित भिंतीवर तसा डाग असूं शकेल बुवा. पण तसाही डाग असला, तरी भिंती पोखरून आंत कागद ठेवायचे पूर्वीचे दिवस आतां नाहींत. नाहीं तर खटका दाबला कीं एखादी फळी बाजूला होऊन पोकळींत ठेवलेले कागद दिसतील अशी समजूत व्हायची. कदाचित् तसा डाग खालच्या गालिच्यावरही असायचा संभव आहे."

दोघेही त्या उद्योगाला कसून लागले. त्यांनीं त्या गालिच्यावर असलेल्या सर्व वस्तु हालविल्या, बाजाची पेटी हालवून पाहिली, परंतु त्यांना कांहींच आढळून आलें नाहीं. नंतर मेजें, खुर्च्या व इतर वस्तुही त्यांनीं बाहेर काढून बराच वेळ अत्यंत बारकाईनें पाहिल्या. परंतु शेवटीं त्यांची निराशाच झाली. सर्व वस्तु बाहेर काढूनही जेव्हां कॉफीचा डाग कुठेंच दिसेना, तेव्हां निराश होऊन तो उद्योग सोडून देण्याच्या बेतांत ते होते. परंतु इतक्यांत दिवाणखान्याच्या एका कोपऱ्यांत गालीच्यावर ठेवलेल्या एका लहानच लांकडी पुतळ्याकडे त्यांची नजर गेली. तत्क्षणींच त्यांनीं तो पुतळा जागचा हालविला. तोंच त्यांना त्याखालीं अगदीं लहान असा एक कॉफीचा डाग दिसून आला. तो पाहतांच दोघांचीही कळी खुलली ! कमळाकरानें ताबडतोब खिशांतून चाकू काढून त्याखालची जमीन खणून पाहिली. थोडेंसें खणतांच त्यांना एक लहानसें हिरव्या कव्हराचें पुस्तक आढळून आलें. त्यावर " माझी रोजनिशी " अशीं अक्षरें लिहिलेलीं होतीं.

" यावरूनच ह्या रहस्यावर प्रकाश पडेल. " असें म्हणून कमळाकरानें आनंदाच्या भरांत मधुकराच्या पाठीवर थाप मारली.

## प्रकरण १७ वें

# मास्तरांचें साधलें !

" गजाननराव, माझ्या हातून शक्य तेवढा प्रयत्न मीं केला पण त्यापासून हा खून उजेडांत न येतां शेवटीं मलाच हात टेकावे लागले." एके दिवशीं पोलिस इन्स्पेक्टर सर्जेराव अत्यंत खिन्न वदनानें गजाननरावांच्या घरीं–रत्नमहालांत–त्यांची भेट घेऊन म्हणाले, " यापुढें हें गूढ उकललं जाईल असं मला कांहीं वाटत नाहीं."

"तुम्ही त्या खुनाविषयीं म्हणतां वाटतं ?" गजाननरावांनीं आठवण करीत विचारलें.

" मग दुसऱ्या कशाविषयीं सांगणार !" सर्जेराव काकुळतीच्या स्वरानें म्हणाले, " याखेरीज तुमच्याकडे बोलायला माझ्याजवळ दुसरा विषयच नाहीं.

गजाननरावांनीं प्रश्न केला, " सरलेच्या नवऱ्याचा पत्ता तुम्हांला लागला काय ?"

" नाहीं व यापुढं तो लागेल असंही दिसत नाहीं. मधुकरानं खुनी इसम शोधून काढायचं काम रामसिंग नांवाच्या एका माणसाकडे सोंपवलं आहे असं एकतों; तो शोध काय लावतो तें पाहूं या. पण तो तरी आमच्यापेक्षां विशेष असं काय करणार ? आमच्याप्रमाणं त्याचीही खटपट शेवटीं व्यर्थ जाणार. "

" हा रामसिंग हुषार मनुष्य आहे का ?"

" हो. तो तसा आहे असं म्हणतात. त्याच्या अंगांत कांहीं तरी चलाखी असावी, असं मला वाटतं. मधुकरराव खुनी इसमाचा शोध-

लावणाऱ्यास चांगलेंच इनाम देतील व तें पटकावावं असं माझ्याही मनांत येतं. पण हा खून मुळीं इतका गुंतागुंतीचा आहे कीं, आपला सर्व मेंदू जरी आटवला तरी शेवटीं–शेवटीं काय ? सर्वच कांहीं ओम्‌फस्‌ होणार हें ठरलेलं." एक उसासा सोडून सर्जेरावांनीं म्हटलें.

गजाननरावांनीं थोडा वेळ विचार केला व आपल्या जागेवरून उठून ते जवळच असलेल्या एका मेजाकडे गेले व त्यांतून एक चेकबुक काढून त्यानीं सर्जेरावांच्या नांवें एक चेक लिहून म्हटलें,

" तुमच्या श्रमांचा कांहीं तरी मोबदला तुम्हांला मिळालाच पाहिजे. विनाकारण दुसऱ्याचे मोफत श्रम घेणं मला मुळींच आवडत नाहीं. तुमच्या श्रमांचा थोडासा मोबदला मी हा तुम्हांला देत आहें, याचा तुम्ही स्वीकार करा. पण याच्याऐवजीं एक अल्पशी देणगी मी तुमच्याकडे मागत आहें. तुमच्याजवळ जी त्या मयत स्त्रीची तसबीर आहे, ती तुम्ही मला द्या. माझ्याकडून तरी शक्य तितका तपास करण्याचा मी कांहीं तरी प्रयत्न करून पाहतों. "

" ती तसबीर मी तुम्हांला देईनच. " तो चेक खिशांत ठेवीत सर्जेराव म्हणाले, "पण मला वाईट वाटतं तें एवढंच कीं, निकालाच्या अभावीं हा गुन्हा तसाच पडून राहणार. " सर्जेराव जाण्यासाठीं उठले व त्यांना पोंचविण्याकरितां गजाननराव दारापर्यंत आले.

बाहेर पडण्याकरितां गजाननरावांनीं दार उघडतांच त्यांना समोरच एक माणूस उभा असलेला दिसला. तो शरीरानें उंच व वर्णानें सांवळा असून, गजाननरावांनीं जेव्हां दरवाजा उघडला तेव्हां त्यावरील बेल दाबण्याकरितां त्यानें आपला हात वर उचललेला होता. गजाननरावांनीं त्याजकडे निरखून पाहिलें. परंतु त्यांना कांहीं त्याची ओळख पटेना.

" तुम्हांला कोण पाहिजे ?" त्यांनीं सौम्य स्वरांत त्या नवख्या इसमास विचारलें.

" कांहीं कामाकरतां मला रमाबाईंची भेट घ्यायची आहे. " दांडेकर मास्तरांनीं उत्तर दिलें. ( तो गृहस्थ दांडेकर मास्तर होता. )

" आपलं कांहीं तरी ऑफिसचं काम असेल. अच्छा ! ती आपल्या खोलींत वर आहे." असें म्हणून गजाननरावांनीं जवळच असलेल्या

एका नोकरास म्हटलें, " यांचं नांव विचारून घेऊन घरांत कळव व मग यांना वर घेऊन जा." असें म्हणून ते व सर्जेराव बोलत बोलत बाहेर पडून निघून गेले.

धन्याच्या आज्ञेप्रमाणें नोकरानें मास्तरांना खालींच एका खुर्चीवर बसवून आपण त्यांच्या आगमनाची वर्दी देण्याकरितां वर निघून गेला. मध्यंतरी मास्तरसाहेबांचा आपणाशीं विचार चाललाच होता. गजाननरावांना पाहतांच, त्यांना आपण कोठें तरी पाहिलें असावें असें त्यांना वाटूं लागलें. त्यांनीं आपलें डोकें खाजवून त्यांना कोठें पाहिलें असावें याचा बराच विचार केला. परंतु त्यांच्या डोक्यांत प्रकाश पडेना. त्यांचा त्यावर आणखीही विचार चालला असता; परंतु तितक्यांतच वर गेलेला नोकर पुन्हा खालीं येऊन "बाईसाहेब आपली भेट घेण्यास तयार आहेत" असें सांगूं लागला. नोकरानें खुणावल्याप्रमाणें मास्तर त्याच्या मागोमाग जिना चढून वर गेले. नोकरानें त्यांना सफेत दिवाणखान्यांत सोडलें.

मास्तर रमाबाईंनीं निर्देशिलेल्या खुर्चीवर स्थानापन्न झाल्यावर त्या म्हणाल्या, " कोणत्या कामासाठीं आपण माझी भेट घेतली तें मला आधीं समजेल का ?"

रमाबाईंच्या प्रश्नाला प्रथम उत्तर न देतां आपल्या खिशांतून आपल्या नांवाची एक 'व्हिजिटिंग कार्ड' काढून ती रमाबाईंच्या हातीं देत त्यांनीं म्हटलें, " ह्या कार्डावरून आपल्याला माझं पूर्ण नांव व धंदा कळेलच. "

" दांडेकर मास्तर !" रमाबाई तें कार्ड वाचून उद्गारल्या. " हं ! काय काम आहे तुमचं ?"

" ज्या स्त्रीचा ह्या तुमच्या दिवाणखान्यांत खून झाला तिचा मी मामेभाऊ. " असें म्हणून आपल्याच ताठ्यांत असलेल्या रमाबाईंच्या चेहऱ्यावर आतां चांगलाच फरक होणार या आशेनें ते तिच्या चेहऱ्याकडे निरखून पाहूं लागले.

परंतु त्यांच्या अटकळीप्रमाणें रमाबाईंच्या भृकुटी वक्र झाल्या नाहींत अगर त्यांच्या चेहऱ्यावरही भयाचें कसलेंच चिन्ह दिसलें नाहीं.

" बरं, मग ?" त्यांनीं किंचित् ओळखल्यासारखं करून प्रश्न केला.

"मी आतां सरळ मुद्यावर येतों. त्या खुनाच्या रात्रीं तुम्ही त्या बंगल्यांत कशा व कोणत्या कारणासाठीं आलां होतां ? "

रमाबाई एकदम आश्चर्यमूढ होऊन मास्तरांकडे डोळे वटारून पाहूं लागल्या.

" साफ खोटं ! " त्या एकदम म्हणाल्या, " त्या रात्रीं मी तिथं मुळींच आलें नव्हतें. कुणी सांगितलं तुम्हांला हें ? "

" तुम्ही आलां होतां. इतकंच नव्हे, तर तुम्हांला तुमचं आवडतं गाणं गात असतांना लोकांनीं ऐकलेलं आहे. "

" हं ! " थोडा वेळ विचार करून रमाबाई उद्गारल्या. त्यांनीं या वेळीं आपल्या चेहऱ्यावर कसलाच फरक दिसूं दिला नाहीं; तसेंच आपल्या मनावरील ताबाही त्यांनीं यत्किंचितही ढळूं दिला नाहीं. पूर्वी-प्रमाणें पूर्ण शांत चेहरा करून त्या आपल्या जागेवरून बसून म्हणाल्या,

" पण मी त्या रात्रीं चौपाटीवरील आपल्या बंगल्यांत होतें, हें तुम्ही विसरल्यासारखे दिसतां. "

"तें मला ठाऊक आहे. इतरांच्या दृष्टीनं तें बरोबर आहे. गजानन-रावही तिथंच होते."

"होय, बरोबर. " रमाबाई थंडपणें म्हणाल्या, " असे मार्गावर या. पण हे असे प्रश्न विचारण्यांत तुमचा हेतु तरी काय आहे, तें मला कृपा करून सांगाल का ? "

" मला तो अपराध मधुकरावर शाबीत करायचा आहे."

" पण या बाबतींत तुम्हाला मदत करायला मी पूर्ण असमर्थ आहें." रमाबाई उतावीळपणानें म्हणाल्या.

" छे ! छे ! साफ चुकलांत तुम्ही." मास्तर म्हणाले, "तुम्हांला सहज मदत करतां येण्यासारखी आहे, पण तुम्ही ती करायची टाळाटाळी करीत आहां, एवढंच. कारण त्या खुनाच्या रात्रीं पोलिसांबरोबर बोलत जाणारा माणूस मधुकरच असून त्याला निसटून जायला तुम्हींच मदत केली. त्या रात्रीं तुमची दोघांची ह्या बंगल्यांत भेट झाली होती

खास व सरलेचा खून त्या चांडाळानंच तिच्या मानेंत खंजीर खुपसून केला."

"खंजीर? कुठचा खंजीर?"

"हं! कुठचा खंजीर! तुमच्या आचाऱ्याला स्वयंपाकघरांतील वरच्या एका कोनाड्यांत मिळाला होता तो खंजीर. कोणत्याही कारणानं का असेना, पण जो आपला स्वतःचा असं तुम्ही सर्वांना सांगितलं, तो खंजीर. आतां तरी आलं का ध्यानांत? मधुकरानं खून करून खंजीर स्वयंपाकघरांतील झरोक्यांत फेकून दिला."

"अगदींच अशक्य." रमाबाई उपहासात्मक हंसून म्हणाल्या; "घराची मागील बाजू बंद असल्यामुळं त्याचा आंत प्रवेश होणं शक्य नव्हतं."

हें ऐकतांच मास्तरांचा थोडासा गोंधळ उडाला खरा. परंतु ते डगमगणारे नव्हते. त्यांनीं निधड्या छातीनें रमाबाईच्या दरएक विधानास तोंड देण्याचा निश्चय केला. ते म्हणाले, "ज्याचा रत्नमहालांत सहज प्रवेश झाला, त्याला आंतील भागांत जायला कितीसा वेळ लागणार?"

"अस्सं?" रमाबाई आपल्या पाहुण्याकडे तटस्थ नजरेनें पाहत म्हणाल्या, "एकूण त्याला मीं घरांत घेतला असं तुमचं म्हणणं आहे तर?"

"होय; तसंच, रत्नमहालाची चावी गजाननरावांपाशीं होती. अर्थात् ती तुमच्या हातीं येणं शक्य होतं. कदाचित् त्या वेळीं जरी ती चावी; मिळण्यासारखी नव्हती, तरी त्यापूर्वी तसलीच दुसरी चावी बनवणं तुम्हांला कांहीं कठीण नव्हतं. खून घडवून आणल्यानंतर घराच्या बाहेर पडण्यासाठीं म्हणून तुम्ही ती चावी त्याजजवळ दिली व कोणाला आपल्या अमानुष कृत्याचा संशय येऊं नये म्हणून तुम्ही तिथंच गात राहिलां."

"हं, मग माझी सुटका कशी झाली?"

"कां बरं? तुम्हांला तुमची सुटका करून घ्यायला बराच अवधि होता. शिवाय ज्या अर्थी तुम्ही त्या रात्रीं कमलाकराची मोटर ठाणें

स्टेशनपर्यंत हाकून नेली, त्या अर्थी मोटर हाकण्याचं तुमचं नैपुण्य आम्हांला समजून आलं."

"चौपाटीवर जायला ठाण्यावरून जाणं जवळ पडेल खरं !"

"बाईसाहेब, अशा आडरस्त्यानं जाण्यामुळंच तुमची हुषारी दिसून येत नाहीं. लोकांना आपला संशय येऊं नये, म्हणून तुम्हांला हाच मार्ग पत्करावा लागला. तुम्ही ती मोटर ठाणे स्टेशनच्या हद्दींत ठेवून दिलीत व लोकलनं दादरवर येऊन पुढं चौपाटी गांठलीत."

मास्तरांचें हें तर्कशास्त्र ऐकतांच, रमाबाईच्या चेहऱ्यावर एकदम फरक होऊन त्या आपल्या जागेवरून उठून म्हणाल्या, "एकूण माझ्या हालचालीची पूर्ण माहिती तुम्हांला अवगत असावी असं दिसतं."

"होय. आणि त्याबद्दल मीं माझी पूर्ण खात्री करून घेतली आहे." मास्तर विजयी मुद्रा धारण करून म्हणाले.

"आणि मी त्या रात्रीं ह्या दिवाणखान्यांत असून गात बसलें होतें असंच तुमचं म्हणणं ना ?"

"होय. तुम्हींच त्या रात्रीं 'किति किति सांगू तुला' हें पद गात होतां-"

"पण तुमच्या ह्या सर्व कल्पना साफ चुकीच्या आहेत, असंच मला म्हटलं पाहिजे, समजलं का ? मी त्या रात्रीं ह्या दिवाणखान्यांत नसून या जागेपासून बऱ्याच अंतरावर—चौपाटीवर आपल्या बंगल्यांत होतें. मी मधुकराला ह्या बंगल्यांत मुळींच घेतलं नाहीं. इतकंच नव्हे तर त्या संबंध दिवसांत मी ह्या बाजूलासुद्धा फिरकलें नाहीं."

मास्तरसाहेबांनीं आपले खांदे उडविले व एक प्रकारची तिरसट मुद्रा करून म्हटलें, "मग मला ह्या सर्व गोष्टी नाकारून तुम्ही मला पोलिसांत जायला भाग पाडीत आहांत असंच ना मी समजावं ?"

"मूर्ख आहांत झालं !" रागानें गुरगुरत मास्तरांकडे वळून रमाबाई म्हणाल्या, "माझं बोलणं पटवून देतां येण्याजोगीं विधानं मजजवळ नाहींत, अशी तुमची समजूत आहे कीं काय ? मीं जें जें कांहीं सांगितलं तें सर्व कांहीं सिद्ध करतां येईल ही माझी खात्री असल्यामुळेंच तुम्ही मजवर ठेवलेले सर्व आरोप मी उघडपणें नाकरीत आहें. मी त्या रात्रीं

ह्या दिवाणखान्यांत गात होतें, हाच तुमचा मुख्य आरोप आहे, नव्हे ? ठीक आहे. तेंच गाणं मी तुम्हांला आतां ऐकवतें."

असें म्हणून रमाबाई दिवाणखान्याच्या एका दाराला लावलेला पडदा थोडा बाजूला सारून आंत गेल्या. ती आतां काय करणार याचा कांहींच तर्क न झाल्यामुळें दांडेकर तटस्थ होऊन ती गेली त्या बाजूकडे पाहत राहिले.

थोडक्याच वेळांत रमाबाई आंत गेल्या होत्या, त्या दाराच्या पडद्यामागून मधुर स्वर ऐकूं येऊं लागले. अत्यंत मधुर व कानाला गोड लागणारा असा तो रमाबाईंचाच आवाज होता. आपणास होतें नव्हतें तेवढें संगीताचें ज्ञान लढवून त्या " किती किति सांगूं " हें पद घोळवून म्हणूं लागल्या. परंतु आमचे मास्तर त्या गायनांत गुंग होऊं लागले न लागले तोंच त्या दाराचा पडदा एकदम बाजूला सरकला व आंतून रमाबाई बाहेर पडल्या. रमाबाई त्या दिवाणखान्यांत आल्या तरी आंत गाणें चालूच होतें. " हेंच ना तें गाणं ?" बाहेर येतांच त्यांनीं मास्तरांस प्रश्न केला.

" पण–पण–" हें काय घडलें याचा कांहींच तर्क न झाल्यामुळें शून्य चेहऱ्यानें मास्तर अडखळत म्हणाले.

" आणि गाणारीही मीच ना ? " रमाबाईंनीं पुन्हा प्रश्न केला. " मग पाहा तर. " तिनें डोळ्याचें पातें लवतें न लवतें तोंच त्या दाराचा थोडासा बाजूस सरकलेला पडदा एकदम बाजूला खेंचतांच आंत तें गाणें उठवीत असलेला एक मोठा ग्रामोफोन मास्तरांच्या दृष्टीस पडला. मास्तर 'आ' वासून एकदां रमाबाईकडे व एकदा त्या ग्रामोफोनकडे शून्य दृष्टीनें पाहूं लागले! अशा त्यांच्या झालेल्या फजितीनें आनंदित होऊन, रमाबाई पुढें येऊन उपहासात्मक हास्य करीत म्हणाल्या, "मला वाटतं, आतां तुमची चांगलीच खात्री झाली असेल. त्या रात्रीं पोलिसाला जो माझ्या गाण्याचा आवाज ऐकूं आला तो हाच होय. "

रमाबाई आंत जाऊन ग्रामोफोन बंद करून आल्या. मास्तर जरी हतबुद्ध झाले होते, तरी शरण जाण्याचा त्यांचा विचार होईना. ते म्हणाले, "कांहींही असलं तरी त्या रात्रीं तुम्हीं ह्या बंगल्यांत या जागीं

होतां, ही गोष्ट मी कधींच नाकबूल करणार नाहीं. तुम्ही इथं असूनही कदाचित् फसवणुकीसाठीं ग्रामाफोन लावला असेल. पण आतांच सांगितलेल्या इतर गोष्टींविषयीं माझी पूर्ण खात्री आहे. त्या दिवशीं संध्याकाळीं साडेपांच वाजतां तुम्ही चौपाटी सोडून इथं आलांत हें मी छाती ठोकून सांगूं शकतों."

"हें तुम्ही कसं सिद्ध करणार ?" रमाबाईनीं प्रश्न केला.

"माझ्याजवळ माटुंगा स्टेशनवरील तिकिट कलेक्टर व तेथील एक पोर्टर यांच्यापासून मिळालेला सबळ पुरावा आहे. व त्या वेळीं आपला पोशाख कसा काय होता, हेंही चांगलंच ठाऊक आहे."

"तें तुम्हांला कसं कळलं ?"

"तुमच्याच सीतेकडून." मास्तर चटकन् बोलून गेले.

"अस्सं !" रमाबाई रागानें आपला खालचा ओंठ कडकडून चावून व आपल्या हाताच्या मुठी आवळून म्हणाल्या, "तुम्हांला सर्व कांहीं माहित आहे, अशी आतां माझी खात्री झाली. पण त्या स्त्रीचा मीं खून केला नाहीं. कारण तिला ठार मारण्याचं मला कोणतंच कारण नव्हतं. खुना-पूर्वींही मीं तिला कधींही पाहिलं नव्हतें व तिची-माझी ओळखही नव्हती. इतकंच नव्हे, तर त्या दिवशीं मीं ह्या बंगल्यांत पाऊलही ठेवलं नाहीं."

"पण मी सांगतों कीं—"

"थांबा." त्यांना मध्येंच थांबवून रमाबाई एकदम म्हणाल्या, "तुम्ही सांगण्यापूर्वींच मी तुम्हांला असं सांगतें कीं, तुमची कल्पना साफ चुकीची आहे. इकडून दुसऱ्या कुणा स्त्रीच्या प्रेमपाशांत असावं असा मला खुनापूर्वी बरीक संशय येत होता. खुनाच्या दिवशीं सका-ळींच त्यांना एका स्त्रीकडून पत्रं आलं. तें पाहतांच मला वाटत असलेला संशय मीं त्यांच्यापाशीं प्रकट केला. पण त्यांनीं सर्व कांहीं नाकबूल केलं व आपल्याला बरं वाटत नाहीं असं कळवून आपल्या खोलीचा मार्ग त्यांनीं धरला. संध्याकाळपर्यंत मी त्यांच्याशीं बोललेंही नाहीं. संध्या-

काळीं पांच वाजून गेल्यानंतर जेव्हां मी त्यांच्या खोलींत गेलें, तेव्हां ते खोलीत नसून बाहेर गेल्याचं मला समजलं. अर्थात् ते आपल्या प्रिय माणसाला भेटायला गेले असावेत, ही माझी खात्री झाली. ते थोड्याच वेळापूर्वी बाहेर पडले असं समजतांच मीं सीतेला माझ्या वेषांत तिथंच बसायला सांगून त्यांच्या मागोमागच बाहेर पडलें. मीं त्यांना ग्रँटरोड स्टेशनवर गांठलं आणि त्यांच्या नकळतच त्यांच्याच गाडींत चढून, त्यांना माटुंगा स्टेशनवर उतरलेले पाहतांच, मीही तिथंच उतरलें. पण स्टेशनच्या बाहेर येऊन पाहतें तों ते कुठंच दिसेनात ! अखेरीस तिथंच त्यांची-माझी चुकामुक झाली. ”

“ म्हणून तुम्ही ह्या बंगल्यांत आलां ?”

“ नाहीं. मी या बाजूला मुळींच आलें नाहीं. ते त्या स्त्रीला या बंगल्यांत आणतील ही कल्पनाच मला अगदीं अशक्य वाटली. इतकंच नाहीं, तर त्यांनीं तिला इथं आणली नाहीं ही माझी पूर्ण खात्री आहे. माटुंगा स्टेशनवर उतरल्यानंतर ते पुढं कुठं गेले हें मात्र मला सांगतां येणार नाहीं. पण मी मात्र बरीच रात्र होईपर्यंत त्यांना मुद्देमालासहित पकडावं या हेतूनं माटुंगा स्टेशनवरच होतें. ते रात्रीच्या शेवटच्या गाडीनं मुंबईला आले, तेव्हां मीही त्याच गाडीनं परतलें. त्यांनीं मला मुळींच पाहिलं नाहीं व ज्या अर्थी त्यांच्याविरुद्ध कसलाच पुरावा मला सांपडला नाहीं, त्या अर्थी मीही त्यांच्याजवळ तो विषय काढला नाहीं. मी मागोमाग बाहेर पडून त्यांच्या पाळतीवर होतें ही गोष्ट त्यांना मुळींच समजली नाहीं व ती समजूं नये अशीही माझी इच्छा होती. तसंच सरलेच्या खुनाची हकीकत जेव्हां वर्तमानपत्रांतून वाचली तेव्हांही मला त्यांचा मुळींच संशय आला नाहीं. त्याच वेळीं नव्हे, तर मला त्यांचा आतांही मुळींच संशय येत नाहीं. कारण खुनासारखं अमानुष कृत्य करायला यांच्यासारखा भित्रा मनुष्य केव्हांच धजणार नाहीं ही माझी खात्री आहे. शिवाय आपल्याच घरांत रक्तपात करायचा मूर्खपणा त्यांनीं केव्हांही केला नसता.”

"अस्सं! आतां मला माझी चूक आढळून आली. तुम्ही पूर्ण निरपराधी आहांत ही माझी खात्री झाली. तुम्हांला नाहीं तीं दूषणें देऊन मीं तुमच्या मनाला त्रास दिला याबद्दल मी आपली मनःपूर्वक क्षमा मागतों." असें म्हणून मास्तरांनीं रमाबाईंना खरोखरच लवून नमस्कार केला. आरंभीं टवटवीत असलेला त्यांचा चेहरा निराशेमुळें अगदीं कोमेजून गेला.

परंतु रमाबाईंनीं त्यांच्या इच्छेप्रमाणें आपल्या मनाची कोमल भावना व्यक्त केली नाहीं.



प्रकरण १८ वें

# एक गतकालीन हकीकत

सर्जेरावांना निरोप दिल्यानंतर गजाननराव तसेच घराबाहेर पडले. मधुकराकडून बोलावणें आल्याकारणानें ते त्याच्याकडे जाण्यास निघाले होते. मधुकराच्या घराजवळ गाडी येतांच, तो खिडकींत उभा राहून आपलीच वाट पाहत आहे असें गजाननरावांस आढळून आलें. घरासमोर गाडी थांबतांच त्यांनीं गाडीभाडें चुकतें केलें व ते झटकन् जिना चढून वर आले. वर येतांच मधुकरानें त्यांचें अत्यंत प्रेमानें व आदरानें स्वागत केलें. मधुकराच्या मागें कमलाकर उभा होता. मधुकराप्रमाणें कमलाकराचीही मुद्रा गंभीर व शांत दिसत होती.

" आपणास वेळेवर आलेले पाहून मला फार संतोष होत आहे. " जवळच असलेली खुर्ची पुढें ओढून मधुकरानें बोलावयास सुरवात केली. "ह्या कमळाकराला तुम्हीं ओळखलंच असेल. तुमची व याची खुनाच्या चौकशीच्या दिवशीं गांठ पडलेलीच आहे. आतां मी तुमचा जास्त वेळ घेत नाहीं. सरळ आपल्या कामाकडे वळतों. "

" कसलं काम बुवा, मधुकर! तुम्हांला बहुतेक नलिनीची मागणी करायची असेल. "

त्यांचे हे शब्द ऐकून मधुकराला अत्यंत आश्चर्य वाटलें. तो म्हणाला, " छे ! छे ! मीं कांहीं त्या कामासाठीं तुम्हांला इथं बोलावलं नव्हतं. "

" असं. " आपल्या खिशांतून एक सिगारेट काढून गजाननराव उद्गारले, "मला वाटलं रमेपाशीं आपली रदबदली करण्यासाठीं सांगा-

यला मला तुम्ही बोलावलंत." असें म्हणून त्यांनीं आपली सिगरेट पेटविली.

गजागनरावांच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करून मधुकर म्हणाला, "गजाननराव, हें माझ्या हातांत काय आहे तें ओळखतां का तुम्ही ?"

" नाहीं. काय आहे तें ?" गजाननरावांनीं दचकून विचारलें.

" सरलेची रोजनिशी."

" रोजनिशी !" गजाननराव उद्गारले, या वेळीं त्यांचा आवाज थोडा घोगरा झाला होता; " तुम्हांला ती कुठं मिळाली ? "

" ही लपवून ठेवलेली होती." कमळाकरानें उत्तर दिलें, " सरलेच्या खुनानंतर तिच्यासंबंधानं अगर तिच्या गतायुष्यासंबंधानं कांहींच बाहेर येऊं नये म्हणून ज्यानं शांतिगृहांतील एकूण एक वस्तु नाहींशा करून टाकल्या, त्याला ही कांहीं सांपडली नाहीं. पण आम्हांला मात्र हिच्या योगानं पुष्कळ गोष्टी सिद्ध करून दाखवतां येतील."

गजननरावांनीं थोडा वेळ विचार करून म्हटलें, " तुम्ही वाचायला सुरवात करा. आंत काय लिहिलं आहे तें ऐकायला मी उत्सुक झालों आहें. पण सर्व वाचण्यापेक्षां मुद्याच्याच गोष्टी तुम्ही मला सांगितल्यास तें बरं होईल."

मधुकरानें नंतर अधिक वेळ न घालवितां हकीकत सांगावयास प्रारंभ केला. " गजाननराव," तो म्हणाला, " सरला ही माझ्या चुलत्याची मुलगी,त्याप्रमाणं दांडेकर मास्तरांची ती मावस बहीण होती. मास्तरांच्या आईच्या बहिणीचं व माझ्या चुलत्याचं पतिपत्नीचं नातं होतं. सरलेचं सर्व आयुष्य जवळजवळ एकलकोंड्याप्रमाणंच गेल्यामुळं तिनं आपल्या दिनचर्येची एक रोजनिशी ठेविली असून मरणापूर्वी घडून आलेल्या सर्व गोष्टी तिनं त्यांत नमूद करून ठेविलेल्या आहेत. एकलकोंड्याप्रमाणं म्हणण्याचं कारण कीं, तिचा पति व्यापारी असून त्याला आपल्या व्यापारानिमित्त देशोदेशीं फिरावं लागे. त्याचं आडनांव किनखापे असें असून तो सरलेसह लोणावळं येथील शांतिगृहांत

राहत असे. लग्नापासून लिहिलेल्या ह्या तिच्या रोजनिशीवरून असं आढळून आलं कीं, तिच्या पतीला—माधवराव किनखाप्यांना—धंद्यानिमित्त नेहमीं बाहेरगांवीं जावं लागत असे. पण त्यांच्या या सफरींमध्यें कांहीं गौप्य असेल अशी शंकाही सरलेच्या भोळ्या मनाला न आल्यामुळं ती आनंदांत होती. माधवरावांनीं धंद्यांत मिळवलेले पैसे एका बँकेंत ठेवले होते. कांहीं दिवसांनीं त्यांना व्यापारांत जसजशी बरकत येऊं लागली तशी त्यांनीं सरलेपाशीं, तिच्याकरतां एक स्वतंत्र बंगला बांधण्याची इच्छा प्रदर्शित केली. त्यांत विशेष हेंच होतें कीं, त्या बंगल्यांत एक संपूर्ण सफेत दिवाणखाना आपण राखणार असं त्यानं तिला कळवलं होतं.''

" सफेत दिवाणखाना !'' मिटलेले डोळे एकदम उघडून, चेहऱ्यावर जरा टवटवी आणून गजाननराव म्हणाले, " आतां या हकीकतींत मला मौज वाटूं लागली खरी. कारण माझ्या बंगल्यांतही एक सफेत दिवाणखाना आहे.''

"होय. आणि बिचाऱ्या सरलेचा त्या दिवाणखान्यांतच खून झाला !''

" पण तो कुणीं केला ?'' गजाननरावांनीं निर्विकार मुद्रेनें प्रश्न केला.

" तें हळूहळू समजेलच. सरलेचा एक चुलता श्रीमंत असून त्याची मिळकत सरलेलाच मिळणार होती. एक दिवस त्या चुलत्याकडून एक पत्र आलं त्यांत त्यानं सरलेला आपण आजारी असून आपला आतां कांहीं भरंवसा नाहीं; त्यामुळं आपल्या एकंदर मिळकतीचं मृत्युपत्र तिच्या नावं करून ठेवलेलं आहे, वगैरे मजकूर होता. त्याचं एकंदर उत्पन्न वार्षिक वीस हजारांचं होतं. ''

"माधवराव पुढें सरलेचें ऐकेना. त्यांनीं तिला ताबडतोब बंगला बांधण्याचा आपला निश्चय कळविला व तेंही आपल्या स्वतःच्या मनाप्रमाणें बांधणार असें तिला सांगून तें कसं काय बांधायचं, आंत कशी काय व्यवस्था ठेवायची याबद्दलही त्यानं तिला विचारलें नाहीं; इतकंच नव्हे, तर तें घर कुठं बांधणार याचाही तिला पत्ता लागूं दिला नाहीं. याच वेळीं सरलेला असं दिसून आलं कीं, आपल्या

नवऱ्याचं आपल्यावर पूर्वींप्रमाणें प्रेम नाहीं. आणखी एक वर्षानं अशी एक चमत्कारिक बातमी आली कीं, सरलेच्या चुलत्यानं दुसरं लग्न केलें असून त्याची सर्व मिळकत तिजपासून झालेल्या त्याच्या मुलांकडेच जाणार. "

"ही बातमी कळल्या दिवसापासून माधवरावांचं तिच्यावरील प्रेम उडालं. ते तिच्याशीं धड बोलेतात व पूर्वीपेक्षां अधिक दिवस बाहेर घालवूं लागले. शेवटीं याच्याही पुढं त्यांची मजल गेली. कांहीं ना कांहीं कुरापती काढून ते तिच्याशीं भांडून तिला मारूंही लागले. त्या वेळीं सरलेच्या हृदयाचं पाणी पाणी होऊन जात असे, हें तिनं स्वतःच्या रोजनिशींत लिहिलेल्या शब्दांवरून स्पष्टपणें व्यक्त होत आहे. शेवटीं,जितकी ती पूर्वीं सुखी होती त्याच्या अधिक पटीनें दुःखी झाली. गेला जुलई महिना लागण्यापूर्वीं थोडे दिवस अगोदर तिचा मावसभाऊ दांडेकर हा तिला भेटायला आला.

" तो कोणत्या कारणानं आला होता ?" गजाननरावानीं मध्येंच प्रश्न केला.

"निव्वळ आपणास कुणी तरी जिवाभावाचं माणूस असावं म्हणून. तो सरलेप्रमाणं एकटा व दुःखी असा होता. अर्थात् त्या दोन समदुःखी जीवांची लवकरच मैत्री जमली. पण दांडेकर जरी तिजकडं बऱ्याच वेळां येऊन गेला,तरी त्यानं माधवरावांना कधींच पाहिलं नाहीं. कारण त्या वेळीं ते नेहमी फिरतीवरच असत. अशा रीतीनं तो दूर असतांना सरलेला एक पत्र आलं. त्यांत तिचा चुलता मरण पावला असून त्याची सर्व मिळकत तिलाच दिलेली आहे असं तिला कळवलं होतें. पूर्वीं त्याच्या लग्नासंबंधींची बातमी खोटी होती. सरलेला पैसे मिळाल्यानंतर कांहीं दिवसांनीं मास्तरांनीं सरलेला असं कळवलं कीं, माधवराव हें तिच्या नवऱ्याचं मूळचं नांव नसून शिवाय त्यानीं दुसरं लग्नही केलं होतं. "

" याच वेळीं माधवराव फिरतीवरून आले. सरलेनं त्यांना स्वतःला पैसे मिळाल्याची हकीकत कळवली व त्यांजवर दुसरं लग्न केल्याचा आरोप ठेवून त्याप्रमाणं त्यांना निक्षून विचारलें. त्यांनीं अर्थातच तें

सर्व कांहीं नाकबूल केलं. त्या दिवशीं त्या दोघांचा भयंकर खटका उडाला व शेवटीं माधवराव तें घर सोडून निघून गेले. ते गेल्यानंतर दांडेकर मास्तर तिला भेटायला आला. त्याला तिनं घडलेली हकीकत कळवतांच त्यानं, माधवरावांच्या दुसऱ्या लग्नाची हकीकत पूर्ण खरी असल्याचं तिला शपथपूर्वक सांगून एक दिवस तिला त्याच्या दुसऱ्या घरीं घेऊन जाण्याचं तिला वचन दिलं. मात्र त्यानं तिला माधवरावांचं दुसरं नांव कळवलं नाहीं. त्याच वेळीं त्यानं सरलेला, तिच्या नवऱ्या-जवळ असणाऱ्या चावीसारखीच दुसरी एक चावी करून घ्यायला सांगितलं. कारण ज्या घरांत माधवराव राहत असत त्या घराच्या मुख्य दरवाजाला ती चावी लागली म्हणजे तें घर माधवरावांचंच यांत शंका राहिली नसती, असं त्याचं म्हणणं होतं. सरलेला मास्तरांचा हा बेत पसंत पडून कांहीं दिवसांनीं माधवराव फिरून तिजकडे येतांच तिनं त्यांनीं पश्चात्ताप झाल्यासारखं दर्शवलं व ते निद्रिस्त स्थितींत असतांच त्यांच्याजवळ असलेल्या चावीप्रमाणं दुसरी एक चावी तयार करून घेतली व तीच चावी तिनं मास्तरापाशीं दिली. दांडेकरानं तिथून निघतांना तिला चोवीस तारखेला रात्रीं रत्नमहालांत आपणांस भेटण्या-विषयीं बजावून तो तेथून निघून गेला."

या वेळीं गजाननरावांची स्थिति एकदम चमत्कारिक झाली. त्यांचा अजूनपर्यंत टवटवीत व बेफिकीर असलेला चेहरा एकदम फिकट झाला व ते त्याच स्थितींत एकदम उठून, पुढचें ऐकण्याची आपल्या मनाची पूर्ण तयारी आहे असें जणूं काय दर्शवीत, त्या खोलींत जोरजोरानें इकडून तिकडे फेऱ्या घालीत ओरडून म्हणाले,

"हं, चालूं द्या; पुढं काय असेल तें सर्व सांगा."

"आतां याहूनही अधिक सांगण्यासारखं आहे, असं तुम्हांला वाटतं का?" आपल्या जागेवरून उठून मधुकर म्हणाला, "त्या ठरलेल्या रात्रीं सरला तुमच्या घरीं, तुमच्या रत्नमहालांत गेली. तिथं तिची व दांडेकरांची भेट झाली कीं नाहीं हें सांगतां येणार नाहीं. ठरल्याप्रमाणं ती रत्नमहालांत नऊ वाजण्यापूर्वीं थोडा वेळ त्या किल्लीच्या सहाय्यानं शिरली व जो सफेत दिवाणखाना तिच्या आवडीचा

असून खुद्द तिजकरितांच म्हणून बांधलेला होता त्याच सफेत दिवाण-खान्यांत— ”

“ थांबा ! ” गजाननराव मोठ्यानें ओरडून म्हणाले, या वेळीं त्यांचे ओठ रक्तहीन झालेले असून त्यांचा चेहरा अत्यंत फिकट दिसत होता. “तुमच्या सरलेचा नवरा मीच आहें असंच तुमचं म्हणणं आहे का ?” त्यांनीं कांपऱ्या आवाजांत प्रश्न केला.

“ यांत काय संशय ! माधवराव, माझं म्हणणं तेंच आहे. तुमचं नांव जरी गजाननराव हिंवाळे असं आहे तरी तुम्ही निरपराध सरलेला माधवराव किनखापे असं खोटंच नांव सांगून फसवलंत, पहिल्या लग्नाची बायको जिवंत असतानांच तुम्ही पुन्हा दुसरं लग्न केलंत, यासंबधीं पुरावा पाहिजे असल्यास हा तुमचा व सरलेचा एकत्र काढलेला फोटो पाहा. तुम्ही खोटसाळ, दगलबाज; आणि— ”

“ खुनी ! तो शब्द बोलण्यास ऐवढा वेळ कां लावतां ? बोलून कां टाकीत नाहीं ? ”

“ होय. तुम्हींच खुनी ! ती बिचारी पेटीवर बसली असतांना तिच्या नाजुक मानेंत सुरा खुपसून तिच्या निरपराध रक्तानं हात विटाळणारे गळेकापू तुम्हीच— ”

“ साफ खोटं ! साफ खोटं !! सरलेचा खून मीं केला नाहीं.” एक अस्पष्ट किंकाळी त्यांच्या तोंडून बाहेर पडली व दोन्ही हातांनीं त्यांनीं आपला चेहरा झांकून घेतला.



## प्रकरण १९ वें

# तरीही गूढच !

कमळाकर व मधुकर हे दोघेही निर्विकार स्थितींत खुर्चीवर पडलेल्या गजाननरावांकडे पाहत स्तब्ध उभे होते. गजाननरावांचें सर्व शरीर भयानें थरथर कांपत होतें व त्यांचा चेहरा भीतीनें अगदीं काळा ठिक्कर पडला होता. त्यांच्या त्या वेळच्या एकंदर स्थितीवरून व त्यांच्या चेहऱ्यावर दिसून येत असलेल्या प्रेतकळेवरून गजाननरावच अपराधी असावेत याबद्दल आतां तिळमात्रही संशय घेण्यास जागा नव्हती.

" थोडया वेळानें गजाननराव म्हणाले. " " कमळाकर ! एक क्षणच माझं ऐका. शपथ घेऊन मी सांगतों कीं, मीं सरलेचा प्राणघात मुळींच केला नाहीं."

" ती तुमची पत्नी होती हें तरी तुम्हांला कबूल आहे का ?"

" हो—होय."

" आणि ती तुमच्या घरीं—रत्नमहालांत आली होती हें ?"

" होय."

" आणि तुमची व तिची रत्नमहालांत भेट झाली कीं नाहीं ?"

" होय. पण ती मृतवत् स्थितींत असतांना; रत्नमहालांत मी तिला पाहण्यापूर्वीच तिची प्राणज्योत विझून गेलेली होती."

"हें साफ खोटं आहे" कमलाकरानें त्यांच्या म्हणण्याच्या प्रतिकार करण्याच्या हेतूनें साफ या शब्दावर जोर देऊन म्हटलें.

" नाहीं, हें खोटं नसून अक्षरशः खरं आहे. "

" साफ खोटं. जीव वांचवण्याकरतां तुम्ही खोटं बोलण्याचं धाडस करीत आहां. अपराध केलात खरा. मग आतां असा भ्याडपणा कां ? चांगले शूर धीट माणसासारखे वागा ! तिच्यापासून आपली सुटका करून घेण्यासाठीं तुम्हीं तिचा खून केला कीं नाहीं ? "

" नाहीं; अगदीं शपथपूर्वक सांगतों, कीं मीं तिला मारलं नाहीं. कमळाकर, एवढं घसाफोड करून सांगत असतांनाही तुमचा माझ्या शब्दांवर कां बरं विश्वास बसत नाहीं ? सरला माझी पत्नी होती खरी, पण मीं तिचा खन केला नाहीं. "

" तुमचं पूर्वी लग्न झालेलं आहे हें रमाबाईंना माहित आहे काय ?" कमळाकरानें विचारलें.

" नाहीं."

" त्या रात्रीं तुम्हीं चौपाटीवरून रत्नमहालांत कां आलां होतां ?"

" कारण २४ तारखेला सकाळींच मला सरलेकडून एक पत्र आलं, त्यांत तिनं आपणास माझं घर माहित असून त्याच रात्रीं रमेला भेटावयास स्वत: रत्नमहालांत येणार असं तिनं मला स्पष्ट कळवलं होतं व मीही त्या वेळीं बाहेर न जातां घरींच राहावं म्हणजे खरं काय तें आपोआपच बाहेर येईल, असं मला तिनं त्या पत्रांतून बजावलं होतं. "

" पण तें पत्र तुम्हांला चौपाटीच्या पत्त्यावर कसं आलं ? तिला कांहीं तो पत्ता माहित नव्हता. "

" बरोबर आहे. पण तें पत्र तिनं रत्नमहालाच्याच पत्त्यावर धाडलं होतं व दुसऱ्या दिवशीं आमच्या इतर टपालाबरोबर तें चौपटी-वर आलं. असं झाल्यामुळं मला तें पत्र एक दिवस उशिरानं मिळालं. अगोदर मिळालं असतं तर मीच लोणावळ्याला जाऊन तिची कशी तरी समजूत घातली असती. पण ज्या अर्थी तसं करण्यास सवड नव्हती त्या अर्थी त्या रात्रीं रत्नमहालांत जाण्याशिवाय मला दुसरा उपायच राहिला नाहीं.

"सरला तिकडे रात्रीं आठ व नऊ या दरम्यान येणार असल्यामुळं मी एकदम तिकडे गेलों नाहीं. तोंपर्यंत मीं आजूबाजूलाच वेळ काढला.

पण आठांच्या सुमाराला मी बंगल्याकडे जाणार, तोंच मला माझा एक मित्र भेटला व त्यानं गोष्टी बोलतां बोलतां नऊ वाजेपर्यंत मला खोळंबून ठेवलं. नऊ वाजलेले पाहतांच मात्र मीं तिथून पाय काढला आणि तडक बंगल्याकडे आलों. सर्व बंगल्यांत दाट अंधकार होता. सरला बागेंतच असणार अशी माझी कल्पना असल्यामुळं, मीं बागेंत सर्व ठिकाणीं पाहिलं, पण त्या ठिकाणीं ती नव्हती."

"पण तिच्याशीं चावी होती हें तुम्हांला माहित होतं का?"

"नाहीं. महालाच्या किल्लीसंबंधाचा उल्लेख तिनं पत्रांतून कांहींच केला नसल्यामुळं ती कल्पनाच मला आली नाहीं. ती कुठं असावी हा मला तर्कच करतां येईना. शेवटीं त्या जागीं यायला मला उशीर झालेला पाहून ती निघून गेली असावी असा तर्क करून मी परत फिरलों, पण जवळ आल्यासारखं एकदा बंगल्यांतून जाऊन यावं असं मनांत आल्यामुळं मी दरवाजा उघडून तसाच वर गेलों. वरच्या सफेत दिवाणखान्यांत जातों तोंच सरला मला तिथंच मृतवत् स्थितींत पडलेली आढळली!"

"मृतवत् स्थितींत?" मधुकरानें प्रश्न केला, "तुम्ही तसं शपथपूर्वक सांगतां?"

"होय. ती बाजाच्या पेटीसमोरील खुर्चीतच गतप्राण होऊन पडलेली होती.तिच्यावर कुणी तरी मागून हल्ला करून तिचा प्राण घेतला असावा. तिचं मस्तक पेटीवर टेकलेलं होतं. त्या वेळीं बरोबर सवानऊ वाजलेले होते. मीं सर्व बंगला धुंडाळला, पण आंत चिटपाखरूंही आढळून आलं नाहीं. दरवाजांच्या कड्या जशाच्या तशा होत्या. साडेनऊ वाजायच्या सुमाराला मीं दरवाजावर बेल वाजलेली ऐकली. त्या वेळीं मला इतकी कांहीं भीति वाटली, कीं तिचं वर्णन करतां येणं शक्य नाहीं! मयत स्त्रीपाशीं मला पाहतांच मला पकडून नेण्यांत येईल ही कल्पनाच माझ्यानं करवेना. माझी त्या वेळीं भयंकर गाळण उडाली!"

"आणि तुम्हांला त्याच वेळीं पकडलं नाहीं हें खरोखरच फार वाईट झालं," कमळाकर म्हणाला.

" साडेनऊ वाजतां दरवाजावर बेल वाजली ना ?" मधुकर विचार करून म्हणाला, "मग ती नलिनीच असावी, असं मला वाटतं. कारण, त्याच वेळेस रत्नमहालांत भेटण्याचं तिनं मला लिहिलं होतं. बराच वेळ वाट पाहून कुणी दरवाजा उघडीत नाहीं असं समजतांच ती कंटाळून निघून गेली असावी."

गजाननरावांनीं मधुकराकडे एकदम दचकून पाहिलें, "नलिनी !" ते आश्चर्यचकित होऊन म्हणाले, " त्या वेळीं नलिनीचं तिकडे काय काम होतं ? तुम्हीं आला होतां तें मला माहित आहे; पण नलिनी—"

" पण मी तिथं आलों होतों तें तुम्हांला काय ठाऊक ? " मधुकरानें चटकन् प्रश्न केला.

" मीं तुम्हांला पाहिलं. "

" केव्हां ? "

" सफेत दिवाणखान्यांत सरलेच्या प्रेताकडे पाहत असतांना. "

" एकूण त्या वेळीं तुम्हीं रत्नमहालांतच होतां ? "

" होय. " गजाननरावांनीं अंग थरारून उत्तर दिलें. " दरवाजावर बेल वाजल्यानंतर बराच वेळ मीं वाट पाहिली व मग कुणी येत नाहीं अशी खात्री झाल्यानंतर मी सफेत दिवाणखान्यांत सरलेच्या निर्जीव प्रेताजवळ येऊन एक नाटकी खंजीर पडला होता तो घेतला. "

" काय ? नाटकी खंजीर ? "

" होय. त्या वेळीं तो नाटकी होता हें मला माहित नव्हतं. मीं तो घेऊन मागच्या बाजूला गेलों व कुणाला तो दिसूं नये अशा रीतीनं तो वर एका कोनाड्यांत फेकून दिला. तो बरोबर घेण्यास साहजिकच मला भीति वाटत होती. कारण, तो खंजीर व त्या सरलेशीं असलेला माझा संबंध हीं दोन्हीही मला फांसावर लटकवण्यास सबळ कारणं होतीं. तो खंजीर कोनाड्यांत फेकल्यानंतर फिरून बाहेर येत असतां मला जिन्यावर पावलं ऐकूं आलीं. "

" कुणाची पावलं ? "

" तें कांहीं निश्चित असं सांगतां येणार नाहीं. तरी साडेदहा वाजून जाईपर्यंत मी घराबाहेर पडलों नाहीं. पुढचा दरवाजा बंद झालेला

ऐकतांच मी बाहेर पडलों व सफेत दिवाणखान्यांत आलों. आतां बाहेर पडून या घोटाळ्यांतून निसटावं कसं, याचा विचार करणं मला जरूर होतं. अशा रीतीनं कांहीं वेळ विचार करीत असतां मला पुन्हा दर-वाजा वाजलेला ऐकूं आला.मी आंतल्या खोलींत लपून राहतों न राहतों तोंच मधुकर तुम्हांला आलेले मीं पाहिलं. त्या प्रेताकडे पाहतांच तुम्ही केवढयानं तरी दचकलांत व सरलेला तुम्हीं ओळखलंत असा माझा समज झाला. तुमची व तिची ओळख होती हें पाहून मला फारच आश्चर्य वाटलं."

"सर्वत्र शांत झाल्यावर मी बाहेर पडलों." गजाननरावांनीं आपली हकीकत पुढें चालू केली, "नंतर त्या प्रेताचा दहनविधि झाल्यावर मी लोणावळ्याला जाऊन, माझं व सरलेचं नातं उघडकीस आणणाऱ्या एकूण एक वस्तु नाहींशा करून टाकल्या."

" हं, चालू द्या. पुढं, मला पाहिल्यानंतर काय केलंत ? "

मधुकर म्हणाला, " तसाच मी लपून राहिलों होतों. कांहीं वेळानं तुम्ही खालीं उतरलां. ज्या अर्थी तुम्हीं सरलेला ओळखलं त्या अर्थी पकडले जाण्याच्या भीतीनं तुम्ही पोलिसला बोलवणार नाहीं, अशी माझी खात्री झाली. तुम्हीं खालीं उतरल्यानंतर मी तसाच खिडकींतून तुम्हांला बाहेर जातांना पाहूं लागलों. त्याच वेळीं मला तो पोलिस शिपाई फुटपाथवर दिसला. त्याला पाहतांच, त्याला कसलाही संशय येऊं नये व तुम्हांलाही जाण्यांत अडथळा येऊं नये म्हणून मीं ग्रामो-फोन सुरू केला."

" तरीच ! त्या वेळीं एकदम ग्रामोफोन सुरू कसा झाला याचंच मला आश्चर्य वाटत होतं, गजाननराव. त्या वेळीं मला फारच भीति वाटली हें मी कबूल करतों. "

" तसं मला वाटलंच होतं. तुम्ही पोलिस हवालदाराशीं बोलत उभे राहिलां. नंतर बोलत बोलत त्याला बरंच दूर नेलंत वगैरे तुमच्या सर्व हालचाली मीं वरून पहिल्या. तुम्ही दूर गेलां असं पाहून मी त्या बंग-ल्यांतून सटकून रस्त्यावर आलों. तिथून थोडी दूर एक मोटरगाडी उभी होती — "

" ती माझीच गाडी." कमळाकर म्हणाला, " तींत बसून तुम्ही ठाणें स्टेशनवर गेलां. "

गजाननरावांनीं होकारार्थी मान हालविली. ते म्हणाले "ती मोटर ठाणें स्टेशनवरच टाकून मुंबईस येणारी लोकल मीं गांठली. पुढचं तुम्हांला माहीत आहेच."

" नाहीं; सरलेचा खून कुणीं केला तें माहित नाहीं." मधुकर म्हणाला.

" तें मात्र मी तुम्हाला सांगूं शकत नाहीं. कारण, मी रत्नमहालांत जाऊन पोहोंचण्यापूर्वीच तिचा खून झाला होता. अर्थात् नऊ वाजल्यानंतर आलेल्या माणसाकडून तिचा खून झालेला नाहीं, हें सिद्ध झालंच."

" पण मध्यंतरी जिन्यावर वाजलेलीं पावलं कुणाचीं होतीं ! "

" तेंही मला माहित नाहीं. तसंच, सरलेचा खून कुणी केला तेंही माहित नाहीं. दुसऱ्या दिवशीं जेव्हां तें कृत्य उघडकीला आलं, तेव्हां मीं रत्नमहालांत येऊन त्या इन्स्पेक्टरला थापा मारून चांगलाच बनवला व त्यानंतर लोणावळ्याला जाऊन तिकडचाही पुरावा नाहींसा करून टाकला."

" पण सरलेचा खून कोणीं केला हें शोधून काढण्याजोगा कांहींच पुरावा तुम्हांला त्या वेळीं मिळाला नाहीं का ? "

गजाननराव सांगण्यास जरा कांकूं करूं लागले, " मला स्पष्ट असं कांहींच सांगतां येणार नाहीं," ते आपले खिसे चाचपत म्हणाले, " पण ज्या अर्थीं तुम्हांला मीं इतकं सांगितलं त्या अर्थीं आतां सर्व कांहीं सांगतों. "

गजाननरावांनीं खिशांतून एक लांब सांखळी काढली. त्या सांखळीच्या एका टोंकाला एक सोन्याचें लहानसें 'लॉकेट' असून तें दिसण्यांत मनोहर होतें. " हें मला सरलेच्या हातांत अडकलेलं आढळलं." तें दाखवीत गजननराव म्हणाले, "मला वाटतं, खुनी माणसानं जेव्हां तिच्यावर हल्ला केला, तेव्हां तिनं त्याच्या गळ्यांतलं हें लॉकेल पकडलं असावं. "

" एकंदरींत खुनापूर्वी त्या ठिकाणीं थोडी झटापट झाली असं मानायला हरकत नाहीं." मधुकर लॉकेट आपल्या हातीं घेत म्हणाला. तें हातांत घेऊन त्यानें उघडलें. लॉकेट उघडून आंतील फोटो पाहतांच मधुकराच्या तोंडून एक चमत्कारिक उद्गार बाहेर पडला. त्यानें तें ताबडतोब कमळाकराच्या हातीं दिलें.

तें चित्र पाहतांच कमळाकरही एकदम दचकला. कारण त्या लॉकेटमध्यें सरोजिनीबाईचा फोटो होता.

" हें कृत्य कुणा तरी स्त्रीचं आहे असं मला पूर्वींपासूनच वाटत होतं." त्या फोटोकडे पाहत कमळाकर म्हणाला, " पण सरोजिनी-बाईचा त्यांत संबंध असेल असं मला केव्हांही वाटलं नव्हतं. पण कुणी सांगावं ! तिनंही हा खून केला असेल. आली असेल वेडाची लहर !"



प्रकरण २० वें

# खरा खुनी

आपल्या पतीस पुन्हा एकदा पाहिल्यामुळें सरोजिनीबाईची स्थिति आजकाल थोडीशी खालावल्यासारखी झाली होती. बाहेरून ती जरी पूर्ण बेफिकीर वृत्ति व धैर्य दाखवीत असे, तरी तो पुन्हा येऊन आपल्यासमोर उभा राहील कीं काय, ह्या नुसत्या कल्पनेनेंच तिचें सर्वांग थरारून जात असे ! पूर्वीच्या अनुभवावरून आत्मारामपंत किती पाषाणहृदयाचे आहेत, याची तिला चांगलीच प्रचीति आली होती. पैशासाठीं तो गृहस्थ खूनही करण्यास मागेंपुढें पाहणार नाहीं, अशी तिची पूर्ण खात्री होती. वास्तविक पाहतां आत्मारामपंतांना तिच्या एका कपर्दिकेसही हात लावतां आला नसता. सरोजिनीबाईच्या मालकीची सर्व जिंदगी तिच्या बापापासून तिला मिळाली असल्यामुळें त्यावर आत्मारामपंतांचा तिच्या हयातींत कसलाच हक्क नसून त्या बाबतींत त्यांचें कांहीं एक चालण्यासारखें नव्हतें. परंतु ती इस्टेट आपल्या घशाखालीं उतरविण्यासाठीं वाटेल तें क्रूर कर्म करण्यास आत्मारामपंत यत्किंचितही माघार घेणार नाहीं, व त्यापायीं, आपला स्वतःचा अमानुषपणें छळ करून–वेळ आलीच तर खूनही करून व आपल्या पोरांबाळांना भिकेस लावून स्वतःची भर करण्यास ते बिलकुल डगमगणार नाहींत, या विचारामुळें त्यांना एक प्रकारची दहशत बसून गेली होती व म्हणूनच स्वसंरक्षणासाठीं त्या आपल्याजवळ नेहमी सुरा बाळगीत असत.

इतक्यांत बाहेर पावलांचा आवाज ऐकूं आला व कमळाकर व मधुकर आंत आले. त्या दोघांना खोलींत आलेले पाहतांच तिला आत्मारामपंत आल्याचाच भास होऊन, सुरा काढण्याकरितां तिनें आपल्या उशाखालीं हात घातला. परंतु आपणांस भासल्याप्रमाणें आंत आलेला गृहस्थ आत्मारामपंत नसून, आपला भावि जामात, कमळाकर व त्याच्याबरोबर त्याचा मित्र मधुकर आहे, असें जेव्हां तिला समजलें, तेव्हां तिनें उशाखालचा आपला हात काढून मंदस्मित करून त्यांचें यथोचित स्वागत केलें. परंतु तिच्या त्या दचकण्याचा परिणाम तिच्या चेहऱ्यावर दिसल्यावांचून राहिला नाहीं. तो पांढरा फटफटीत दिसूं लागला व तो फरक कमळाकराच्या काकदृष्टींतून निसटणें शक्यच नव्हतें.

" त्यानंतर आत्मारामपंतांकडून तुम्हांला कांहीं त्रास झालेला नाहीं ना ? " कमळाकरानें सुरवात केली.

" नाहीं," मंदस्मित करीत सरोजिनीबाई म्हणाल्या, " त्यानंतर पुन्हा ते माझ्या वाऱ्याला देखील उभे राहिले नाहींत. पण ते जर आतां पुन्हा दिसले तर—" बोलतां बोलतां त्यांच्या डोळ्यांत खुनशीपणाची चमक मारूं लागली—"आतां मी मुलींच घ्यायची गाहीं." हळू हळू त्यांनीं आपला आवेश आवरला व थोडेंसें हसून मधुकराकडे पाहत त्याला दोन औपचारिक प्रश्न केले.

मधुकर म्हणाला, "मी तुम्हांला हेंच दाखवण्याकरतां आलों होतों." गजाननरावांकडून मिळालेलें तें सोन्याचें लॉकेट पुढें करीत मधुकर म्हणाला. परंतु मधुकराचें वाक्य पुरें होतें न होतें तोंच सरोजिनीबाईंनीं तें पदक ओळखून एक आरोळी ठोकली व एकदम मधुकराचा दंड पकडीत म्हटलें,

" कुठं आहे तो ? बाहेर आहे का ? जर तो तिथंच असला तर-तर." असें म्हणून तिनें उशीखालून आपला सुरा काढला.

" अहो, करतां तरी काय हें !" मागें सरकत मधुकर म्हणाला.

" मला वाटतं, हें लॉकेट आत्मारामपंतांचं—तिच्या नवऱ्याचं—असावं. " कमळाकर म्हणाला.

" होय. तुमचं म्हणणं बरोबर आहे. तें त्यांचंच आहे. " क्षणांत दरवाजाकडे तर क्षणांत खिडकीकडे पाहत सरोजिनीबाई म्हणाल्या, " ते कुठं आहेत ? " त्यांच्या हातांत सुरा अद्यापही होताच.

त्यांनीं पुन्हा एकदा दचकून विचारलें.

" हां हां ! असं आकांडतांडव करूं नका. ते कांहीं इथं नाहींत." सरोजिनीबाईंना थोपवीत कमळाकर म्हणाला; त्यानें त्यांच्या हातचा सुरा घेण्याचा प्रयत्न केला, परंतु सरोजिनीबाईंच्या हेकेखोरपणामुळें त्याचें कांहीं एक चाललें नाहीं.

" आत्मारामपंतांची आठवण झाल्यामुळं हिचं डोकं फिरून गेलं आहे एवढंच ! " मधुकर त्रासून म्हणाला, " त्या लॉकेटविषयीं तिला आतां स्पष्टच विचार पाहूं. "

" होय–होय ! तेंच–तेंच लॉकेट मीं त्यांना दिलं होतं. " तें लॉकेट पाहून सरोजिनीबाई सांगूं लागल्या, " पहिल्या पहिल्यानें ते माझ्याशीं फारच चांगल्या रीतीनं वागत असत; त्या वेळीं मीं तें लॉकेट त्यांना दिलं होतं. पण हें तुम्हांला कुठं सांपडलं ? त्यांच्याकडे का ? ते जिवंत आहेत ना ? "

तिच्या बडबडीकडे लक्ष न देतां कमळाकर म्हणाला —

" आत्मारामपंतांच्या रंगरूपाचं थोडंसं वर्णन कराल का ? "

" न करायला काय झालं ! ते अंगानं लठ्ठ असून त्यांचा चेहरा वाटोळा व तांबुस आहे. पाहणाऱ्याला ते नेहमी हंसतमुख दिसतात व चेहऱ्यावरून ते दयाळू व उदार असावेत असं प्रथम वाटतं. पण अंतःकरणाचे पाषाण, बेरड, दुष्ट, मांग— "

"काय रे कमळाकर, हें तर रामसिंगाच्याच रूपाचं वर्णन दिसतं !" मधुकर कमळाकराकडे पाहत म्हणाला.

" आतां प्रथम रामसिंगाचीच भेट घेतली पाहिजे. सकाळीं दांडेकर मास्तर म्हणत होते ना, कीं आज रात्रीं रामसिंग आपल्याकडे येणार आहे म्हणून ? तिथंच जाऊन भेटूं या आपण त्यांना. मास्तरदेखील आपल्यापासून कांहीं तरी खास चोरून ठेवीत आहेत. " कमळाकर म्हणाला.

मास्तरांची पर्णकुटी सरोजिनीबाईंच्या बंगल्यापासून पांच मिनिटांच्या रस्त्यावर होती. थोड्याच वेळांत मधुकर व कमळाकर मास्तरांच्या घरीं आले. रामसिंग आला नाहीं, हें त्यांना मास्तरांकडून समजलें. अर्थात् त्याची वाट पाहत ते तिघेही खुनासंबंधींच्याच गोष्टी बोलत बसले. मास्तरही पैशाच्या व स्वतःच्या बचावाच्या आशेनें मधुकराचीच बाजू उचलून धरीत होते.

" पण आज सकाळीं तुम्ही आम्हांला सर्व कांहीं सांगितलं नाहीं! " मास्तरांकडे वळून मधुकर म्हणाला.

" आणखी जें कांहीं सांगायचं राहिलं असेल तें आतां रामसिंग आल्यावर त्याच्याच समक्ष सांगेन." मास्तर जरा बेपर्वाईनेंच म्हणाले, " व जें कांहीं सांगणार आहें तें त्याच्याविरुद्ध असल्यामुळं ती एक तुमच्या बाजूची त्याच्यासमक्ष साक्षही होईल."

" पण काय हो मास्तर, त्याला तुम्ही रामसिंग या नांवानं कां हाक मारतां ? " कमळाकरानें विचारलें.

" म्हणजे ! त्याला दुसरं एखादं नांव आहे कीं काय ?" मास्तरांनीं विचारलें.

"अहो, एखादंच कां, अनेक आहेत." कमळाकर पुटपुटत म्हणाला, सरोजिनीबाईंच्या पतीचें गुह्य आपण बाहेर फोडूं नये, अशा विचारानें तो पुढें कांहीं न बोलतां स्वस्थ राहिला. मास्तरांना रामसिंग हा फक्त गुप्त पोलिसच आहे, याशिवाय त्याच्याविषयीं दुसरें कांहीं एक कळलेलें नाहीं, हें पाहून त्याला समाधानच वाटलें.

थोड्याच वेळांत त्यांना दरवाजावर थाप ऐकूं आली व मास्तरांनीं दरवाजा उघडतांच रामसिंग आंत आला.

रामसिंग आंत येतांच एका सभ्य गृहस्थाप्रमाणें जवळच असलेली एक खुर्ची पुढें ओढून तीवर बसला. या वेळीं त्याचा चेहरा नेहमीप्रमाणें वाटोळा, गरगरीत व तांबुस दिसत होता. खुर्चीवर बसण्यापूर्वी त्यानें मोठ्या ऐटीनें सर्वांशीं मोकळ्या अंतःकरणानें हस्तांदोलन केलें.

"मधुकर, तुम्हीही इथंच आहांत हें बरं झालं." रामसिंगानें प्रथम

बोलण्यास सुरवात केली, "मला तुमच्याशीं बरंच बोलायचं आहे. पण तुमचं इथं येण्याचं कारण नाहीं समजलं !"

"ह्या खुनासंबंधानंच थोडंसं गूढ आम्हांला उकललं आहे," मधुकर म्हणाला, "व त्यासंबंधानंच थोडा खल करण्याकरतां आम्ही इथं आलों आहोंत."

"अस्सं." बेदरकारपणानें रामसिंगानें विचारलें, "अच्छा ! तुम्ही काय हुडकलंत तें तर ऐकूंया !"

"पण त्याआधीं तुम्हीं काय शोध लावला तो आम्हाला समजला पाहिजे."

"ठीक आहे." पेटत असलेल्या कंदिलाकडे सारखी नजर भिडवीत रामसिंगानें उत्तर दिलें, "एकंदर चौकशीअंतीं माझा असा तर्क होतो कीं, तो खून गजाननरावाच्याच हातून घडला. ते त्या रात्रीं चौपाटीवरून रत्नमहालांत आले होते, ही गोष्ट खरी आहे. इतकंच नव्हे, तर मयत स्त्रीची व त्यांची ओळखही होती."

"ती कुठची ?" मधुकरानें शांतपणें विचारलें.

"ती त्यांची बायको होती, असं मला समजलं आहे."

"तुम्हांला जें माहित आहे तें सर्व सरळ कां सांगून टाकीत नाहीं ? असे लपंडाव कां ?" कमळाकरानें मध्येंच विचारलें, "ती त्यांची पत्नी होती, हें तुम्हांला मास्तरांकडूनच समजलं असा माझा तर्क आहे."

"मास्तरांकडून !" एकदम संशय आल्यामुळें रामसिंगानें आश्चर्यचकित झाल्यासारखें दर्शवून विचारलें, "मला मास्तरांकडून काय समजलं ?"

"जें आतां तुम्ही म्हणाला तेंच." आपल्या जागेवरून उठून मास्तर म्हणाले, "मला जें कांहीं माहित होतं तें सर्व यांना सांगून टाकलं आहे, आणि—"

"हं ! सटकतां येणार नाहीं." रामसिंग दरवाजाकडे सरकत असलेला पाहून त्याच्याआड येऊन कमळाकरानें म्हटलें, "इतकी घाई कामाची नाहीं."

रामसिंगानें आपली थोडीशी खवळलेली वृत्ति पूर्वींप्रमाणें शांत करण्याचा प्रयत्न केला, " मला वाटतं तुम्ही माझी थट्टा करीत आहांत. " कपाळावरचा घाम पुशीत व त्या दोघांच्या तीक्ष्ण नजरेकडे आपली नजर भिडवीत तो म्हणाला, "दांडेकरांना काय माहित आहे ? "

" सर्व कांहीं माहित आहे. " मधुकराचा आश्रय घेण्यासाठीं त्याच्या पाठीमागें राहून मास्तर म्हणाले, " स्वतःच्या नांवचं मृत्युपत्र सरलेला करण्यास लावण्याची युक्ति तुम्हींच सुचवलीत; गजाननरावांजवळ असलेल्या चावीसारख्याच दुसऱ्या चाव्या तयार करावयाच्या ही देखील तुमचीच कल्पना; मधुकर व नलिनी यांना बनावट पत्रं लिहून खुनाच्या जाळ्यांत अडकवण्यासाठीं त्यांना त्या रात्रीं रत्नमहालांत तुम्हींच आणलंत, वगैरे सर्व कांहीं मला ठाउक आहे बरं ! रामसिंग, तुमचा हेतु दुष्ट असेल, तुमच्या मनांत खुनाची कल्पना खेळत असेल, असं त्या वेळीं मला केव्हांही वाटलं नव्हतं. मला तुमच्या दुष्ट वासनेचा जर यत्किंचित् सुगावा लागता, तर मी तुमच्या बेतांत कधींही सामील झालों नसतों. "

" हें सर्व खोटं आहे. हा माझ्यावर निवळ आळ आहे. " अस्पष्ट स्वरांत रामसिंग ओरडला.

"शब्दान् शब्द अक्षरशः खरा आहे, समजलांत ? इतकंच नव्हे, तर तिचा खून झालेला पाहून मी तुम्हांलाच गुप्त पोलिस म्हणून नेमून त्या खटल्याची वाटेल त्या रीतीनं तुमच्या इच्छेप्रमाणें वासलात लावावी हें सुद्धा आम्हीं नंतर ठरवलं होतं. सरलेनं आमच्या नकळत आपलं मृत्युपत्र बदलल्यामुळं तुम्हांला व मला मिळणाऱ्या पैशांच्या आड मधुकर आला, हें पाहतांच खुनाचा सर्व आळ त्यांच्याच अंगावर ढकलावा, हीसुद्धा तुमचीच कल्पना नाहीं का ? "

" यांतून मला बाहेर पडलंच पाहिजे, " असें स्वतःशीं पुटपुटत त्यानें आपली नजर खिडकीकडे वळविली व तिकडे पाहतांच एकदम दचकल्यासारखें करून तो मोठ्यानें ओरडून म्हणाला, " तें पाहा, तें पाहा ! खिडकींतून कोण डोकावीत आहे तें ?"

त्याच्या ह्या आकस्मिक ओरडण्यानें भांबावून जाऊन त्या खोलींत सर्वांची नजर त्यानें दाखविलेल्या खिडकीकडे वळली. त्यांना एक क्षणच गैरसावध स्थितींत पाहतांच रामसिंगानें मेजावरील एक जड वजन घेऊन जोरानें समोरील कंदिलावर मारून आपण एकदम बाहेर पळत सुटला. वजन कंदिलावर आपटल्यामुळें तो विझून त्याच्या कांचेचे एकदम तुकडे झाले व कंदिलावरून तें वजन निसटून जवळच उभ्या असलेल्या मास्तरांच्या कपाळावर आदळल्यामुळें त्याला मोठी खोंक पडून त्या जखमेंतून भळभळा रक्त वाहूं लागलें! वजन कपाळावर आदळतांच एक मोठी किंकाळी फोडून मास्तर बेशुद्ध होऊन धाडकन् जमिनीवर पडले. डोळ्याचें पातें लवतें न लवतें तोंच त्या खोलींत सर्व गोंधळ उडाला!!

आपणास अशा अचानक रीतीनें फसवून रामसिंग पळालेला पाहून कमळाकर मोठ्या त्वेषानें त्याचा पाठलाग करण्यासाठीं तसाच बाहेर पडला, आणि मास्तरांची शुश्रूषा करण्यासाठीं मधुकर घरांतच राहिला. आपल्याकडून होईल तितका जोर करून कमळाकर त्या कुरणांतून रामसिंगाच्या मागें पळूं लागला. परंतु थोडीं पावलें दूर गेला नसेल तोंच एका झाडाच्या बुंध्याला अडखळून तो जमिनीवर आदळला. त्यामुळें त्याचें सर्वांग ठेंचाळून गेले. अशी स्थिति झाल्यामुळें त्यानें पोलिसांच्या भयानें रामसिंगाला दूर पळतां येणें शक्य नाहीं, असा विचार करून मास्तरांच्याच घरचा रस्ता धरला.

रामसिंग जो घरांतून पळाला तो तसाच उघडाबोडका कुरणांतून सरोजिनीबाईच्या घराच्या दिशेकडे पळूं लागला. रस्त्यावरून उघडेंबोडकें पळाल्यास कदाचित् पोलिसांना संशय येईल म्हणून त्यानें आपल्या सुरक्षिततेसाठीं हीच वाट एकदम धरली. सरोजिनीबाईचा बंगला येतांच त्यानें कंपौंडांतून एकदम आंत उडी घेऊन बंगल्याची वाट धरली. त्याचा बेत आतां सरोजिनीबाईकडे जाऊन, तिची कृतापराधाबद्दल क्षमा मागून तिच्या आश्रयाला राहण्याचा होता.

कंपौंडाच्या भिंतीवरून उडी मारून आंत आल्यावर रामसिंगानें सरोजिनीच्या खोलीच्या खिडकीची वाट धरली. आपला हेतु साध्य करून घेण्यासाठीं त्यानें तिच्या बसण्याउठण्याच्या जागेची सर्व माहिती अगोदर करून घेतली होती. खिडकीपाशीं येतांच त्यानें ती प्रथम हळू-हळू ठोकून पाहिली. आंतून कांहींच उत्तर येत नाहीं असें पाहून आंत काय चाललें आहे तें समजण्याकरतां त्यानें खिडकीच्या बारीक फटींतून आंत पाहिलें. खिडकी ठोकल्याचा आवाज ऐकतांच सरोजिनी एकदम उठून त्या दिशेकडे डोळे वटारून पाहत होती व तिचा एक हात उशीखालीं गेला होता. आंतून उत्तर येत नाहीं असें पाहून रामसिंगानें पुन्हा एकदा मोठ्यानें ठोकलें. त्याला आतां कसला तरी आवाज ऐकूं येऊं लागल्यामुळें धीर होईना व त्याच्या चोरून येण्याचा सुगावा लागल्यामुळें त्या बागेंतला कुत्राही त्याच्या अंगावर मोठमोठ्यानें भुंकून तुटून पडण्याचा प्रयत्न करीत होता.

"कोण आहे तें?" आंतून प्रश्न आला.

"सरू, मी तो—आत्माराम. मला आंत घे. मी अत्यंत संकटांत सांपडलों आहें."

"नाहीं. चालते व्हा इथून. नाहीं तर चोर चोर म्हणून सर्वांना ओरडून जागे करीन." आंतून उत्तर आलें.

परंतु रामसिंगाला आतां मागें परतणें शक्य नव्हतें. एक तर त्याला आपला जारीनें पाठलाग होत आहे असें वाटत होतें व खिडकीखालीं भुंकत असलेला 'बुल-डॉग' त्याच्या अंगावर उडी घेण्याच्या अगदीं तयारींत होता. त्यानें आंत घेण्याविषयीं सरोजिनीची पुष्कळ मनधरणी केली; परंतु तिनें त्याच्या विनंतीस मुळींच भीक घातली नाहीं. शेवटीं संतापून जाऊन त्यानें खिडकीवर आपल्या सर्व अंगाचा मोठ्यानें प्रहार केला, त्याबरोबर खिडकीच्या सर्व कांचा खळाखळ फुटून खालीं पडल्या व त्याचा आंत जाण्याचा मार्ग मोकळा झाला! आंत जाण्यासाठीं रामसिंगानें खिडकी उघडून एकदम उडी मारली; त्याचा पाय जमिनीस लागतो न लागतो तोंच संतापानें बेहोष झालेल्या

सरोजिनीनें आपल्या हातांतला सुरा एकदम त्याच्या पाठींत खुपसला ! एक भयंकर किंकाळी फोडून रामसिंग ऊर्फ आत्माराम त्याच क्षणीं निचेष्ट होऊन जमिनीवर कोसळला. ! !

"खुनी ! बेरड ! ! दरोडेखोर ! ! ! काय पण धारिष्ट ! द्रोडा घालायला आला होता !" सरोजिनीबाई वेड्यासारखे हातवारे करीत मोठमोठ्यानें ओरडूं लागल्या, "आतां मला भीति नाहीं; हाः हाः ! बोलतां बोलतां त्यांच्या तोंडांतून फेसाचा लोळ येऊन त्याही रामसिंगाच्याच शरीरावर धाडकन् बेशुद्ध होऊन पडल्या.

सरोजिनीबाईची ओरड ऐकतांच शरयू वगैरे घरांतील सर्व मंडळी त्या खोलींत धांवून आली. परंतु त्यांना खोलींत काय दिसलें ! रामसिंग रक्तबंबाळ होऊन पडलेला असून त्याच्या शरीरावरच सरोजिनीबाई गतप्राण होऊन पडल्या आहेत. कोणीही आत्मारामपंतांस ओळखलें नाहीं, व सर्वांची समजूत दरोडेखोराशीं लढतांनाच सरोजिनीला मृत्यु आला अशीच झाली.



# शेवटीं—

रामसिगानें मरणापूर्वी आपली सर्व हकीकत कमळाकर व मधुकर यांना सांगितली ती अशीः—

" मी, आत्माराम भवाने, अगर दुसऱ्या नांवानें ओळख असलेला, रहस्यभेदक रामसिंग, शपथपूर्वक कबूल करतों कीं, खालीं दिलेली सर्व हकीकत अक्षरशः खरी आहे.

" माझ्या पत्नीनें नवीनच खरेदी केलेल्या घराभोंवतीं मी नेहमीं-प्रमाणें घिरट्या घालीत फिरत असतां एके दिवशीं माझी व दांडेकर मास्तरांची गांठ पडली. गप्पा मारण्याच्या निमित्तानें मीं त्याची चांगली ओळख करून घेतली व मी त्यांच्या घरीं वरचेवर जाऊं लागलों. त्यांना मात्र मी सरोजिनीचा पति आहें हें मुळींच कळ-विलें नव्हतें. जसजसी आमची मैत्री वृद्धिंगत होत चालली तसतशा ते आपल्या खाजगी गोष्टीही मजपाशीं सांगूं लागले. बोलतां बोलतां एके दिवशीं त्यांनीं सरलेला मिळणाऱ्या मिळकतीची हकीकत मला कळवून सरलेचा पति व गजाननराव हे दोघे एकच असल्याचें मला सांगितलें. असा विचित्र योगायोग एकदम आलेला पाहून मला पैसा मिळविण्याचा मार्ग सुचला व मास्तरांना माझ्या हातांतलें बाहुलें बन-वून त्यांना मी माझ्या करामतीवर वाटेल तसा नाचवूं लागलों. कांहीं दिवस गेल्यानंतर मीं त्यांना गजाननरावांची हकीकत सरलेच्या कानां-वर घालण्यास सांगून जर आपणांस त्या दोघांना एकाच वेळीं रत्न-महालांत आणतां आलें तर त्यापासून आपणाला पुष्कळ अर्थलाभ होईल असें सुचविलें. त्या वेळीं माझ्या मनांत खनाची कल्पना घोळत असेल

अशी कल्पना मास्तरांना शिवलीसुद्धा नाहीं. त्यांचा फक्त असा समज होता कीं, माझ्या मनांतून गजाननराव व सरला ह्या दोघांना एके ठिकाणीं आणून तेथें आपण एकदम जावयाचें व त्यांच्या एकांताची गोष्ट रमाबाईच्या कानीं घालण्याची भीति गजाननरावांना घालून त्यांच्याकडून पैसे उपटावयाचे असें आहे. पैशाच्या फिकीरींत असल्या-मुळें दांडेकरांनीं माझें म्हणणें तावडतोब कबूल केलें.

" परंतु माझ्या मनांतून सरलेला मास्तरांच्या नांवचें मृत्युपत्र करावयास लावून नंतर तिचा अनाचक प्राणघात करावयाचा असें होतें. त्यामुळें मास्तरांना मिळणाऱ्या मिळकतीचा कांहीं भाग मला सहज उपभोगितां आला असता. तसेंच त्यांना त्या खुनाच्या वेळीं रत्नमहालांत नेऊन ते माझ्या जाळ्यांत सांपडल्यानंतर खुनाच्या पुराव्याचें भरपूर माप त्यांच्या पदरांत घालून त्याच निमित्तानें त्यांचेही पैसे उकळावे, हाही बेत मीं त्या वेळीं मनांत योजलेला होता. इतकेंही करून फसलें तर मधुकर, नलिनी व गजाननराव यांना रत्नमहालांत आणवून त्यांनाही या खुनांत गुंतवावें असें मीं ठरविलें.

" माझ्या मनांत कसलेंच कपट अगर कसलाच विश्वासघात कर-ण्याचें नाहीं असें पाहून मास्तरांनीं मी सांगितल्याप्रमाणें सर्व कांहीं केलें. प्रथम त्यांनीं सरलेकडून गजाननराव लोणावळ्यास असतांना, त्यांच्याकडे असणाऱ्या रत्नमहालाच्या मुख्य चावीसारखी दुसरी चावी करवून घेतली व त्या चावीवरून मीं त्यांच्याकडून तसल्याच आणखी तीन चाव्या करून घेतल्या. त्यांपैकीं एक त्यानें सरलेस देऊन दुसरी आपण ठेविली व तिसरी तशीच खोलींतील भिंतीस अडकवून ठेविली. एके दिवशीं त्यांची नजर नाहीं असें पाहून मीं ती तेथून लांबविली. परंतु त्यांना ती मींच घेतली असें मुळींच कळूं दिलें नाहीं. ती चोरलेली किल्ली मीं नलिनीच्या सहीचें एक बनावट पत्र लिहून, त्यांतून मधुकरास पाठविली. त्या पत्रांतच, त्यानें त्या रात्रीं नऊ वाजण्याच्या सुमारास रत्नमहालांत यावें असें मी त्याला कळविलेलें होतें. तसेंच मधुकराच्या

नांवचें एक बनावट पत्र लिहून नलिनीलाही मीं त्याच वेळीं बंगल्यावर येण्यास सुचविलें होतें. अशी एकंदर व्यवस्था झाल्यावर मी मास्तरांना, सरलेस २४ जुलईच्या रात्रीं गजाननरावांना आपणांस रत्नमहालांत भेटण्यासाठीं पत्रद्वारें कळविण्यास आज्ञा केली.

"अशा प्रकारें सर्व तयारी झाल्यावर मी त्या रात्रीं सरलेसह रत्नमहालांत शिरलों. मास्तरही त्याच वेळीं आम्हांला तेथें भेटावयाचे होते. परंतु त्यांच्या शाळेचा त्या दिवशीं कसला तरी समारंभ असल्यामुळें त्यांना तेथून सुटावयास बराच उशीर झाला. ते येत नाहींत असें पाहून मी सरलेसह, तिच्याजवळ असलेल्या किल्लीनें दरवाजा उघडून बंगल्यांत शिरलों. आंत शिरतांना आम्हांला कुणीही पाहिलें नाहीं; आंत शिरतांच मी तिला एकदम दिवाणखान्यांत घेऊन गेलों. मास्तरांच्या मध्यस्थीनें माझी व सरलेची चांगलीच ओळख झाली होती. त्या दिवाणखान्यांत गेल्यावर मी तिच्यासमोर तिच्या पतीच्या दुष्कृत्यांचें यथास्थित वर्णन केल. मीं तिच्या नवऱ्यास दिलेल्या शिव्या ऐकून तिला प्रथम माझा बराच राग आला; परंतु त्याच वेळीं तिच्या पतीनें तिजपाशीं केलेल्या फसवणुकीचें चित्र तिच्या डोळ्यांपुढें उभें राहिल्यामुळें मजविषयीं तिच्या मनांत आलेल्या रोषाला थारा मिळाला नाहीं.

तिजकडे पाहत असतांना मला, तिजपाशीं एक नाटकी खंजीर आहे असें आढळून आलें. मधुकर लोणावळ्यास तिला भेटावयाला गेला असतां येते वेळीं तो त्याजकडून विस्मृतीनें तेथें राहिला होता. तो त्याला परत देण्याकरितां ती येतांना घेऊन आली होती. मीं तो खंजीर पाहावयास म्हणून तिजकडून मागून घेतला व तिला कांहीं संशय येऊं नये म्हणून त्याजकडे मी निरखून पाहूं लागलों. मला तो खंजीर दिल्यानंतर ती गजाननरावांची वाट पाहत जवळच असलेल्या पेटीसमोरील खुर्चीवर बसली. माझी वेळ झाली असें पाहतांच मी पाऊल वाजूं न देतां तिच्या मागें आलों व तिला मारण्याकरतां हात वर उचलला. परंतु माझी राक्षसी कृति लक्षांत आल्यामुळें तिनें एकदम वळून स्वरक्षणासाठीं व मला अडविण्याकरितां एकदम माझ्याशीं झटापट सुरू करून